# या सम हा!

( भास्करबुवा बखले यांच्या जीवनावरील कादंबरी )

योगिनी जोगळेकर



संजय प्रकाशन : दोनशे चोपन्न

प्रकाशक :
अभय शंकर भावे
संजय प्रकाशन
९१७।२२, फर्ग्युसन कॉलेज रोड,
पुणे ४११ ००४.

प्रथमावृत्ती : १४ एप्रिल १९८४



मुखपृष्ठ : अनिल उपळेकर

मुद्रक :
प्रमोद वि. बापट
स्मिता प्रिंटर्स
१०१९, सदाशिव पेठ,
नागनाथपाराजवळ,
पुणे ४११ ०३०.

किंमत : पंचावन्न रुपये

# प्रार्थना

हे नोहे भास्करबुवांचे चरित्र
हे आहे चरित्र–आधारित कल्पना चित्र.
कुठून कुठून वेचलेत क्षण
कुठून कुठून आणलेत कण
दुरून दुरून जुळवलेत धागे
जरी झालेत आगे–मागे
महत्त्वाची नसते सनावली
महत्त्वाची नसते नामावली
महत्त्वाचे असते कर्तृत्व
विधात्याचे दातृत्व.

सरस्वतीचे पहाटस्वप्न
साकारण्याचा छोटा प्रयत्न
शेकडोंचे मानते आभार
माथ्यावर ज्यांचा ज्यांचा भार
अशा भास्करा करता नमस्कार
मनी कासया हवा अंधःकार ?
सागराच्या जलाने सागरालाच अर्घ्यदान
‘ या सम हा ’ भास्करबुवांनाच प्रदान.

## योगिनी जोगळेकर यांचे प्रकाशित साहित्य

**कादंबऱ्या :**

बादळफूल । गुलबाक्षी । कचबंध । नादब्रह्म । ज्योतिर्मयी । अक्षम्य । एक मोठा एक छोटा । ओढ । हारजीत । प्राजक्ता । पूर्ती । चैती । द्विदल । कसरत । अतर्क्य । शेळी गेली जीवानिशी । पोकळवासा । पायगुण । नवी वाट । केळ । ऋणानुबंध । पुनर्जाता । झूला । अश्वत्थ । शह । कुणासाठी कुणीतरी । लढत । घरोघरी । तिढा । या सम हा ! । सुहृद ।

**कथासंग्रह :**

झुंजुमुंजु । प्राची । ऊर्मि । जाग । शिलंगण । गोफ । ओटी । श्रावण । पाझर । उलट-सुलट । रेषा । मांडव । ताजा । शर्यत । ओलावा । सत्कार । पाद्यपूजा.

**कवितासंग्रह :**

रिमझिम । सूरगंधा । आंबट-चिंबट (बालगीते).

**नाटक :**

रंगात रंगला श्रीरंग.

**कुमारवाङ्मय :**

अक्षय संपदा । मातृसेवा । गुरुशिष्य । तिळगूळ । खंडू खोडसाळे । स्वातीचे शिंपले । वाकडी काकडी । गोडासागर । फुलांचे झेले । गोपालकाला । वादळवारा.

# एक

" अभिमान नाव ठेवलंय् मारे. ते अपमान ठेवायला हवं होतं. नापास झालास ना गधड्या ? आता हा नामांकित वकील बापही तुझी वकिली करू शकणार नाही.

थांब, हंटर घेतो आणि फोडून मोकळा करतो. शहाण्यांना शब्दांचा मार आणि मूर्खांना टोणप्यांचा मार. पण तुझ्यागत दीडशहाण्याला आणि शतमूर्खाला चाबूकच योग्य ! "

आणि बाबा मला खरंच हंटरनी झोडपायला लागले. मी गुरासारखा ओरडायला लागलो. लहानपणापासून आमच्या रडण्याचा आवाज आईसाहेबांना तोंडपाठ. त्यामुळे स्वयंपाक अर्धा टाकून आई बाहेर आली आणि मध्ये पडून म्हणाली,

" होऊ दे यंदा नापास. पुढच्या वर्षी होईल पास. "

" या– या तुमच्या फाजील लाडांनीच नासला ! नापास झाला ! म्हणे– 'होऊ दे यंदा नापाश्. पुढच्या वर्षी होईल पाश्.' तुम्हाला हे म्हणायला काय जातंय ? ज्याचं जळतं त्याला कळतं. हा मॅट्रिकला सुटावा म्हणून प्रत्येक विषयाला शिकवणी ठेवण्यापायी खिशाला किती भोकं पडली नि शेवटी भगदाड होऊन खिसाच कसा फाटून गेला ते खिशाला माहीत की आम्हाला माहीत ! "

आणि पुन्हा चिरडीला येऊन म्हणाले–

" आता इथूनपुढे या कवडीमोलाच्या मुलासाठी मी कवडीही खर्च करणार नाही. याला आचारी करा नाहीतर पाणक्या करा. "

असे म्हणून बाबा आणखी एक फटका मारणार तो धारवाडचे काकाआजोबा ओसरीहून आले. बाबांचा हात धरून म्हणाले,

" तू नको. मी करतो तुझ्या लेकाला सरळ. चल रे अभिमान, माझ्याबरोबर. झटपट कपडे कर. "

मला धारवाडहून येताना धारवाडी पोहे आणि धारवाडी गुलाबी पेढे आणणारे काकाआजोबा खूप आवडत असत. उलट येता-जाता माझ्यावर आग पाखडणारे बाबा दोडके होते आणि आजोबा लाडके होते.

आज तर बाबांनी माझ्याशी बंडच पुकारलं होतं. त्यामुळे वय आणि नाते विसरून दंड ठोकून उभे रहावेसे वाटत होते. माझे तापलेले रक्त ओळखून की काय आईने झटकन चाबूक उचलला आणि म्हणाली,

"आता हा वेडा चांगला धडा शिकवून तुम्हीच ताळ्यावर आणा. तुमच्या गाण्याच्या भाषेत तालावर आणा. समेवर आणा."

आम्ही रस्त्यावर आलो तेव्हा दुपारचा चारचा सुमार असावा. पावसाळी हवेमुळे दुपार भासत नव्हती. ऊन त्याहून भासत नव्हते. समोरून आलेली रिक्शा थांबवून काकाआजोबा म्हणाले,

"चलो. बालगंधर्व रंगमंदिर."

मला मारणारे बाबा आणि नाट्यगृहात नेणारे आजोबा यांची मनातल्या मनात तुलना करीत असतानाच आम्ही बालगंधर्व नाट्यगृहाच्या परिसरात पोहोचलो. पण तिकिटांच्या खिडकीकडे न नेता आजोबांनी मला उजव्या बाजूला नेले.

तिथे एका भव्य पुरुषाचा पुतळा उभा होता. डोक्याला फेटा– अंगात लाँग कोट– वर झोकदार उपरणे आणि तेजस्वी मुद्रा– पाहताक्षणीच तो पुतळा सजीव होऊन माझ्या मनापर्यंत पोहोचला.

समोरच्याच चबुतऱ्यावर बैठक मारून बसत आजोबांनी विचारले, "कुणाचा पुतळा आहे हा ?"

मी पुतळ्याखालचे नाव वाचून सांगितले, "पं. भास्करबुवा बखले यांचा. पण माझ्या नापास होण्याचा नि या पुतळ्याचा संबंधच काय ?"

"फार मोठा संबंध आहे. तूच नव्हे तर जगातला जो जो विद्यार्थी नापास होईल त्याने त्याने यांच्या पायाशी यायला हवे."

"कारण ?"

"कारण सांगतो. डोळे पूस आणि खाली बैस. या माणसाचाही बाळपणात तुझ्याच वयाचा असताना दारुण पराभव झाला होता. पण जय मिळेपर्यंत लढत राहिला. रडत राहिला नाही. आयुष्य हे रडण्यासाठी नसून लढण्यासाठी आहे, हे यानेच स्वतःच्या उदाहरणाने पटवून दिले."

"पण– पण हे तर गायक होते."

"होय. पण त्यांनीच या रंगमंदिराचे बालगंधर्व घडविले."

"कसा होता त्यांचा आवाज ?"

" आवाज ?"

काकाआजोबा डोळे मिटून कधीकाळी ऐकलेल्या त्या आवाजाचा जसा पुनः-प्रत्यय घेऊ लागले. तन्मय होऊन मान हलवून म्हणाले,

" अलौकिक ! एकदम अलौकिक... मला तर वाटतं, ब्रह्मसुत नारदमुनी स्वतःचा वीणाझंकार पृथ्वीवर विसरून गेले. नारदांची वीणा जमिनीवर टेकत नसे. तसा हा झंकारही टेकेना. चांगला कंठ पकडण्यासाठी पृथ्वीवर भिरभिरत राहिला.

भास्कर नावाचे नवजात बालक गुजराथेतल्या ' कठोर ' नामक ग्रामी रडत होते. त्याचाच गळा या झंकाराने पकडला. "

" अहाहा !"

" अहाहा काय ? एवढ्याने काय झालंय ? अरे, एकदा स्वर्गीय अप्सरांचे नर्तन चालले होते. लय वाढली. त्यांतल्या एकीच्या पायातला पैंजण तुटला आणि पृथ्वीवर आदळला. ती लय पेलणारा मुलगाही त्या ' कठोर ' गावचा तो भास्करच निघाला. म्हणून तो नूपुर त्या कंठात जाऊन लपला. "

" वा वाऽ ! काकाआजोबा, किती नामी कल्पना !"

" एकदा सागर लक्ष्मीने राजहंसाच्या चालीतला जलविहाराचा डौल पाहिला. तशी खूष होऊन लक्ष्मीने आपल्या कंठातील मौलिक हार राजहंसाकडे फेकला.

तो हार चंचूत घेऊन राजहंस गगनमार्गे उडाला. नभप्रांती उड्डाण करीत असताना भास्करबुवांची तीन सप्तकातली दाणेदार तान राजहंसाला भेटली तशी त्या तानेतल्या मोत्यांचा मान राखण्यासाठी लक्ष्मीने दिलेला मणीहार राजहंसाने परत पृथ्वीवर भिरकावून दिला. तो नेमका भास्करबुवांच्याच कंठात जाऊन पडला. म्हणूनच त्यांच्या तानेला जातिवंत मोत्याचे पाणी चढले. ऐश्वर्य चढले.

म्हणूनच त्यांच्या गायकीत नारदमुनींच्या वीणेच्या स्वरांचे गांभीर्य होते, अप्सरांच्या नृत्याच्या लयकारीतले सौंदर्य होते. आणि तानेत जातिवंत मोत्यांचे ऐश्वर्य होते.

मुला, प्रयागचा त्रिवेणीसंगम पहायचे फार दिवस मनात होते. पण ते मनीच राहून गेले होते. या ना त्या कारणाने मागे पडले होते. पण भास्करबुवांची पहिली वहिली बैठक ऐकली आणि मी जसा त्रिवेणी संगमात न्हाऊन निघालो. "

" ते कसे काकाआजोबा ?"

" शब्दतत्त्व– रागतत्त्व– आणि व्यक्तिमत्त्व असा तो आगळा त्रिवेणी संगम होता. शब्दरूपातली गंगोत्री– रागरूपातली जम्नोत्री आणि व्यक्तिमत्त्वातली सरस्वती यांच्या पुरात त्या दिवशी जसा सुस्नात झालो. आणि मग बुवांच्या प्रत्येक मैफलीत हाच अनुभव घेत राहिलो. नहात राहिलो. पोहत राहिलो. डुंबत राहिलो. अगदी मनसोक्त !"

" गाण्यातले शब्दतत्त्व म्हणजे काय, काकाआजोबा ?"

" अरे, म्हणजे चीजेतले बोल. चीजेतले कवन. हल्लीचे अनेक गायक चीज अर्धीमुर्धीच गातात. बोबडी गातात. तोतरे असल्यागत गातात. चुकीची गातात. अपभ्रष्ट गातात.

कानगोष्टीच्या खेळात ' हिरण्यकश्यपूच्या पोटी प्रल्हाद बाळ झाला ' ही पहिल्या मुलाने शेजारच्या मुलाच्या कानात सांगितलेली गोष्ट पन्नासाव्या मुलाच्या तोंडून बाहेर पडताना— ' हरीणकासवाच्या पोटी परळात बाळ झाले. ' इतके भयंकर रूप धारण करते. तसेच चीजेचे बोल बालम्‌चे पालम्‌ आणि कन्हय्याचे कल्लैय्या झालेले मी ऐकले होते. मुंदरी आणि सुंदरीचा गोंधळ तर विचारूच नको.

अरे, भ्रष्ट होऊन कानावर येणारे हे शब्द धक्केच देतात. पण बुवा जेवढे स्वरांना जागत तेवढेच शब्दांना जागत. स्वरांच्या मागे गायक उभा असतो. तसाच चिजांच्या मागे लेखक उभा असतो हे ते कधीही विसरले नाहीत.

या शब्दांना आणि या सुरांना साथ देणारे एक विशुद्ध अंतःकरण उभे राहिले आणि संगीताच्या दुनियेत एक अजब लेणेच कोरले गेले !

आनंदनिर्मिती हे कलेचे ध्येय बुवांना अवगत होते. त्यामुळे ते स्वतः प्रसन्न राहत. दुसऱ्यांना प्रसन्न करीत.

स्वतःला आसन्नमरण समजणारा रुग्णही बुवांचे अमृतमय गान ऐकून प्रसन्न झाला असता.

मला रडक्या गाण्याची चीड आहे. पण बुवांचे गाणे ऐकताना डहाळीवरून प्राजक्ताची फुले पडावीत तसे नकळत पापणीवरून अश्रू पडू लागले. "

" म्हणजे तुम्हाला रडवणारे संगीत होते ते ?"

" नाही. आनंद देणारे. अतीव आनंद देणारे. ते आसू दुःखाश्रू नव्हते. आनंदाश्रू होते. आनंदाच्या अनुभूतीचा तो सुखद प्रत्यय होता. "

" काकाआजोबा, भास्करबुवांच्या गाण्याची ध्वनिमुद्रिका नाही का ?"

" दुर्दैवाने नाही. पण बाबा रे, असती तरी गंगेच्या कमंडलूभर पाण्याने गंगौघाची भव्यता आणि दिव्यता अनुभवता येत नाही. त्यासाठी वाहत्या गंगेत सचैल स्नानच घडायला हवे. त्याचप्रमाणे वीतभर ध्वनिमुद्रिकेत आभाळभर उंचीचे गाणे टिपता येत नसते. "

" पण निदान कल्पना तर आली असती. बरं, पुढे सांगा ना. "

" ऐक. बखल्यांचा भास्कर तुझ्याएवढाच असताना त्याचा आवाज फुटला. मडक्यासारखा झाला. नाटकात गाताना तो आवाज नापास झाला. त्यामुळे तुझे वडील आज तुझ्यावर जसे भडकले, तसेच किर्लोस्कर मंडळीचे भाऊराव कोल्हटकर भास्करवर भडकले. अद्वातद्वा बोलले.

ते ऐकताच भास्कर कंपनीबाहेर पडला–

'भास्करचा भास्करबुवा होईन तेव्हाच तोंड दाखवीन–' अशी भीषण प्रतिज्ञा करून !

पण नाटककंपनीने त्याच्याकडे पाठ फिरवली तरी नशिबाने पाठ फिरवली नाही. किंबहुना प्रयत्नाने साथ दिली तर पाठ फिरवलेले नशीबही सामोरे येते, हे भास्करने ओळखले."

"आणि खरंच ते एक दिवस बडे गायक झाले ?"

"नुसते बडे ? अरे, स्वरांचा जिवंतपणा, रागाचा सच्चेपणा आणि तालाचे लालित्य या त्रिगुणांच्या आधारावर परमोत्कर्षाला पोहोचून हा त्रिशूलधारी वीर 'संगीत-भास्करच' झाला.

पोरा, त्यांनी एकाच घराण्याची अंधपरंपरा राखली नाही, तर डोळस व चौकस वृत्तीमुळे त्यांनी गायनाचे अनंत गुरू करून स्वतःचे एक सर्वांगसुंदर, तेजस्वी घराणे निर्माण केले. सबंध शतकात असा एखादाच पुरुष जन्माला येतो."

"याचा अर्थ त्यांनी अपमानाच्या राखेवर अभिमानाची फुंकर घालून कर्तृत्वाचे निखारे फुलवले."

"होय. आणि त्या निखाऱ्यातून अग्नीफुले नव्हेत, तर स्वरफुले फुलली. साक्षात सरस्वतीला त्यांचा हार मिळाला आणि नटराजाला तर त्यांची पूजाच लाभली."

"त्यांनी पुन्हा तोंडाला रंग लावला ?"

"स्वतःच्या तोंडाला रंग न लावता त्यांनी रंगभूमीच रंगवली."

"ती कशी काय, आजोबा ?"

"अरे, मैफली गाजवून या भास्कराने आसेतूहिमाचल शास्त्रोक्त संगीत बुजूर्गांना तर ऐकवलेच, पण तेच बहुजन समाजापर्यंत पोहोचवण्यासाठी विद्यालयाचा अगर पुस्तकाचा उपयोग न करता थेट नाटकांनाच शास्त्रोक्त चिजांच्या चाली देऊन खानदानी संगीत नाट्यसंगीताच्या रूपात बहुजन समाजापर्यंत पोहोचवले.

संगीताच्या विश्वातली ही मोठीच क्रांती होय. स्वयंवर, विद्याहरण, द्रौपदी आदी नाटकांतून मूळ हिंदी चिजांना मराठी अंगडी, टोपडी घातलेली दिसतात. ते साजिरे, गोजिरे, रूपडे जनमानसाला अजून भूलभुलैय्या घालीत आहे. कारण भास्करबुवा नुसते ओठांनी गायले नाहीत तर अंतःकरणाने गायले. म्हणूनच त्यांच्या चाली आजही काळजाला भिडतात."

"आजही ?"

"होय, आजही. तुझ्याही. 'करीन यदुमनी सदना' तुझ्या मनापर्यंत पोहोचलंय ना ? 'मम सुखाची ठेव देवा' तुझ्या कानांची ठेव झाली आहे ना ? 'स्वकुल

तारक सुता–"

"आईसुद्धा गुणगुणते."

"अरे, बाबा 'नरवर कृष्णासमान'मधल्या 'बहुत नृपती ते आले गेले' त्याप्रमाणे– 'बहुत गवई ते आले गेले, परी मनाला भास्कर झाला मंत्र महान' अशी आमची अवस्था झाली. ही त्यांचीच किमया. त्यांनी मैफलीतले राग पार माजघरात पोहोचवले. मग तो 'नाथ हा माझा'मधला यमन असो– 'स्वकुल तारका'मधला भिमपलासी असो– 'अनृतची गोपाळा'मधला सूरमल्हार असो अगर 'नृपकन्या तव जाया' ही भैरवी असो. पैठण्यांच्या जरीप्रमाणे या अस्सल पोताचा जर कधी काळा पडायचा नाही.

ज्ञानेश्वरांनी संस्कृतातली गीता प्राकृतात आणून परब्रह्म स्त्री-शूद्रांपर्यंत पोहोचवले. तसेच पंडित भास्करबुवांनी नादब्रह्म घरोघर पोहोचवले."

"काकाआजोबा, भास्करबुवांचे एवढे विलक्षण चरित्र तुम्हाला त्यांनी स्वतः ऐकवलं ?"

"छे रे, बाबा. स्वतःबद्दल स्वतःच टिमकी वाजवणारा तो माणूस नव्हता. आजकाल वीतभर ढलपीचं हातभर लाकूड करणारे फार. नभोवाणीची पायरी एकदा चढली तरी आभाळाला हात भिडवणारे फार.

उलट भास्करबुवांजवळ स्वरांचं आभाळ रहायला आलं असून त्यांनी ओंजळभरसुद्धा गर्व केला नाही. स्वतःची महती गायली नाही. कीर्ती सांगितली नाही.

त्यांची आरती त्यांच्या असंख्य चाहत्यांनी– शिष्यांनी– नातलगांनी मुक्तकंठांनी केली. नावंच सांगायची तर त्यांचे गुरुबंधू मंजीखाँ, भूगंधर्व, रहिमतखाँ, रजबल्लीखाँ इत्यादी बुजुर्ग, शिल्पकार फडके, कादंबरीकार ना. सी. फडके, नाटककार वसंत शां. देसाई, संगीतकार, दिग्दर्शक केशवराव भोळे, पं. विनायकराव पटवर्धन, पु. ल. देशपांडे तसेच बुवांचे शिष्य पाटणकरबुवा, गोविंदराव टेंबे, बापूराव केतकर, मास्तर कृष्णराव, बालगंधर्व, बागलकोटकर, अप्पाशास्त्री जोगळेकर, श्री. बर्वे त्याचप्रमाणे त्यांच्या कन्या आक्का, शांताबाई आणि पमाताई, जामात हर्डीकर, धामणकर, डॉ. जमेनिस, डॉ. दातार, पं. राम मराठे आणि असंख्य ! ...

अनेकांनी अनेक तऱ्हांच्या पाहिलेल्या वा ऐकलेल्या आठवणी सांगाव्यात आणि आम्ही त्या ऐकाव्यात. कुपीतले अत्तर संपते तरी सुगंध मागे राहतो. माणूस जाते तरी आठवणी मागे राहतात. भास्करबुवा खरोखरच अलौकिक, एकमेव, अद्वितीय. शतकातून अशी एखादीच मूर्ती निर्माण करून विधाता तो साचा मोडून टाकतो. जणू त्याच्याच हातून असे कर्तृत्व पुन्हा घडायचे नसते !"

"काकाआजोबा, मला आत्ताच इथेच सारं चरित्र ऐकवा–"

"ऐक तर–"

*

# दोन

बडोदे संस्थानातील कठोर नावाचे एक आडगाव. तिथेच कोमल गळ्याच्या भास्करचा जन्म, अश्विन शुक्ल द्वादशीची तीथ होती. सतरा आक्टोबर अठराशे एकोणसत्तरची रात्र.

पण रात्रीच या गानभास्कराचा उदय. हा केवढा विरोधाभास ! मातेचे नाव जानकी आणि पित्याचे नाव रघुनाथ. म्हणूनच हा रघुनाथ कुलोत्पन्न सोशीक निघाला. दिल्या वचनाला जागणाराही निघाला.

बखले कुटुंबाची कुलस्वामिनी गोमंतकातली म्हाळसानारायणी. त्यावरून पूर्वज गोमंतकातले असणार. गोव्याच्या तांबड मातीतली कलासक्ती या बाल-भास्करात देशपरंपरेने उतरली असणार.

लहानपणापासून मुलाला संगीताचे वेड होते हे उपजत असावे. कारण छोटा भास्कर भुकेने व्याकूळ होऊन रडू लागला आणि त्याची आई कामात असली तर भास्करचे पिताजी जवळच्याच तांब्याच्या भांड्यावर पूजा करता करता पळीने अलगद आघात करीत आणि नाद उत्पन्न करीत. मग चिमुकला भास्कर कानात गोष्ट सांगितल्यागत गप्प होई.

कान विस्फारून– डोळे मोठे करून तो नाद ऐकत राही. अम्मळशाने खिदळत राही. 'जो गुण बाळा, तो गुण जन्मकाळा–' म्हणतात ते काही खोटे नाही. मोठे-पणी हा नादिष्टपणा आणखीच वाढला.

जरा मोठा झाल्यावर– अभ्यासाला बसल्यावर– दूर कुठेतरी आंब्यावर कोकिळेचा पंचम लागला की, भास्करचा कान तिकडे लागलाच म्हणून समजावे. कोकिळेच्या पंचमातूनच नव्हे, गाईच्या हंबरण्यातूनही तो कुठलासा स्वर टिपत राही. फार काय पहाटेच्या कोंबड्याच्या आरवण्यातही त्याला कुक्कटगान गवसे. शेतातल्या मोटेच्या आवाजातही काहीतरी वैशिष्ट्य असे.

या नादमयी सृष्टीचे भास्करला एवढे जबरदस्त विलोभन असे की देवळात जाणारा भास्कर गेल्यागेल्या घंटा वाजवीत असे आणि तिच्या घुमाऱ्यांतून उठणारा घनगंभीर ध्वनी जसा हृदयात साठवून घेत असे. मोठ्या घंटिकेतला मंद्र स्वर आणि छोट्या घंटिकेतला तार स्वर यांचे नाते जोडीत असे.

लहानपणी खरे तर, मुलांना खाऊचे वेड असते; पण या मुलाला स्वरांचे वेड होते. जसा तोच त्याचा खाऊ होता. कित्येकदा हातातला तंपिठाचा लाडू अगर गुळपापडीची वडी हातातच ठेवून हा स्वयंपाकघराच्या खिडकीतून दिसणाऱ्या बगळ्यांच्या थव्याकडे पाहत बसे.

आई विचारी– "अे वेड्या, आभाळात काय पाहतो आहेस ?"

"काही नाही. बगळ्यांचा थवा कसा एका वेगात उडतो आहे– एकसारखे पंख मागेपुढे करतो आहे, ते पाहतो आहे."

"देवाचे नक्षीकाम आहे बाबा ते."

"आई, मला कधी काळी असं काही करता येईल का ग ? काय डौल आहे नाही ह्या उडण्यात !

परवा रामनवमीच्या कीर्तनात बुवा गात होते, तेव्हा मृदुंगाबरोबर असंच काहीतरी डौलदार चाललं होतं, नाही ? आणि आई, वाड्यातल्या मुली हदग्याची गाणी म्हणतात ना, त्यांतसुद्धा सूर आणि ठेका आहे, नाही ?"

"अरे बाबा. आपल्या आरत्यांना सूर असतो. ठेका असतो. अर्थ असतो. पण ऐकेल त्याला. बघेल त्याला. बरं, आता गाण्याची आरती पुरे. हातातली वडी खा अगोदर."

रघुनाथरावांना जात्याच शिक्षणाची आवड. पण पोटापायी खेडोपाडी भ्रमंती पाठीमागे लागलेली. पण तरी थोरल्यापेक्षा आणि वरच्या तान्हुताईपेक्षा हाच तल्लख बुद्धीचा होता, याची वडिलांना जाणीव होती. आणि त्यांची पावले त्या दृष्टीने पडायलाही लागली होती.

भास्करची तेजबुद्धी आपल्या गावठी चाकरीच्या चाकाखाली भरडली जाऊ नये, म्हणून भास्करचे मौजीबंधन आठव्यावर्षी उरकून घेऊन, त्याला वडील विवाहित बहिणीकडे– तान्हुताई पुराणिक हिच्याकडे– शिक्षणासाठी बडोद्यात ठेवण्यात आले.

मौंजीबंधनातला 'ॐ भवति भिक्षान् देहि !' हा मंत्र भास्करने हृदयात पक्का साठवला. म्हणूनच पुढे विद्येपायी त्याला मधुकरी वृत्तीने संगीत मधु साठवता आला.

भास्करचा गळा म्हणजे मधाचे पोवळे होत होते. पण हे लहानगे पोर त्यासाठी कुठून कुठून मधुबिंदू गोळा करीत होते, त्याचे त्यालाच माहीत !

भास्कर दहा वर्षांचा झाला. आणि बडोद्यातल्या संस्कृत पाठशाळेत जाऊ लागला. तिथल्या महाबळशास्त्र्यांनी संस्कृतची कारिका शिकवली, की भास्करला महाबळ येई.

बाळशास्त्री तेलंग या न्यायशास्त्र शिकवणाऱ्या विद्वानाचा, घरापासून दूर राहून विद्या जवळ करणाऱ्या भास्करवर भारी जीव जडला होता.

संस्कृत शिक्षणाने भास्करचे मन सुसंस्कृत झाले. वाणी शुद्ध होता होता अंतःकरण विशुद्ध होत गेले. शीलाचे आणि चारित्र्याचे महत्त्व मनावर बिंबले. चांगल्या मुशीतून चांगला पुतळा तयार होतो. मग चांगल्या संस्कारातून चांगला माणूस तयार झाल्याशिवाय कसा राहील !

एका चिमुकल्या संगीतकाराला आकार द्यायला असे कितीतरी हात स्वेच्छेने पुढे आले. आणि भास्करने त्यांचे ऋण विनम्रभावाने माथ्यावर घेतले.

बाकीच्या विद्या घेता घेता, भास्कर खरे म्हणजे संगीतकलेची वाट शोधत होता. कारण तीच त्याची आंतरिक ओढ होती. तेच त्याचे मनस्वी वेड होते.

इच्छा आहे, तिथे मार्ग आहे म्हणतात. भास्करलाही हा मार्ग लवकरच गवसला. वडील बहीण तान्हुताई यांचे यजमान दक्षिणदास देवळात पुराणिक होते.

भास्कर पाठशाळा संपल्यावर, संध्याकाळ टिवल्याबावल्या करण्यात न घालवता मेव्हण्यांबरोबर देवळात जाई. आणि तिथे विष्णुबुवा पिंगळे नावाचे कीर्तनकार चातुर्मास कीर्तने करत, त्यांतली गाणी मनापासून ऐकत राही.

एक दिवस भास्कर मुंजा म्हणून कुठेसा जेवायला गेला होता. त्यावेळेच्या प्रथेप्रमाणे पंक्तीत श्लोक म्हणा, आर्या म्हणा– म्हटले जात असे.

भास्करला शेजारचा माणूस भसाड्या आवाजात श्लोक म्हणताना ऐकून, एकदम कठोरची शाळा आठवली. तिथली मधली सुट्टी आठवली. मधल्या सुट्टीत चिंचेच्या मोबदल्यात त्याच्या सुरेल गळ्यातून श्लोक उपटणाऱ्या मुलांची गर्दी आठवली.

डिपोटी शाळा तपासायला आले, म्हणजे मराठीचे गुरुजी त्याला एखादी कविता म्हणायला लावीत आणि डिपोटींना खूष करीत हेही आठवले.

मग, शाळेतला गळा इथे दाखवायला काय हरकत आहे ? आणि कुणी न सांगता सवरताच भास्करने टिपेच्या आवाजात श्लोक म्हणायला सुरुवात केली–

‘ अनुदिनी अनुतापे तापलो रामराया
परम दिनदयाळा नीरसी मोहमाया.
अचपळ मन माझे नावरे आवरीता
तुजविण शिण होतो, धाव रे धाव आता...’

त्या श्लोकाचे अर्थमाधुर्य अधिक, की त्या बाळाच्या गळ्यातले कंठमाधुर्य अधिक असा श्रोत्यांना संभ्रम पडला ! जेवणारांचे घास हातात राहिले. वाढणारांचे पाय जागेवर खिळले. कित्येकांचे वासलेले आ तसेच राहिले.

पंक्तीतल्या उदबत्त्यांचा सुगंध या स्वरसुगंधाच्या दिशेने झेपावू लागला. भरजरी पितांबरातल्या यजमानांनी तर–

“ शाब्बास बाळ. जितकी वाणी गोड तितकाच आवाजही गोड आहे, बरं का. आणि धीटपणा तरी किती ? असाच राहू दे. असाच वाढू दे.”

असे म्हणून त्याच्यापुढे चांगली सव्वा रुपया दक्षिणा ठेवली. पण इतरांपेक्षाही जेवावयास आलेल्या पिंगळेबुवांनी त्याच्यातला गाण्याचा गुण नेमका हेरला,

आणि तो निघाला, तेव्हा त्याला गाठून बजावले—

" आमच्या दक्षिणदासांचा मेव्हणा ना तू ! श्लोक झोकदार झाला, बरं का ! उद्यापासून आमच्यामागे कीर्तनाला उभे रहायचे आणि कीर्तनात गायचे. "

" पण— मी— गाणे शिकलो नाही. "

" चालायला लागलं, की वाट सापडते. मी शिकवीन. "

मोठ्या खुशीत भास्कर घरी परतला. पुराणिकबुवांच्या परवानगीने पिंगळे-बुवांकडे जाऊ लागला. बुवांनी त्याला यमन, भूप, सारंग, भीमपलास, पिलु, खमाज, मांड इत्यादी सोपे राग शिकवले. त्या त्या रागावर आधारित श्लोक व साक्या, दिंड्या आणि आर्याही शिकवल्या.

या रत्नाला हा नवा पैलू, या जवाहिऱ्याने पाडला. म्हटलं, तर प्रत्येक गुरू हा जवाहिऱ्याच असतो, तर प्रत्येक शिष्य हे पैलू न पाडलेले रत्न असते. हा रत्न-पारखीच त्याच्या गुणांचे किरण फाकवण्यास मदत करीत असतो.

सर्व चाली ताब्यात आल्यावर, छोटा भास्कर खरंच पिंगळेबुवांच्या मागे उभा राहू लागला. त्यांनी शिकवलेल्या चालीबरहुकूम अधूनमधून गाऊही लागला.

आजवर आख्यानाच्या ओढीने येणारे श्रोते, भास्करच्या गाण्याच्या ओढीनेही येऊ लागले. या विषयातली त्याची गती आणि गोडवा पाहून पिंगळेबुवांना वाटे—

' पोराच्या चेहऱ्यावर तेज तरी किती आणि गाण्यात ओज तरी किती ! चेहरा पारदर्शक तरी किती ! गाण्यातले ते ते भाव टिपणारा तरी किती ! ! हा महान कीर्तनकार तर होईलच, पण विद्या मिळाली, तर गायक नटसुद्धा होईल. '

आणि मग मोठ्या उत्साहाने ते आणखी आणखी शिकवत राहिले. भास्कर आणखी आणखी घेत राहिला. पहाटेच्या वेळी प्राजक्ताच्या झाडाखाली आलेला माणूस बरसात अंगावर घेतल्याशिवाय कसा राहील ?

भास्करची संगीताची पूर्वप्राथमिक तयारी अशी देवाच्या साक्षीने सुरू झाली. मंदिरही दुसऱ्या-तिसऱ्या देवाचे नव्हे, तर मुरलीधराचे; म्हणूनच त्या मुरलीधराने भास्करच्या गळ्यातही मुरलीचा मधुवा हळूच भरून टाकला असावा.

पण मनूचा मासा टिचभर ओंजळीतून कुपात— तेथून सरोवरात, तेथून नदीत आणि शेवटी महासागरात जाऊन मनूला न ओळखण्याइतका मोठा झाला. तसेच काहीसे भास्करचे झाले.

अभिजात संगीताची ओढ त्याला गावच्या देवळाच्या सीमेवर थांबू देईना. तो आणखी विद्या घेण्यासाठी धडपडू लागला. नशीब उघडण्यासाठी हातपाय हलवू लागला.

नशिबाचा फेरा आकाशातला तारा ठरवत नसतो, तर हातातले कर्तृत्व ठरवत असते, हे भास्कर जाणून होता, आणि योग्य वेळ यायची वाटच पाहत

होता.

'संधी तुमच्या दारावर 'टक्‌टक्' करून जाते, तेव्हा तातडीने दरवाजा उघडायला हवा, नाहीतर ती पुढे निघून जाते आणि मग, हात चोळणेच नशिबी येते.' हे बुद्धिमान भास्करला ज्ञात होते. कारण लहान वयातही त्याच्या बुद्धीची झेप मोठी होती. आवाका मोठा होता.

मात्र तरीही त्याने ती वेळ येईपर्यंत पिंगळेबुवांची पाठ सोडली नाही. कोणत्याच चांगल्या गोष्टीचा पाठलाग कधीच वाया जात नाही, याचा भास्करलाही लौकर अनुभव आला.

त्या दिवशी पिंगळेबुवांचे कीर्तन 'डिसा कॅन्टोन्मेंट' या लष्करी छावणीत होते. बडोदे सरकारच्या नोकरीत असल्यामुळे कॅप्टनसाहेबांचा मराठीचाही अभ्यास होता, पण संगीतातले र की ट त्यांना कळत नव्हते. या अनभिज्ञापुढे कीर्तन कसले रंगते ? अशी पिंगळेबुवांना चिंता पडली !

मग त्या बुद्धिमान कीर्तनकाराने भाषातीत कीर्ती मिळवलेली रामायणाची जागतिक कथा निवडली. तेच आख्यान लावले. भास्करने तालासुरात पूर्वरंगातच यमन रागात सुरू केले–

'रामो राजमणी सदा विजयते
रामं रमेशं भजे ! .........'

–आणि खरोखरच या रामाने, या भास्कराला विजयी केले.

मुलाची अस्खलित वाणी आणि अद्‌भुत खडा, चढा सूर ऐकून साहेबही चकित झाला. आणि आनंदितही झाला. 'व्हेरी गुड्, व्हेरी गुड्'...... म्हणत भास्करला वाहव्वा देत गेला.

उत्तररंग झाल्यावर, रंगलेल्या साहेबाने चक्क तीन तोळ्याचे, शंभर नंबरी सोन्याचे पदक भास्करला जवळ बोलावून त्याच्या गळ्यात अडकवले व तो मोडक्या मराठीत म्हणाला–

"हा लडका आय मीन बॉय लै स्मार्ट हाय्. तरतरीत हाय्. व्हाइस पॉवरफुल् हाय्. स्वीट हाय्. गळ्यात बडोद्याची मिठाई हाय्. हे पदक देऊन शाबासकी देतो हाय्. थँक यू. कारण हा रामायण गाणारा लवकुश हाय्."

टाळ्यांच्या गजरात ते एवढेसे पोर ऐटीत जागेवर जाऊन बसले. साहेबाचे पदक मिळालेले ऐकून तान्हुताई आणि दक्षिणदास आनंदाने तीनताड उडाले.

दुसऱ्या दिवशी भास्करच्या आग्रहावरून स्वत: दक्षिणदास पदक सासऱ्यांना दाखवायला घेऊन गेले. भास्कर मात्र गेला नाही. म्हणाला,

"बुवांची चातुर्मास कीर्तने आहेत. त्यात मागे उभे राहून गायचे आहे. शब्द गेला आहे. तो मोडता येणार नाही. पदक बाबांना नि आईला द्या. आजवर

आमच्या खस्ता खाताना तिचे हात ओकेबोके असायचे. आता त्यांत तासाचे बिलवर झळकले पाहिजेत. असा माझा निरोप द्या."

दक्षिणादास भारावून म्हणाले, "आमच्या मेव्हण्याला रागच माहीत नाही, तर त्यागही माहीत आहे तर !

पदक पोहोचले आणि लगोलग वडिलांचे शाबासकीचे पत्र आले–

'चि. भास्कर यांस–

अनेक उत्तम आशीर्वाद.

तुझ्या सोन्याच्या पदकाचा इतिहास कळला. आणि माझे मन भरून आले. तुझ्या आईचे डोळे भरून आले. बिचारीला अंगावरचा दागिना कधी मिरवता आला नाही; कारण नवऱ्याने तो कधी केलाच नाही ! पण लेकाचे पदक साऱ्या आळीभर फिरवून आल्या. घरी आल्यावर म्हणाल्या–

"भास्कर येताजाता गायचा म्हणून नावे ठेवीत होत्या मेल्या, पण पदकाने चांगले नाक टेचले. नावे ठेवणाऱ्याच नावाजायला लागल्या."

मी म्हणालो, "लेकानं एवढं धाडलंय तुमच्यासाठी तर त्याची एकेक बांगडी करून आणतो निरोपासारखी."

तशी पटदिशी पदक छातीशी धरून तुझी आई म्हणाली, "त्याचं पहिलं बक्षीस मी देव्हाऱ्यात ठेवणार आहे. सरस्वतीने खेचून आणलेल्या या लक्ष्मीची आपल्याकडून पूजा करणार आहे."

अशी मनस्वी आहे बघ तुझी आई. तुझ्यासारखी स्वाभिमानी आणि गुणी. तिची तुला सांगी आहे–

"तुला ज्यांनी ज्यांनी गाणं शिकवलं त्यांचं ऋण विसरू नकोस. उतू नकोस, मातू नकोस. घेतला वसा टाकू नकोस. म्हणजे आयुष्याची पाचा उत्तराची कहाणी साठा उत्तरी सुफळ संपूर्ण होईल."

पोरा, परमेश्वराने तुला उत्तम गळा दिला, त्याचे सर्वार्थाने सोने केलेस. तरीपण चढून न जावे. अशीच विद्या घेत जावे. सभाधीटपणा अंगी बाणावा. लक्ष्मी आणि सरस्वतीचे वाकडे असते हे आज तू खोटे पाडलेस. उलट सरस्वती प्रकट झाली की लक्ष्मी तिचा मागोवा घेत आल्याविना राहत नाही हेच खरे.

तुझी संगीतशास्त्रावरील व गुरुजनांवरील निष्ठा तुला आणखी मोठा गायक करो हाच तुला आशीर्वाद. देवी नारायणी तुझ्यावर कृपा केल्याविना राहणार नाही.

हेच पत्री चि. सौ. तान्हूस व जावईबापूंना अनेक उ. आशीर्वाद. तसेच

तुझे गुरुजी श्री. पिंगळेबुवा यांना सा. नमस्कार, प्रकृतीस जपावे. जमल्यास दूध प्यावे. व्यायाम, प्राणायाम वगैरे करीत रहावे.
गायक व्हायचे असल्यास गानदेवताच नव्हे तर आरोग्यदेवताही प्रसन्न असायला हवी.
कळावे, बहुत काय लिहावे ?

तुझा पिता—
रघुनाथ त्र्यंबक बखले

*

## तीन

खरोखरच वडिलांच्या पत्रातला नारायणी कुलस्वामिनीचा आशीर्वाद नारायणी रागातील— ' नमामि महिषासुरमर्दिनी '— या भजनाच्या रूपाने भास्करच्या पाठीशी येऊन उभा राहिला. त्या भजनाने त्याचे नशीब उजाडले.

अठराशे ऱ्याऐंशी सालची गोष्ट. बडोद्याचे सरसुभे भाटवडेकर यांचेकडे राजकुमांराचा— फत्तेसिह महाराजांचा वाढदिवस होता. ज्या मेजवानीत छोटया भास्करने नारायणीतल्या भजनाची भेट दिली.

गुणग्राहक सयाजी महाराजांना ती इतकी आवडली की त्यांनी बडोद्याच्या संगीतशाळेत मौलाबक्षांकडे भास्करचे पद्धतशीर शिक्षण मोफत सुरू केले.

मौलाबक्षांच्या शाळेत पिंगळेबुवांनी लावलेले वळण आणखी धारदार झाले. लहान वयानुसार स्वैर गळा फिरवताना लय— तालांचे लगाम या अश्वाला वेळीच लाभले. म्हणूनच या अश्वाची घोडदौड वायुवेगाने सुरू झाली. विजयाचे झेंडे फडकवीत राहिली.

मौलाबक्षांचाही या मुलाला विशेष लळा लागला, आणि त्यांनी आपल्या रागदारीचा मळा या मुलाच्या गळयात फुलवला. कुठल्याही सरकारी समारंभात सरकारी संगीतशाळेतली मुले हटकून असत. त्यांत भास्कर अग्रस्थानी असे. आणि त्याचा लगेच गवगवाही होत असे.

अठराशे चौऱ्याऐंशीमध्ये मौलाबक्षाच्या शाळेच्या वार्षिक समारंभात भास्करने शास्त्रोक्त बाजी मारली. त्यांच्या वृत्तांत नावासकट ' सयाजी विजय ' या वृत्तपत्रात छापून आला.

हल्लीच्या वृत्तांत वा समीक्षेत वीतभर ढलपीचे हातभर लाकूड काढले जाते. गोटातल्या गायकाची वारेमाप स्तुती केली जाते. हे अर्घ्या हळकुंडाने पिवळे झालेले कलाकार मग कलेला मुजरा करायचे विसरून स्तुतीपाठकाच्या नजराच धुंदीत

राहतात. कलेचा मान राखायचे सोडून जुजबी रसिकांची मान पाहतात आणि आपल्याच कर्माने खाली जातात !

भास्कर या गावचा नव्हता. म्हणूनच वाऱ्यावर स्वार होऊन, या गुणी बाळ-गायकाची कीर्ती महाराष्ट्रातील अग्रेसर किर्लोस्कर नाटक मंडळीपर्यंत पोहोचली.

बडोद्यात कोल्हटकर म्हणून रसिक होते. योगायोगाने त्यांचे बंधू श्री. भाऊराव कोल्हटकर हे किर्लोस्कर कंपनीचे एक भागीदार आणि गायक नटही होते. त्यांनी थेट बडोद्यापर्यंत धडक मारली. कारण मालक अण्णासाहेब किर्लोस्कर स्वतःचे 'रामराज्य वियोग' नाटक बसवण्याच्या विचारात होते.

मंथरेचे काम स्वतः भाऊराव कोल्हटकर करणार होते. आणि कैकयीच्या भूमिकेसाठी सुंदर तरुण गायकाच्या शोधात कंपनीचे लोक असतानाच भास्करचा विजय दृष्टिपथात आला होता.

भाऊराव कोल्हटकरांनी भास्करचे गाणे ऐकले. आणि ते स्वतःही त्या मुला-वर फिदा झाले. त्यांना भास्करच्या जागी कैकयी महाराणी दिसू लागली. त्यांनी हजार खटपटी लटपटी केल्या. भेटीगाठी घेतल्या. सल्लामसलती केल्या.

न्या. तेलंग, दक्षिणदास, पिंगळेबुवा, मौलाबक्ष आदींच्या परवानगीने भास्करचा रीतसर पगार वगैरे ठरवून त्याला किर्लोस्कर कंपनीत मुंबापुरीस दाखल केले.

एकोणीस ऑगस्ट अठराशे चौऱ्याऐंशीत वयाच्या पंधराव्या वर्षी भास्करच्या जीवनातील नवे पर्व उघडले. किशोरवयातील भास्करवर कैकयीची भूमिका गाण्यां-सह चढवण्यात आली.

भास्करचा हा रंगभूमीवरचा पहिला वहिला पदन्यास होता. त्यातून नाटक उत्सवी स्वरूपाचे– गावाबिवाकडचे नव्हते, तर शहरगावी लागायचे होते. जाण-कारांकडून पाहिले जायचे होते. मातब्बरांकडून तोलले जायचे होते. मोठ्या कंपनी-कडून मोजले जायचे होते.

त्यातच दशरथाचे काम स्वतः अण्णासाहेब किर्लोस्कर करणार होते. वसि-ष्ठाचे काम मोरोबा वाघोलीकर करणार होते. आणि मंथरचे काम स्वरूपसुंदर सूरसुंदर भाऊराव कोल्हटकर करणार होते. ही तर मोठीच प्रभावळ होती.

पण जिद्द असते त्याच्या कष्टांना हद्द नसते. या प्रभावळीतही आपले तेज झळकावयाचेच असा भास्करने निर्धार केला. भास्करने पुन्हा पुन्हा पदांचीच तालीम घेतली. पुन्हा पुन्हा भाषणांची उजळणी केली. रात्री अंगणात शतपावली सुरू व्हायची. आणि पुन्हा कामाची उजळणी व्हायची. येता–जाता–उठता–बसता भास्क-रला एकच ध्यास लागला होता. एकच प्यास लागली होती. कैकयीचे काम पडले न पाहिजे. ते पडले तर या भास्करचे उभे आयुष्यच पडून राहील...

अखेर प्रयत्नाला यश आले. जिद्दीला फळ आले. उजळणीचे बीज आले. कष्टांच्या गणिताचा ताळा जमला. लगोलग पडताळा आला.

' रामराज्य–वियोगा 'चा पहिला वहिला प्रयोग रंगत गेला. भाऊराव मंथरा आणि भास्कर कैकयी यांची गाणी एकावर एक रंगत गेली. काही जागी तर मंथरा दासीवर कैकयी राणी वरचढपणा गाजवून गेली.

इंदूरचे गायक बंदेअलीखाँ नाटकाला आले होते. ते नाटक संपताच आत आले.

अण्णासाहेब, भाऊरावांनी त्यांचे स्वागत केले. सर्वांनी पुढे होऊन प्रणाम केला. एवढ्या मोठ्या कलाकारासमोर जायला भास्करच लाजला. रंगपटातच थांबला. तशी खांसाहेबच इकडे तिकडे बघत चौकसले–

" वो– ' जो मम नयनचकोरा इंदू ' गानेवाला लडका कहाँ है ? "

भास्कर भीत भीत किर्लोस्करांच्या आज्ञेवरून बाहेर आला आणि खां साहेबांच्या पायावर पडला. तशी बंदेअलिखाँ आशीर्वाद देऊन गेले–

" लडका, तुला भगवानाचे वरदान आहे. गले मे कोयल और देखनेमे मयूर है । कोयलाचा सूर. आणि मयूराची लय पकड. म्हणजे बडा गायक होशील. "

पुढे प्रत्येक गावच्या प्रत्येक प्रयोगाच्या वेळी त्या थोर गायकाचा हा अमूल्य आशीर्वाद भास्करची पाठशिवण करीत येई. त्यांच्या पाठीशी उभा राही. त्याला जोमाने पुढे ढकलत राही. त्याच्या गळ्याला नवी ताकद देई. स्वरांना नवी नक्षी देई.

हळूहळू किर्लोस्कर कंपनीत भास्करचे बस्तान चांगले जमून गेले. जिकडे तिकडे रामराज्य–वियोगाचे खेळ होऊ लागले. नाव आणि पैसा दोन्ही देऊ लागले.

भास्कर कैकयीचे काम ईर्ष्येने करू लागला. गाठ भाऊरावांगत मातब्बराशी होती. जनतेचा हा लाडका भावड्या आधीच भाव खाऊन बसला होता. नाव करून बसला होता. त्यामुळे एखाद्या छोट्या कुस्तीगिराची मोठ्या कुस्तीगिराबरोबर कुस्ती ठरावी आणि त्या छोट्या पठ्ठ्यानेच ती जिंकावी, तशातलाच प्रकार होत होता.

वास्तविक मुरलेला लहानाला पाच मिनिटांत चितपट करतो. अस्मान दाखवतो.

प्रथम प्रथम भाऊरावांसारख्या रूपसुंदर–गानसुंदर आणि अभिनयसुंदर नटाला तसेच वाटत होते. पण अण्णा किर्लोस्करांची तालीम वाया गेली नव्हती. तालीम देणाऱ्या देवल मास्तरांच्या लकबी अस्थानी रुजल्या नव्हत्या. स्त्रीचे बोलणे–चालणे–लचकणे–मुरडणे–रुसणे–फुगणे सारे भास्करच्या नसानसांत भिनले होते.

कंपनीतले दुसरे एक गायक नट बाळकोबा नाटेकर यांची पाठशिवणही सत्कारणी लागणार होती. कारण बाळकोबा अष्टौप्रहर गायनाच्या गुंगीतच असत. आणि भास्करही इतर सटरफटर गोष्टींकडे काणाडोळा करून नाटेकरांच्या गाण्याशी नाते जुळवीत असे. कारण त्याचे तेच एकमेव पिसे.

अशातऱ्हेने कैकयीने झपाटल्यामुळे रामराज्य-वियोगातली कैकयी दासीइतकीच प्रभावी होऊ लागली. श्रोत्यांना दोन वेगवेगळ्या गायकी ऐकण्याचा आनंद देऊ लागली. भाऊराव कोल्हटकरांचा गळा हलकाफुलका, गोड– पिलुखमाजसारख्या चंचल स्वभावाच्या रागरागिण्यांना शोभणारा.

उलट भास्करचा गळा शास्त्रोक्तचे लेणे ल्यायलेला. त्यामुळे रागदारीतल्या चालींची त्याची फिरत आणि बरत वाखाणण्याजोगी असे. बडोद्याला बाळशास्त्र्यांकडे घेतलेल्या संस्कृतच्या ज्ञानामुळे शब्दांची फेकही अचूक असे.

त्या दिवशीही प्रयोग असाच रंगला होता. मंथरेच्या–

' उद्या बघ जाते नृपसिंहासन रामाते. '

या पदानंतर कैकयीचे आलेले पद वरताण झाले–

' मम सुत भरत जरी असला–'

नंतरचे मंथरेचे–

' रामकरी जरी नृपपद गेले '

झाले. भाऊरावांची स्वरांची कामगत श्रोत्यांना मोहीत करून जाते न जाते, तोच कैकयीच्या रूपातला भास्कर आळवून आळवून गाऊ लागला–

" जो मम नयन चकोरा इंदू–"

तेव्हा गानलुब्ध श्रोते स्वतःच चकोर झाले. आणि कैकयीच्या रूपातल्या इंदूचे चांदणे कानांच्या ओंजळीने भरभरून पिऊ लागले.

" अहाहा !" " वाहव्वा !" इत्यादी स्तुतीसुमनांत कैकयी भिजून चिंब झाली.

पण या वर्षावातही कोरडा राहिलेला– नव्हे, नजरेने अंगार उधळणारा एक प्रौढ श्रोता अगदी शेवटच्या रांगेत बसला होता. तो नाटक संपत आले तेव्हा अधिकच तापला.

तिकडे रंगभूमीवर कैकयीची चढत्या बढतीची जोषपूर्ण गाणी टाळ्या घेत होती.

" वृषपर्व्याशी युद्ध चालले स्वर्गलोकी जेधवा
संन्निध होते मी तेधवा."

–पण सन्नीध आलेला लेक नाटकी झाल्याने दुरावला– बिघडला अशा पोटतिडकीने नाटक पहायला बसलेला तो प्रौढ आणखीनच संतापला ! चिडून

स्वत:शीच पुटपुटला–

'शीऽऽ नाटक संपत आलं पण भास्कर दिसलाच नाही. कुणा दासी–बटकीच्या रूपात असेल– दोन-चार क्षण दिसेल, असं वाटलं होतं. पण ते फोल ठरलं ! नाटकात जाऊन मूर्खाचे जन्माचे नाटक झाले नाही म्हणजे मिळवली !

नाटकातली माणसं चंगीभंगी असतात. व्यसनी असतात. गाण्याबजावण्यापायी वेसवांच्याही नादी लागतात. कोसळलेला दगड आणि कोसळलेला माणूस यांची अखेर मातीच व्हायची...

बोलून चालून हलका धंदा हा ! पंधरा-सोळाच्या मुलाला हलकाच करणार! त्याचं तसलं कसलं घाणेरडं रुपडं पाहण्यापेक्षा विष खाऊन मेलो असतो तरी परवडलं असतं...

पण नाही, हा रघु बखले चाकरी जाऊनही थोरल्या मुलाकडे वीसनगरला तुकडे मोडतोच आहे ना ? अजून मेलो नाही ना ? मनाने संन्यासी झालो तरी देहाने भोगतोच आहे ना ?"

जातो, असाच रंगपटावर जातो. पोराच्या दोन मुस्काटात देतो. त्याला फर-फटत गावी नेतो. गाढवावरून धींड काढतो. नि ताळ्यावर आणतो...'

आणि रघुनाथपंत खरंच रंगपटाच्या दाराशी नाटक संपल्यानंतर वेगाने पाय आपटीत भिवई चढवून उभे राहिले.

नाटकातून परतणारे लोक मोठमोठ्याने कैकयीची स्तुती करीत होते– "त्या नव्या पोराने आधीच्या अंकात डोळ्यांतून टिपं काढली आणि नंतरच्या अंकात डोळ्यांतून ठिणगीही पेटवली. धन्य त्याच्या कामाची– अस्खलित वाणीची आणि अलौकिक गळ्याची !"

दुसऱ्या श्रोत्याने साथ देऊन म्हटले– "अरे काही गाण्यांत तर भावड्याला चक्क खाऊन टाकलंन्."

"अण्णा किर्लुस्करानं कुठून हे नवं रत्न पैदा केलंय् त्यांचं तेच जाणोत."

पण या बहुरूपा जनवाणीकडे रघुनाथरावांचे लक्ष नव्हते. त्यांच्या देहात दुर्वास राहायला आले होते. आणि डोळ्यांत जमदग्नी अवतरले होते !

तोच रुबाबदार अण्णासाहेब किर्लोस्कर बाहेर आले. त्यांनी त्या गृहस्थांची आदराने चौकशी केली. तशी ते आपल्याच तंद्रीत म्हणाले–

"हा देह रघुनाथ त्र्यंबक बखले या नावाने ओळखला जातो. आणि भास्कर बखलेचा बाप म्हणूनही ओळखला जातो. त्याला सांगा– तुमचे तीर्थरूप तुम्हाला मुसक्या बांधून न्यायला आले आहेत. चंबुगबाळं आवरा नि घरी चला. इथं नाटकात गड्यांची कामं करण्यापरीस कुठंतरी भल्यामाणसाच्या पदरी चाकरी लावून देतो."

अण्णासाहेब शांतपणे म्हणाले—

"नाटकातली माणसं भली नसतात असं थोडंच आहे ? मी एक कंपनीचा मालक— अण्णा किर्लोस्कर तुम्हाला विचारतो. अहो धंदा कुठलाच वाईट नसतो. तो रागावणारा माणूस त्याला भलाबुरा बनवत असतो."

उंच नीच— भारी अंगरखा— मोठे पागोटे आणि भरजरी शालजोडीतल्या अण्णासाहेब किर्लोस्करांच्या व्यक्तिमत्त्वाने भारावलेले रघुनाथपंत या युक्तिवादाने एकदम विरघळले. त्यांचा चढलेला पारा किंचित खाली आला. तशी अंदाज येऊन प्रभावी नाटककार आणि प्रभावी नट असलेल्या किर्लोस्करांनी आणखी एक ठेवणी-तले वाक्य टाकले—

"आपल्या चिरंजीवांचे भवितव्य फार उज्ज्वल आहे. अनुभवाने सांगतो की देवी सरस्वतीचा आशीर्वाद घेऊन पोर जन्माला आलं आहे. नारद तुंबरांची वाहव्वा मिळावी असा गातो आहे. त्याच्या गळ्यातून सुधा स्रवते आहे. आणि डोळ्यांतून विद्युल्लता वाहते आहे."

तरीही संन्याशाची कथा मूळपदावर येऊन— मान हिसडून रघुनाथराव म्हणाले— "पोरगा तुम्हाला हवाय म्हणून उगीच हरभऱ्याच्या झाडावर चढवू नका."

"तसं नाही हं. इथं हिरा तेज फाकेल तोवर हिरा असतो. पण तेज संपले की गारेचा दगड होऊन कचऱ्यात पडतो."

"कचरा काय नि गड्याचं काम करणं काय— एकच."

"आपला गैरसमज होतो आहे. आपला सुपुत्र गडी झालेला नसून या नाटकात दशरथाची पट्टराणी झालेला आहे."

रघुनाथराव एकदम गडबडून म्हणाले, "म्हणजे— म्हणजे ?— ती चढ्या पट्टीत गाणी गाणारी देखणी कैकयी..."

"म्हणजेच हा आपला भास्कर, बाबा."

पित्याचा आवाज ऐकून भास्कर धावत आला आणि वाढवलेल्या केश-संभारासकट रघुनाथरावांच्या पायावर कोसळला.

रघुनाथराव पाहतच राहिले केवढा बदलला होता भास्कर ! किती देखणा दिसत होता भास्कर. किती उमदा दिसत होता भास्कर ! ! !

किर्लोस्कर कंपनी थाटामाटात चालली असल्याने भास्करला सकाळ-संध्याकाळ दूध देण्यात येत होते. त्याच्या तब्बेतीची निगा राहावी म्हणून बदाम— बेदाणे— जर्दाळू— पिस्ते इत्यादी खुराक म्हणून दिले जात होते.

मुलाला मिठीत घेऊन त्या मोहक रूपाकडे रघुनाथराव टकमक पाहत राहिले. तोच अण्णासाहेब म्हणाले—

"आपल्याला विदित नसले तरी आपले जामात दक्षिणदास यांना सारे माहीत आहे. कदाचित आपली परवानगी मिळणार नाही म्हणून आपणास कळवले नाही ही चूकच झाली. क्षमा असावी. तरीपण मुलगा कंपनीत पळून-बिळून आलेला नाही. तो सदाचारी नि सद्विचारी आहे. खुद्द बडोदे सरकारांचीही त्याच्यावर मर्जी आहे. त्याच्या गाण्याची पेपरांतली तारीफ वाचून आमच्या हुकुमावरून स्वत: भाऊराव कोल्हटकर बडोद्यास गेले. आपल्या चिरंजीवांचे गायन ऐकून हर्षित झाले.

नंतर दक्षिणदास, पिंगळेबुवा, न्यायमूर्ती तेलंग, मौलाबक्ष या सर्वांची परवानगी काढूनच त्याला इकडे आणलेय. बाळकोबा नाटेकराकडे त्याच्या गाण्याच्या शिक्षणाचीही व्यवस्था करण्यात आली आहे. स्वत: देवलमास्तरांनी भूमिका बसवून दिली आहे नि गाणीही सांगितली आहेत.

माझी किर्लोस्कर कंपनी ही भुरटी कंपनी नाही. आज उगवले उद्या मेले अशी भूछत्रांची जात नाही. ही दुर्वांची वेली आहे. ती अमर आहे.

इथे नटांना भरपूर भोजन, आणि भरपूर वेतन दिले जाते. आणि वर्षअखेर सरकारी नोकरीप्रमाणे बोनसही देण्यात येतो— नफा वाटला जातो.

नाटक झाल्यावर कंपनीतर्फे सर्वांना भोजन असते. आज बरा आम्हाला मोठा ब्राह्मण पंक्तीला मिळाला."

दोन दिवस किर्लोस्कर मंडळींच्या पंक्तीला आणि संगतीला राहून खूष होऊनच रघुनाथराव परतले. परतताना पित्याजवळ घरच्यांची चौकशी करून आपली मारी गंगाजळी द्यायला पितृभक्त भास्कर चुकला नाही. आणि त्याचे मालक अण्णा किर्लोस्करही या ब्राह्मणाला योग्य दक्षिणा देऊन दाक्षिण्य दाखवायला विसरले नाहीत.

रघुनाथराव मोठ्या समारंभात वीसनगरला पोहचले. जाताना जमदग्नी झालेला हा माणूस येताना अग्नी विसर्जित करून आलेला पाहून जानकीबाईंचा जीव एकदम भांड्यात पडला.

आल्या आल्या पैशांची पुरचुंडी बायकोच्या हवाली करून ते समाधानाने म्हणाले— "अहो, सरळ सूत असून वाकडं भूत समजलो आम्ही तुमच्या लेकाला."

"तरी मी स्वारीला सांगत होते— माझा भास्कर नाटकात गेला तरी बिघडणार नाही. अहो, कसाला उतरलेलं सोनं आहे ते. चिखलात जावो, नाहीतर राखेत जावो, त्याचा कस कमी व्हायचा नाही."

"अहो, तो कुठला राखेत जातो. चांगला सिंहासनावर बसतोय. आम्ही मात्र नाहक डोक्यात राख घालून बसलो होतो. असा राजबिंडा दिसतोय म्हणता. कैकयी होऊन— शालू नेसून आला तेव्हा हुबेहूब राणीच वाटला. ओळखलाच

नाही."

"खाणं-पिणं चांगलं असणार, जसं खाणं तसं दिसणं. 'तूप तसं रूप !'"

"अहो, दुधातुपात लोळतोय नुसता. कुठे इथले काटे-फुफाटे नि कुठे तिथले बदाम-पिस्ते. आम्ही पंक्तीला राहिलोय नि खात्री करून घेतली. डावीकडे चटणी कोशिंबीर, उजवीकडे ओलीभाजी– कोरडीभाजी. उसळ-कढी. गरमगरम चपात्या. सायीचं दही. आंबेमोहराचा भात. काही विचारू नका."

"अहो कैकयीराणीला असंच जेवण हवं. सर्वसाधारण हादडायला ते काय तुम्ही आम्ही आहोत ? लोक काहीच्या बाहीच सांगत होते. खोटारडे. स्वतः जाऊन खात्री करून घेऊन आलात. बरं झालं. डोळे नि कान यांत चार बोटं अंतर असतं असं म्हणतात. ते उगाच नाही."

"आपण ठरवून टाकलंय. थोरल्याचं वीसनगरला लागी लागलंय. तान्हू नि जावईबापू दक्षिणादास बडोद्यात खाऊन-पिऊन सुखात आहेत. भास्कर तर खोऱ्याने पैसा ओढणार आहे. पर्वतभर कीर्ती मिळवणार आहे.

आता संसारात मिळवायचं काही राहिलेलं नाही. म्हणूनच आजवर डोक्यात घातलेली राख अंगाला फासायला हरकत नाही. नि संन्यास घ्यायलाही हरकत नाही."

"काहीतरीच काय ? धाकट्याचं लागी लागलंय का ? लक्ष्मी मिळाली तरी गृहलक्ष्मी मिळाली का ?"

पत्नीची नजर टाळीत रघुनाथराव म्हणाले– "मग म्हणाल नातवंडाचं तोंड पाहायला हवं. मग आलं त्याचं मौंजीबंधन. छे, छे, या बंधनात पडायच्या आत मनाचा स्वैर उडणारा पतंग आखडून घेतलेला बरा."

रघुनाथराव बोलल्याप्रमाणे वागले. लौकरच गृहस्थाश्रम सोडून संन्यासाश्रमी झाले.

*

## चार

जेमतेम काही महिने गेले आणि संसाराचा संन्यास घेतलेल्या रघुनाथरावांनी लवकरच जगाचाही संन्यास घेतला.

तिकडे किर्लोस्कर मंडळीत कैकयीच्या भूमिकेबरोबरच नारद आणि श्रीकृष्ण यांच्या संगीत भूमिका अधूनमधून करणाऱ्या भास्करला ही दुःखद वार्ता समजताच

तो हळवा पितृभक्त मुलगा धावत बीसनगरला आला.

वडिलांचे दिवस झाल्यावर खिन्न अंत:करण आणि त्यात रुतलेला बिरहाचा बाण घेऊनच तो परतला. आई बीसनगरच्या विवाहित वडील बंधूंकडे होती. तेवढाच दिलासा होता.

या पोरक्या मुलावरची आण्णा किर्लोस्करांची मायापाखर आणखी दाट झाली. आणखी गडद झाली. ते त्याला अधिक जपू लागले.

कलेसारखी दुःखावर दुसरी औषधी नाही. भास्करने आपले दुःख तंबोऱ्याच्या तारेत बिरघळून टाकले. अण्णा त्याला समजावून घेत. रियाजाला वेळ देत.

पण दुर्दैवाने हा किर्लोस्करांच्या रूपातला पितृतुल्य आधारही दोन नोव्हेंबर रोजी काळाने अकस्मात हिरावून नेला ! ऐन चाळीशीत किर्लोस्कर कंपनीचा हा गरुड पुन्हा न परतण्यासाठी अनंतात उडून गेला ! आणि भास्करच्या रूपातले छोटे पाखरू आणखीनच केविलवाणे आक्रंदन करू लागले.

तो असा अस्वस्थ दिसला की कंपनीतले गायनगुरू बाळकोबा नाटेकर त्याला तंबोरा आणून देत आणि म्हणत, " कर रियाज. दुनियेतल्या अलम दुःखावर तोच इलाज. "

थोरांनी मनापासून दिलेले आशीर्वाद त्यांच्या मृत्यूनंतरही पोरांच्या पाठीशी उभे राहतात. पिता आणि पितृतुल्य अण्णासाहेबांनी दिलेले आशीर्वाद भास्करचे त्यांच्या मृत्यूनंतरही भलेच करून गेले.

कंपनीचा मुक्काम इंदूरला होता. त्यावेळची गोष्ट. बंदेअलीखाँ कंपनीच्या बिऱ्हाडी आले आणि भास्करला गंडाबंद शिष्य करून घ्यायचे जाहीर केले. भास्करचा खुला, खडा, मधुर आवाज यावर गुरू फिदा झाला.

नारळ, हार, पेढे, चणे, गूळ सारी तयारी स्वतःच घेऊन आले. नंतर कंपनीच्या आणि बाहेरच्या काही बुजूर्गांना बसवून गुरूने स्वतःच्या हाताने शिष्याला चणे आणि गूळ भरवले. प्रदक्षिणाकार बसलेल्या प्रेक्षकांतून गंडा फिरवण्यात आला आणि नंतर तो शिष्याला बांधण्यात आला.

या बहुमानाने भारावून भास्कर भरून आलेल्या गळ्याने म्हणाला, " आज मी आपला गंडाबंद शिष्य झालो खरा, पण माझ्याजवळ आपली गुरूदक्षिणा देण्या-इतकेही पैसे नाहीत. "

त्याची पाठ प्रेमाने थोपटीत स्वतःच्या थैलीतली दक्षिणा काढून ते म्हणाले, " आता आपण— तूपण दोन नव्हे. हे पैसे घे आणि मला दक्षिणा दे. तुम्हा हिंदू लोकांत समुद्राचेच पाणी घेऊन त्यालाच अर्घ्य देतात ना ? तसेच. "

" पण— पण— आपण इंदूरात. आपल्या सहवासात मला कायम इंदूरात राहता येणार नाही. अण्णांना माझा शब्द गेला आहे. ते असोत नसोत. तो मला

पाळलाच पाहिजे."

"ठीक आहे. इंदूरात असशील, येशील तेव्हा शिकत जा. तुझ्या खड्या-गोड- गोल आवाजीला लगाम घालून योग्य दिशेला नेले नाही तर भरकटशील-वाया जाशील म्हणून हे गंडाबंधन. तुझ्या गायकीला शिस्त यावी म्हणून हे गंडा-बंधन.

अरे होऽऽ आपली तुपली पहिली जानपेहेचान झाली ते रामराज्य-वियोगातले 'जो मम नयन चकोरा इंदु-' आजच्या या गंडाबंधनानिमित्त ऐकव बघू."

या प्रस्तावाने श्रोते आणि गायक दोघेही खूष झाले. तंबोरा काढण्यात आला. सारंगी पुढे सरसावली. तबलाही थाप मारून सज्ज झाला आणि दैवी सुरात भास्कर गाऊ लागला-

"जो मम नयनचकोरा इंदू
नाही ज्याला मत्सर बिंदू ।
दुर्भाग्ये तू नच त्या निंदू
माझ्या रामा गऽऽ -१
प्राणप्रीय ज्या सर्वही बंधू
गुणरत्नांचा निर्मळ सिंधू ।
आपपरतेचा नाही गंधू
मुनी विश्रामा गऽऽ -२
कौसल्येहुनी ममता करी
करुणासागर तो मजवरी
तरेल पातकी जरी उच्चारी
त्याच्या नामा गऽऽ -३
रामा भरता भेदची नाही
दोनी मुर्ती एकची पाही
ही मी आण नृपाची वाही
कळले गऽऽ -४"

त्यानंतर खाँसाहेबांनी स्वतः-

"भोर भऔ मीलन बहीलवा
मोरी माई प्रीतम संगवा-"

ही जैनपुरीतली चीज भास्करला शिकवली आणि समारंभाची सांगता झाली.

त्यानंतर खोली घेऊन भास्कर रियाज करू लागला. रंगभूमीवरच्या कामा-व्यतिरिक्त सर्व वेळ रियाजात घालवू लागला. देसी-तोडी हे सकाळचे, मुलतानी-भिमपलास इत्यादी संध्याकाळचे आणि बागेश्री-मालकंसादी रात्रीचे रागही त्याने

झपाट्याने आत्मसात केले.

उत्तम गायक होण्यासाठी केवळ गोड गळा उपयोगी पडत नाही, तर अखंड मेहनत आणि जातिवंत प्रतिभा यांची आवश्यकता असते हे भाऊराव कोल्हटकर विसरले आणि भास्करशी स्पर्धा करू लागले.

एखाद्या वेळी त्यांना जुगलबंदीची लहर येई. त्यांची आणि भास्करची शर्यत सुरू होई. पण वयाने भाऊराव वाढले तरी अनुभवाने भास्करही वाढला होता.

त्यामुळे भास्करची एखादी कूटतान भाऊरावांवर मात करून जाई. मग दाणदाण पाय आपटीत मनोमन भास्करचा हेवा करीत भावड्या त्याच्या खोली-तून निघून जाई. पण त्या पावलांत असलेली तेढी लय नंतर कितीतरी वेळ भास्करच्या कोमल हृदयाचा थरकाप करीत राही.

बंदेअलीखाँचे बीनवरचे गाणे ऐकण्याच्या नादात एक दिवस त्यांच्या मागे बसून तंबोरा वाजवणाऱ्या भास्करला बीनचे भान ठेवता ठेवता तंबोऱ्यावरचे भान सुटले. तारा जोरात वाजवल्या जाऊ लागल्या. तशी बंदेअलीखाँनी हसून समज दिली–

"पोरा, श्रोते तुझे तंबोरावादन ऐकायला आले नसून माझे बीनवादन ऐकायला जमले आहेत."

बाळकोबा नाटेकरांनी दिलेल्या शिक्षणाला आता अधिक सूक्ष्म नजर आली. गायकीतल्या मोक्याच्या जागा समजू लागल्या. बंदीशीतल्या रागाच्या खाणाखुणा समजू लागल्या. आवाजातला हमखास लगाम–ठराविक जागांमागचा विश्राम-वरचे व खालचे स्वर हुकमी लावता येणे–आवाजात घनता आणि गोडवा आणणे, मिंड–मुर्की–तान बोलताना इत्यादींवर ताबा मिळवणे, बंदेअलीखाँच्या सहवासातच जमू लागले.

बंदेअलीखाँची चुन्नाबाई नावाची शिष्या होती. ती स्वतः गाणं शिकायला यायची. आणि भास्करचीच शिकवणी ऐकत बसायची. स्वतः गाण्यापेक्षा श्रवण-भक्तीचेच पुण्य अधिक मानायची. कारण भास्करच्या शिकवणीत केवढातरी रस, केवढातरी कस असायचा.

पण एकदा दोनचार दिवस चुन्नाबाई आलीच नाही. म्हणून खाँसाहेबांनी भास्करला त्यांची खबर घेण्यास पाठवले.

बाई आजारी होती, आणि घरी अन्नान्न परिस्थिती होती. औषधाची नितांत आवश्यकता होती. भास्कर गोंधळला. खिशात रोकडा पैसा नव्हता. त्यामुळे क्षणभर खट्टू झाला.

पण दुसऱ्याच क्षणी त्याचे लक्ष स्वतःच्या हाताकडे गेले. हातातले सोन्याचे सल्ले नुकतेच बक्षीस मिळालेले होते. ते मूक भाषेत काही संदेश सांगून गेले.

भास्कर उठला. तडक सराफकट्ट्यावर गेला. सल्ले मोडून त्याचे पैसे घेऊन गुरुभगिनीला औषध घेऊन आला. नंतर ती बरी होईपर्यंत औषध आणत राहिला.

बरे झाल्यावर बाई तोंडभरून आशीर्वाद देऊन गेली– " बेटा, तू मला दवा दिलास म्हणून मी तुला दुवा देते आहे. मोठे मोठे संगीतकार तुला बेटा म्हणून जवळ करतील. "

चारसहा महिने झाले. आणि कंपनीचा मुक्काम इंदूराहून हलला. आणि बंदेअलिखाँ आणि ते देत असलेली बहुमोल विद्या यांना रामराम ठोकण्याचा प्रसंग आला. शिष्याच्या डोळ्यांत विरहाचा सागर उफाळला! त्याची लाट गुरूच्या हृदयावर जाऊन आदळली. त्या कलाकाराचे हृदय हलवून गेली. हेलावून गेली.

आसूभरल्या नजरेने भास्कराचा हात हाती घेऊन ते म्हणाले, " जुग जुग जियो मेरे लाल. मला दुरावलास तरी मी दिलेल्या विद्येला दुरावू नकोस. ती गळ्यातून हिरावू नकोस. तू या बंदेचा गंडेबंद शागीर्द आहेस हे विसरू नकोस. "

आणि गंड्यावर मान टेकवून ते स्फुंदत म्हणाले, " उस गंडेकी लाज रखो."

त्यानंतर नानासाहेब पानसे या नृत्य शिक्षकाचा सहवासही भास्करला झाला. आणि तोही या हिऱ्याला पैलू पाडून गेला. लय पक्की करून गेला. गळ्यातच नव्हे, तनामनांत भिनवून गेला.

नाना पानसेंचा मृदुंगावरचा हात अप्रतिम होता. तो ऐकताना कुणी रंभा-उर्वशीच इंद्रलोकीहून भू-लोकी येऊन नृत्य करीत आहेत, असा मधुरभास भास्करला होऊ लागला. बगळ्यांच्या पाखांत लपलेली लय–मयुरांच्या पिसाऱ्यांत कोरलेली लय आणि इथेतिथे विश्वभर भरलेली लय नाना पानसेंच्या मृदुंगानेच भास्करला दिली.

पुढे सौभद्र नाटकात एक नृत्य बसविण्यात आले. आणि ते काम भास्करला देण्यात आले. लयीचे सौन्दर्य कळलेला भास्कर, ते नृत्यही जीव तोडून शिकला. नटराजाची मूर्ती मनश्चक्षुसमोर आणून डौलदार पदन्यास करू लागला.

जनरल रेशीमवाले सौभद्र बघायला आले होते. ते नाटक संपल्यावर रंगपटात आले. आणि भास्करला शाबासकी देऊन म्हणाले, " ये नाचनेवाला छोकरा गायन-नर्तन और दर्शन तिनोंमे अफलातून है। "

पलीकडे सुभद्रेचे कपडे उतरवणाऱ्या भावड्याच्या कपाळावर हा सोहळा पाहाताना सूक्ष्मशी आठी पडली. ती भास्करच्या नजरेतून सुटली नाही. पण भास्करने तिकडे काणा-डोळा केला. कलेच्या गंगौघात असले कसले ओहोळ गढळ

घेऊन आले, तरी गंगेने थांबायचे नसते, पुढेच जायचे असते, हे भास्करबुवा समजून होते.

त्यानंतर भास्कर संधी मिळेल, तेव्हा कार्यप्रसंगात होणारे कलावंतिणीचे नृत्य न चुकता पाहू लागला. त्यांतली सौन्दर्यस्थळे टिपू लागला. मनात बिंबवू लागला. कथ्थक, मणिपुरी, कथाकली, ओडिसी इत्यादी अनेक नृत्यप्रकार त्याला समजू लागले. काही पानसेंनी समजावून दिले. भास्करची सौन्दर्यदृष्टी अशातऱ्हेने विशाल झाली. त्याच्या गाण्याला नवा डौल देऊन गेली. नवा नखरा बहाल करून गेली.

अनेकदा असेच कुणा सरदार-दरकदाराच्या लग्नातले नृत्य मित्राबरोबर पाहायला भास्कर गेला होता. नृत्य ऐनरंगात आले असताना तो रंगेल मित्र भास्करला म्हणाला, "बे, लवंडीका मुखडा कितना खुबसुरत है। आपला तर दिल् खलास झाला."

संस्कारित भास्कर ओरडला, "चुप ! मी कंचनीचा मुखडा पाहायला आलो नाही, तर तिच्या चरणांतून आविष्कार करणारा तालाचा तुकडा ऐकायला आलो आहे. अरे, या लयीवरून हजार मृदुंग कुरवंडून टाकावेत. तुझ्या एकटचा फालतुक दिलाची काय कथा ?"

मित्र लाजला. गुपचूप निघून गेला.

एक दिवस पानसे रंगात येऊन शिष्याला म्हणाले–

"भास्कर, अरे लय माणसानेच पकडलेली नाही, तर तो ज्या पृथ्वीवर राहतो त्या पृथ्वीलाही चुकलेली नाही. मला नेहमी वाटते की, वसुंधरा ही महान् नर्तिका आहे युगानुयुगे तिचा पदन्यास चालू आहे. या कल्पनेवरची एक कविताच तुला मी ऐकवतो."

"ऐकवा ऐकवा गुरुजी. मी उतरवूनच घेतो."

मृदुंगाच्या भरघोस लयीत–आपल्या भरदार आवाजात पानसे ऐकवू लागले–

"एकदा, कधी पृथ्वी नव्हते.
नटराजाच्या चरणांमधले घुंगुर होते.
तांडवातली सम साधोनी मुरडत होते.
एकदा जधी पृथ्वी नव्हते पृथ्वी नव्हते......... १
अशी कधीशी सदाशिवाला ये बेहोषी
लय नाटोपे थय थय बिजली जैशी.
मृदुंग झाला आषाढाचा मेघ सावळा
वाजविताना मुखी नभाच्या फेसच फुटला......... २

सुटले वादळ-चराचरच हो कंपित विचलीत
तुटले मीही आणि निघाले अशी तरंगत.
उरांत फुटले तरी लयीतून सुटले नव्हते
नटराजाचे घुंगुर, मी तर पृथ्वी नव्हते......... ३"

"अहाहा ! पृथ्वीचा जन्म असा लयीतून झाला आहे तर."

त्या लयीतच ती दिव्य बैठक संपली. तोच पानसे भास्करच्या पाठीवर हात ठेवीत म्हणाले, "भास्कर, एक ना एक दिवस लोकांनीही म्हटले पाहिजे–"

"काय ?"

"एकदा कधी भास्कर नव्हता,
सरस्वतीच्या वीणेमधली तारच होता..."
तारच होता–तारच होता......
त्या शब्दांच्या तारेतच भास्कर खोलीवर गेला.

*

## पाच

रंगतीची ही पौर्णिमा फार दिवस टिकली नाही. पौर्णिमेलाच जोडून आमावस्या आणि भरतीनंतर झुकती असतेच ना ?...

भास्करचा लयदार–धारदार–मधुर आवाज एकाएकी काम देईनासा झाला –फुटला ! आजपर्यन्तचा हुकमी आवाज भर प्रयोगात दगा द्यायला लागला. ठरलेल्या पट्टीत गाऊ देईना. ठरवलेला सूर लावू देईना. तसा भास्कर एकदम नाराज झाला.

आजवर मनातला आणि कंठातला स्वर जसा एकदम उमटत असे. आता मनात एक सूर आणि जनात दुसराच, अशी दुरवस्था होऊ लागली.

'जो मम नयन चकोरा इंदू–' मधल्या चंद्राला जसे एकाएकी ग्रहण लागले ! रसीकरूपी चकोरांना त्या इंदूचे चांदणे पारखे झाले. प्रेक्षक नाराज होऊ लागले हे पाहून भास्कर त्याहून नाराज होऊन गेला.

एखाद्या हुकमी एक्क्याचे एकदम सामान्य पान होऊन जावे आणि कवडीमोलाचे ठरावे, तसे झाले. कैकयी महाराणीची महत्त्वाची संगीत भूमिका आवाज फुटलेल्या भास्करला देण्याइतके भाऊराव भोळे नव्हते. या व्यवहारी माणसाने कंपनी नफ्यात चालवण्याच्या दृष्टीने भास्करचे ते काम काढून घेतले. आणि हलकी सलकी कामे देण्यास सुरवात केली. तशी भास्करला आपल्या भवितव्याची काळजी

वाटू लागली.

तरी कसेही असो. तो अजून किर्लोस्कर मंडळीच्या आश्रयाखालीच राहत होता. तिथलाच घास सर्वांबरोबर खात होता. नाटक संपल्यावर फार दमला तर तिथेच पथारी टाकून झोपत होता.

खरे म्हणजे गेले कित्येक दिवस भास्करच्या हृदयसागरावर अपमानाच्या लाटा उसळत होत्या. त्याच्या मनाची भरती–ओहोटी चालू होती. अस्मितेला भरती आली, की स्वाभिमानी मन म्हणे–

"चल. सोड कंपनी. कर सुरू गाण्याची तपस्या. भर खर्ज. आण पुन्हा गळा ताळ्यावर. जाग पुन्हा बंदेअलीच्या गंड्याला."

पण भोजनाची वेळ झाली की गळ्यातल्या गाण्यावर पोटातली भूक मात करी. आणि ओहोटी सुरू होई. दुसरे मन म्हणे–

"येथून निघशील, पण कुठे जाशील ? वीसनगरला भावाकडे ? हो. पण दादाचं नवीन लग्न झालंय्. नव्या नवलाईचा संसार सुरू झाला आहे. त्यातच विधवा आईचा भरीभार वाटतो आहे. त्या दोन ओझ्यांत हे तिसरं ओझं कुठं नेऊन टाकू !

नात्याने गोत्यात आणायचे नसते. फक्त गोतात रहायचे असते.

का–का जाऊ इंदूरला बंदेअलीखांकडे ? ते नक्की जवळ करतील. पण मला लाज आहे की नाही ! मुक्तहस्ताने ते विद्या बहाल करत असताना मी रिक्त-हस्ताने गुरुदक्षिणा कशी साजरी करू ?"

हे ओहोटीचे कढ भास्कर आतल्या आत गिळत राही. फुटलेल्या गळ्याला आणि चढलेल्या रागाला काबूत आणण्याचा प्रयत्न करीत राही.

पहिली खोली सोडून चार आठ आण्याच्या भाड्याच्या छोट्या खोलीत रियाज करीत राही.

एक दिवस रियाजाच्या नादात कंपनीत यायला उशीर झाला. खरे म्हणजे त्या दिवशी नाटक नव्हतेच. तरीपण किर्लोस्कर मंडळीचे मॅनेजर साठे यांनी हवेतसे तोंडसुख घेतले. कारण गायक नसलेली मुलं म्हणजे कंपनीचे सांगकामे नोकरच, अशी त्यांची समजूत होती.

हाडाचा गायक असलेला भास्कर गळा कामातून गेल्याने फालतू कामांसाठी राबवला जाऊ लागला होता. त्याची किंमत मॅनेजरच्या लेखी पोटार्थी कामगाराच्या पलीकडची नव्हती. ते काही म्हणोत, भास्कर या कानांनी ऐकून त्या कानांनी सोडून देत होता.

आणि त्यातच एक दिवस कंपनीच्या आचाऱ्याने स्वयंपाक बिघडवला. भाजी एकदम बिघडवली.– बेकार झाली. तशी सर्वांनीच खड्या सुरात तक्रार सुरू केली–

"अरे ही काय भाजी आहे की गुरांचा घास ?"

"स्वयंपाकी मीठच विसरलेला दिसतोय. पण तो कंपनीच्या मिठाला जागणारा नसला, तरी आम्ही जागणारे आहोत म्हणावं ?"

चेव येऊन किशोरावस्थेतला भास्करही ओरडला–

"शी ! शीऽ ! असला स्वयंपाक रोज खात राहू, तर आज भीमाचं काम करणारा उद्या सुदाम्याचं काम करायलाही नालायक ठरेल."

पंक्तीत बसलेल्या भाऊराव कोल्हटकरांनी भास्करची ही पोटतिडीक ऐकली मात्र–त्यांचाच पोटशूळ उठला–माथेशूळ उठला. जुन्या मत्सराला नवा धुमारा फुटला. जसे अशा प्रसंगाची ते वाटच पाहत होते. भास्करची खोडी काढून, त्याला अवमानित करण्याची संधीच शोधत होते.

ते तरातरा त्याच्यासमोर आले. कमरेवर हात ठेवून गरागरा डोळे फिरवीत मालकाच्या रुबाबात ओरडले–

"भास्कऱ्या– नोकराचाकरांचं काम करणाराला एवढी मिजास ? दोन घास गिळायला मिळताहेत ते नशीब समज."

ज्यांच्या बरोबर स्वरांची आतषबाजी केली ते भाऊराव कोल्हटकर शब्दांचे फटाकडे अंगावर टाकून हृदय भाजून काढतील अशी भास्करला अगदी कल्पना नव्हती ! कारण फुटलेले मडके सांधत नसले तरी फुटक्या मडक्यागत झालेला आवाज मेहनतीने काबूत आणता येतो हे भाऊरावांना पक्के माहीत होते. आणि तरीही त्यांचे तारसप्तक चालूच होते–

"भास्कऱ्या, जे काय मिळेल ते खाऊन राहायचे असेल तर रहा. नाहीतर चालायला लाग. तुझ्या गळ्याचं भदं झालंय. फुटकं मडकं झालंय. अशा आवाजाच्या पोराचा किर्लोस्कर मंडळीला काय उपयोग ? गाण्याला तरी काय उपयोग ? अरे जा ! तू कसला गवयी होणार ?"

झाले. फार ताणली गेलेली तंबोऱ्याची तार तुटावी, तशी भास्करच्या सहनशक्तीची तार तुटली ! क्रोधाच्या–मत्सराच्या आणि मालकगिरीच्या अभिनिवेशात भाऊरावांनी जे तिरकस वाक्‌बाण सोडले ते भास्करचे हृदय जखमी करून गेले !

एक हात त्या दुखावलेल्या हृदयावर ठेवून तो पुढचे ताट बाजूला सारून उठला. किशोरवयात मानापमानाची धार तीव्र असते. तो उठला तशी कुणा ताटाखालच्या मांजराने फुसकुली सोडली–

"गळ्याची धार बोथटलीय आणि मानापमानाला बघा केवढी धार चढलीय."

डोक्यावर टोपी चढवता चढवता दारातूनच भास्कर ओरडला–

"मनाला धार आहे म्हणूनच गळ्याला धार आणीन तेव्हाच राहीन. रामराम तुमच्या किर्लोस्कर मंडळीला आणि तुम्हालाही. माझा अपमान केलात आणि

माझ्या संगीत विद्येचाही अपमान केलात काय ? ठीक आहे. एक ना एक दिवस भास्करचा भास्करबुवा होईल तेव्हाच तुम्हाला हे तोंड दाखवीन !"

भास्करने अंगावरचे नाटकी कपडे उतरवले. स्वतःचे घरचे कपडे घातले. न्हाव्याकडे जाऊन स्त्रीभूमिकेसाठी ठेवलेले लांब केस कापून टाकले.

मस्तकावरचा केशभार उतरवताना भास्करने जसा कंपनीचा ऋणानुबंधही उतरवून टाकला.

अपमानित जिण्याचे जिवंत मरण पदोपदी स्वीकारण्यापेक्षा चितेवरचं मरणही स्वाभिमानी मन पसंत करते. म्हणूनच या दाहक जिद्दीतूनच भास्करसारखा स्वतंत्र प्रज्ञेचा– स्वतंत्र प्रतिभेचा– स्वतंत्र प्रणालीचा गायक निर्माण होऊ शकतो, हे कालपुरुष जाणून होता. आजच्या अपमानातून उद्याच्या सन्मानाची बीजे पेरली जाणार आहेत हेही जाणून होता.

म्हणूनच तो वरवरचा तो कुमुहूर्त संगीतकलेच्या दृष्टीने सुमुहूर्तच असणार.

तिरीमिरीतच भास्कर रस्त्यावर आला. रस्त्यावर मुले पतंग उडवीत होती. भास्करने पाहिले तो कुणाचासा पतंग उंच उंच गेला होता. तो कुणीसा काटला... फाटला... धुळीत कोसळला...

भास्करच्या फुटलेल्या कंठात एकदम हुंदका दाटला. त्याच्या मनात आले–

"अष्टवसूंशी गप्पा मारणारा पतंग एकदम चोळामोळा होऊन मातीमोल झाला ! तसाच सप्तसुरांशी गप्पा मारणारा हा भास्कर आज एकदम कवडी-मोलाचा व्हावा का ?"

अमळशाने क्रोधाग्नी जरा शांत झाल्यावर अन्नब्रह्माला डावलून आल्याबद्दल भास्करच्या प्रेमळ मनाला रुखरुख लागून राहिली. तो एकदम रस्त्यातच थबकला. हात जोडून म्हणाला–

"बा, अन्नरूपी पूर्णब्रह्मा, मी तुझा अनादर केला म्हणून रागावू नकोस. अरे, श्रोत्यांच्या कानांच्या पानावर संगीताचे भोजन घालीन आणि मगच मी सायसंगीत जेवीन. समजलास ना ? आता राग गेला ना ? मला शापणार नाहीस ना ? उतला मातला म्हणणार नाहीस ना ? मी पोटार्थी गायक नसून कलेसाठी गाणारा गायक आहे हे समजलास ना ?"

भास्करने सद्गदित अंतःकरणाने डोळे मिटून हात पुनश्च कपाळाला लावला.

काय आश्चर्य ! तोच तो ज्या रस्त्यावरल्या आंब्याखाली उभा होता त्यावरचा एक पाड टपकन् खाली पडला– नेमका भास्करच्या पायापाशी.

"अरे, हा तर मला अन्नब्रह्माने अमृतफळाचा कौलच दिला."–असे म्हणून तो पाड कचाकचा खात भास्कर झपाझपा पुढे निघाला. विचाराच्या भरात तो केव्हाच गावाबाहेरच्या रस्त्याला लागला होता. तोच माथ्यावरून एक काळा पक्षी

'क्लक् क्लक्' करीत गेला.

गाणाऱ्या पाखरांवर जीव करणाऱ्या भास्करने कोकिळेला अचूक ओळखले. ती उडता उडता जशी भास्करला सांगत होती...

" भिऊ नकोस पोरा. भिऊ नकोस. आवाज बसला म्हणून दिवाणा होऊ नकोस. अरे थंडीत आमचाही आवाज भिजतो–गोठतो. मग गाता येत नाही. गळा दाटून येतो... गुदमरतो.

पण पुन्हा वसंत ऋतू येतो. वृक्षांना चैत्रपालवी फुटते आणि आम्हा कोकिळां-नाही पुन्हा कंठ फुटतो. पूर्वीइतकाच चैतन्यशील, सृजनशील; पूर्वीइतकाच गोड–गूढ– गाढ...

आणि ते पाखरू 'क्लक्–क्लक्' करीत पुन्हा उडून गेले. दिसेनासे झाले. जसे भास्करला संदेश देण्यासाठीच ते त्या रानात अवतरले होते.

बराच वेळ चालल्यावर सूर्य उतरणीला लागला. बोचणारे किरण पश्चिमेला झुकले आणि कोमल झाले. मावळत्या सूर्याकडे पाहून भास्करने हात जोडले आणि संध्येचे मंत्र म्हटले. तशी रविराज किरणांच्या भाषेत म्हणाले–

" अरे, या भास्कराच्या मावळतीला जर उद्या पुन्हा उगवती आहे तर तुला मानवी भास्करला ती का नसावी ?

असणारच...असणारच...असणारच !"

ते जाणारे तेजही बखल्यांच्या भास्करला नवे तेज देऊन गेले. ओज देऊन गेले. गगनातला 'मित्र' स्वतःचा मित्र वाटून भास्करने त्याला पुनश्च वंदन केले. एवढा वेळ रँ रँ करून चालणारे त्याचे पाय पुनश्च लयीत चालू लागले. संध्या-काळचा वारा सूर देऊ लागला. तशी तोच तानपुरा पुरा होऊन भास्करने उभ्या उभ्याच खर्ज भरायला सुरुवात केली–

'साऽऽ'

भास्करने नवा मार्ग आक्रमिला आणि योग्य मार्गही ! तो अचूक बडोद्याच्या राजरस्त्याला लागला. मिळाले त्या वाहनाने बडोद्याला आला. निघताना खोलीवर जाऊन भाडे चुकते करून, कपडे घेऊन आणि त्याचा जिवलग तानपुरा घेऊनही निघाला.

बडोदा संस्थानात संगीतालाच नव्हे तर अनेक कलांना लोकाश्रय आणि राजाश्रय दोन्ही लाभलेले होते. अठराशे शहाऐंशीच्या उत्तरार्धात भास्कर 'पुनश्च हरीॐ' म्हणत बडोद्याला तान्हुताईकडे आला.

भास्कर नशीबवान खरा. कारण बडोदा संस्थान अत्यंत सुस्थितीत होते. अठराशे पंचाहत्तर साली गादीवर आलेले श्रीमंत सयाजीरावमहाराज गायकवाड हे द्रष्टे आणि रसिक नरेश होते. संस्थानचा सर्वांगीण विकास साधण्यासाठी धड-

पडत होते. त्यामुळे सुधारक मुंबापुरीने लज्जित व्हावे अशा सुधारणा बडोद्यात झाल्या होत्या आणि विद्यानगरी पुण्यपुरीने धडे घ्यावेत अशी विद्वान मंडळी दरबारच्या संग्रहात होती.

संगीताबाबतही महाराजांनी बारकाईने लक्ष पुरवले होते. संगीतशाळा चालवणाऱ्या मौलाबक्षांसारख्या संगीतकाराला परदेशात धाडून पाश्चात्य संगीताचा तौलनिक अभ्यास करायला लावला होता. तो वाया गेला नव्हता.

इंग्रजी बँडवर मौलाबक्षांच्याकरवी हिंदुस्थानी धून सादर करायला लावणारे सयाजीराव पहिलेच संस्थानिक होते. संगीतकलेला पोषक वातावरणात भास्करला ओढण्यात विधीचाही काही संकेत असावा.

आणि या नगरीच्या परीस स्पर्शाने त्यांच्या गळ्याचे सोने झाले– जीविताचे सोने झाले.

भास्कर बडोद्याच्या बहिणीकडे आला आणि गुरूची शोधाशोध करू लागला. बुवा होण्याची प्रतिज्ञा करणे सोपे असले तरी ती प्रत्यक्षात आणणे मात्र कठीण होते. तेव्हा आत्ताप्रमाणे कळ दाबली की, संगीताचे झरे कानाच्या डोंगरावरून झुळ-झुळत नव्हते. तर कळ काढली तरच एखादा पाझर मोठ्या मुष्कीलीने दूरवर आढळत होता. पाझर शिष्यापर्यंत ठिबकत नसे, शिष्यालाच तिथवर जावे लागत असे.

भास्कर अशा संधीची वाटच पाहत होता, पण गाठी पैसा नव्हता. त्यामुळे गुरूकडे रिक्तहस्ताने वावरत होता. तशातच वीसनगरला बातमी जाऊन मातोश्री जानकीबाईंचे त्याला पत्र आले. भीतभीतच भास्करने ते फोडले. पत्र बालबोध पण खूप बोधप्रद होते–

" चि. भास्कर यास–

उदंड आशीर्वाद,

तू कळीवलं नाहीस तरी, जावईबापूंकडून सर्व कळले हो. जळ्ले, मेले ते किर्लुस्कर मंडळीचे मॅनेजर नि मालक. त्यांना मागचा-पुढचा काही विचार ? का आपली उचलली जीभ लावली टाळचाला ?

लावू देत. लावू देत. बाबा रे– मारणाराचा हात धरता येतो. बोल-णाराचं तोंड थोडंच धरता येतं ? पण जिथं पिस्ता खाल्लास तिथं लाथा खात पिचत राहण्यापरीस स्वाभिमानानं निघून आलास ते बरं केलंस हो. माणसानं मानी नसावं पण स्वाभिमानी जरूर असावं.

बडोद्यात आला आहेस. तिथं पूर्वी नाव कमावलं आहेस. इथंच पुरती विद्या कर. पुढची विद्या कर. कान लावून– मन लावून विद्या कर. मग भास्करचा भास्करबुवा होण्याचा दिवस दूर नाही हो.

अरे तुझी मूर्त अशी आहे की, जगभर कीर्त मिळवेल. मग एक दिवस हेच अपमान करणारे येतील नाक घाशीत. पाया पडीत... आणि हे बघ... मनाला लावून घ्यायचं नाही. वाळायकोळायचं नाही. तान्हू-कडचा मीठ-भात अंगी लावून घ्यायचा. दक्षिणादासांना जीव लावायचा. त्यांचा तू पूर्वीपासूनच लाडका आहेस.

अरे, सावत्र आईने ढकलून दिला तरी, ध्रुवबाळ अढळपदी पोहोचला. भाऊरावाने फेकून दिला तरी माझा भास्करबाळही अढळपदी पोहोचणार.

ध्रुवाने त्याचा मार्ग त्याने काढला. त्याप्रमाणे या संकटात तुझा तूच मार्ग काढ.

इकडील सर्व क्षेम. काळजी नसावी.

सौ. तान्हूस आणि चि. दक्षिणादासांना अनेक उत्तम आशीर्वाद. प्रकृतीस जपावे. सर्व लागी लागल्यावर पत्र टाकावे.

सदर पत्र तुझ्या दादाला मजकूर सांगून तुझ्या आडाणी आईने लिहून घेतलंय हो.

बरोबर ते त्याचे. चूक ते आईचे.

तुझी आई,<br>
जानकीबाई बखले."

पत्र वाचून भास्करला भरून आले. त्याने ते दहादा वाचले. कपाळाला लावले आणि उशीखाली ठेवून दिले.

रात्री झोपताना तेच पत्र आईचा हात होऊन त्याला थोपटत राहिले. अंगाई म्हणत राहिले. बडोद्यास आल्यास आज बऱ्याच दिवसांनी त्याला गाढ झोप लागली. सकाळी तो मोठ्या उत्साहाने उठला. गेल्या पंधरवड्याची मरगळ झाडून झटकून उठला.

आईच्या पत्रातले ते– 'तुझा तूच मार्ग काढ.' हे वाक्य दीपस्तंभ होऊन या वादळात दिशा दाखवून गेले.

आन्हीक उरकल्यावर तो मेव्हण्यांना म्हणाला, "जरा जाऊन येतो."

"उगीच उन्हात भटकू नका. गिळायला वेळेवर या."– तान्हुबाईंचा करडा स्वर आला. तरीही शांतपणे भास्कर म्हणाला–

"न्यायमूर्ती तेलंगांचा सल्ला घेऊन येतो."

"अवश्य जा. अवश्य जा. ते तुला योग्य न्याय देतील."

दक्षिणादासांनी कौल दिला आणि भास्कर मोठ्या उत्साहाने घराबाहेर पडला.

इच्छेचा रथ मार्ग शोधून काढतो. सहजपणे न गवसला तर डोंगर फोडून

शोधून काढतो. पण जागेवर रुतून बसत नसतो. भास्करचा मनोरथ बडोद्यात स्थायिक झालेल्या– ग्वाल्हेर आणि आग्रा घराण्याचे समर्थ गायक– फैजमहमद यांचे-कडे जाण्यासाठी आसुसला होता.

मनोमन भास्कर नारद–तुंबर–सरस्वती–मुरलीधर या देवदेवतांची उपासना करीत होता. शुद्ध कामना आणि शुद्ध उपासना यांना फळ लागल्याविना राहत नाही.

न्यायमूर्ती तेलंग सुदैवाने घरातच होते. आपला लाडका शिष्य समोर आलेला पाहून वय आणि विद्या विसरून त्यांनी भास्करला आलिंगन दिले. या स्वागतामुळे भास्करचा ढळलेला आत्मविश्वास बहुतांशी परत आला आणि त्याने हातचे न राखता स्वतःच्या मानभंगाची हकीगत तेलंगांना ऐकवली.

भास्कर तेलंगांना नवीन नव्हता. त्याची तेजस्वी पार्श्वभूमीही त्यांना अवगत होती. त्यांनी या तरतरीत मुलाची रामराज्य वियोगातील कैकयीची तेजस्वी भूमिका पाहिली होती. या मुलाच्या गळ्यावर त्यांचा दृढ विश्वास होता. त्याची झेप त्यांनी ओळखली होती. त्यामुळेच गरुडाला कोंबडा समजून अवहेलना करणाऱ्या भावड्याची त्यांना कीव आली. रामराज्य वियोगाबरोबर या मुलाला रंगभूमीवियोग झाला तरी हरकत नाही, पण शास्त्रोक्त संगीताचा आणि त्याचा वियोग सुतराम होता कामा नये.

न्यायमूर्ती तेलंगांनी त्यादिवशी स्वतःची सर्व कामे बाजूला ठेवली आणि स्वतःच्या बग्गीतून गावाबाहेरच्या छोट्याशा घरात राहाणाऱ्या फैजमहमदखाँ यांचे-कडे भास्करला नेले आणि त्यांना सुनावले–

" हा रंगभूमी गाजवणारा भास्कर बखले, सर्व पाश तोडून संगीतविद्येसाठी बडोद्यात आला आहे. आपल्याजवळ शिकायची त्याची इच्छा आहे आणि तशी बडोदे सरकारच्या वतीने शिफारसही करत आहे मी आपल्याकडे. या मुलाला पोटचा गोळा समजून संगीतविद्येत पारंगत करा. तुमच्या विद्येचे तो चीज करील. तेव्हा हातचे न राखता एकूणएक चीज बहाल करा. गमावलेला आवाज कमावण्या-पासून सारे शिकवा. "

" ठीक आहे. आपली स्तुती हे मी या मुलाचे भांडवल समजतो नि शिष्य म्हणून त्याचा आजपासून स्वीकार करतो. "

भास्कर ताडकन उठला. खाडकन् फैजमहंमदांच्या पाया पडला. त्याला शब्दातीत आनंद झाला होता. तो डोळ्यांतून पाझरत होता.

अम्मळशाने मुलाला तेथेच ठेवून न्या. तेलंग समाधानाने परतले.

त्याकाळी झटपट पैसा व प्रसिद्धी मिळवून देणाऱ्या नभोवाणीचा अवतार झालेला नव्हता. पुराणकाळी थोर ऋषींचे आश्रम असत. वेगवेगळ्या विद्या शिकवल्या

जात असत. संगीताचेही असेच आश्रम असत.

गानऋषींना सेवेने जिंकायचे, श्रद्धेने प्रसन्न करून घ्यायचे तेव्हाच विद्याधन प्राप्त व्हायचे. फैजमहंमद हा गानतपस्वीही याला अपवाद नव्हता.

*

# सहा

बडोद्यातच तान्हुताईकडे जेवायचे आणि उरलेला वेळ संगीताचे चारदोन घास मिळतात का हे बघण्यासाठी फौजमहम्मदखानच्या मकाणावर जायचे, असे भास्करचे खडतर जीवन सुरू झाले. कष्टांना तर तमाच नव्हती. पण विद्यार्थी-दशेची हीच परिक्रमा असते, अशी भास्करची धारणा असल्याने त्या कठोर कष्टां-नीही त्याचो पाचावर धारण बसली नाही.

स्वतःच्या जन्म 'कठोर' नावाच्या गावी झाल्याने कठोर व्रताचे व कठोर परिश्रमाचे त्याला बाळकडूच लाभले होते. कठोर नियती जशी त्याच्या पाचवी-लाच पुजली होती. सरळ–सोपे–गुळगुळीत, काहीच समोर नव्हते. कष्टांचा चिखल तुडवल्याशिवाय कलेचे कमळ हस्तगत होत नसते...

फैजमहंमदखाँ विद्यादानात आखडूपणा करू लागले– इतका फाकडू विद्यार्थी मिळूनगुद्धा ! त्यांनी या छात्राच्या गात्रांना पीळ पडेपर्यंत नानाप्रकाराने परीक्षा घेतल्या.

हे ब्राह्मणाचे पोर कधी खाँसाहेबांच्या शेळयाही चरायला नेई. पण तरीही वृत्तीने शेळपट झाले नाही. 'मुकी बिचारी कुणी हकावी' असे मेंढरुही झाले नाही. उलट अशावेळी तो स्वतःच स्वतःची समजूत घाली–

भगवान श्रीकृष्णांनी सांदीपनी ऋषींच्या आश्रमात विद्याग्रहण करताना गुरुची गुरे चरणीला नेली, लाकडांच्या मोळचा खांद्यावर वाहिल्या त्याची आठवण केली.

ती आठवण करीत असतानाच भास्करला एकदम 'झुळ्झुळ्' आवाज आला. ओहो ऽऽ ! चिमुकला झरा आलापीत होता.

तेवढ्यात 'सळ्सळ्' आवाज करून तृणपात्यांनीही सूर दिला. तोही किती मोहक ! आणि तोच 'सुं ऽऽई' आवाज करीत वारा मिंड घेऊन गेला. 'कुंईकुंई' करत मोटेने गमक दाखवले, खर्जही दाखवला. 'टिविट् टिविट्' करत कुणीसे पाखरू तार सप्तक करीत झेपावले तेव्हा तर भास्कर थक्कच झाला !

गुराख्याच्या बन्सरीतून त्याला गोपाळकृष्ण ऐकू आला होता. पण आज सारा परिसरच संगीतमय झाला होता. इथेतिथे वेणुनाद भरून राहिला होता.

' जिकडे तिकडे अवघा झाला गोविंदु गोपाळु '–

ही विलक्षण अवस्था भोगून– निसर्गाच्या कणाकणातला तो नादब्रह्माचा साक्षात्कार पाहून भास्करचे हात जोडले गेले– मस्तक विनम्र झाले.

ही अनुभूती त्याला नवीन होती. विलक्षण होती. एकूण विश्व ही देवी सरस्वतीची वीणा आहे. आणि तिचा मंगल–मुलायम–दिव्य सूर आसमंतात भरून राहिला आहे तर ! किती सुखमयी– किती आनंदमयी– किती तन्मयी ! ! ...

बाजार घरापासून मैलोगणती दूर होता. पण विश्वसंचारी संगीताची नजर आल्यावर ती लांबी पायांना जाणवेनाशी झाली. क्वचित् खाँसाहेब पुत्राला शिकवत असले तर गुपचूप बाहेर उभे रहावे– कागदावर सरगम लिहून घ्यावे– बाजारात वा रानात जाताना ते कंठगत करावे, आणि राग गळ्यात बसवावेत, असा खाक्या सुरू झाला.

एका न्यायमूर्तींनी एका लहान गायकाच्या गाण्याला न्याय दिला आहे, म्हणूनच आपल्यावर उद्याचा महान गायक होण्याची जबाबदारी आहे, याची डोळस जाणीव त्या उमेदीच्या वयातही भास्करला होती.

तरीपण एक दिवस जिवापाड कष्ट करूनही विद्या न मिळाल्याने स्वत:वरच रुष्ट झालेला भास्कर फैजमहंमद यांच्या झोपडीवजा बंगलीच्या बाहेरील बगीच्या-तील दगडावर शून्यात नजर लावून बसला होता.

तोच घोडागाडी वाजली. घोड्याच्या टापा तालाची तिरकीट घेऊन भास्करच्या कानावर आदळल्या. तो सावध होऊन उभा राहिला.

आणि काय आश्चर्य ! बग्गीतून न्या. तेलंगांची भव्य मूर्ती उतरत होती. ती पाहून भास्कर चकीत झाला. आणि आनंदितही झाला. जसे बुडत्याचे जहाजच किनाऱ्याला लागले. कारण याच न्यायाधीशाने त्याच्या कलेला आजवर न्याय दिला नव्हता काय ? संगीत शिक्षणाची सुरवात यानीच करून दिली नव्हती काय ? किर्लोस्कर मंडळींशी रुजवात यांनीच घालून दिली नव्हती काय ? आणि आत्ताही फैजमहंम्मदखाँच्या घराची अवघड वाट यांनीच सोपी करून दिली नव्हती काय ?

असा हा उदारांचा राणा न सांगता सवरता समोर येऊन ठाकल्यावर जसे भक्त प्रल्हादाला साक्षात महाविष्णूच समोर येऊन ठाकलेसे वाटले.

तो धाडकन पुढे झाला. आणि त्या हिरवळीवरच न्या. बाळशास्त्र्यांना साष्टांग प्रणिपात घातला. त्याला उठवून त्याच्या मस्तकावर हात ठेवून शास्त्रीबूवा म्हणाले– " विद्यावंत भव. "

भास्कर एकदम बोलून गेला– " कशाची विद्या नि फिद्या ! आवाज फुटला

आहे. मडकं झालं आहे. अशाला खाँसाहेब का शिकवतील ? "

त्याच्या पाठीवर हात फिरवून शास्त्रीबुवा प्रेमळपणाने म्हणाले– " नाही. हे खरं नाही. मला दक्षिणादासांकडून कळलं आहे की तू दिवसाचे आठ आठ तास रियाज करतो आहेस. आवाज काबूत आणतो आहेस.

ती बघ, माथ्यावरच्या वठलेल्या वृक्षावर पुन्हा पालवी फुटते आहे. मग फुट-लेल्या गळ्यावर मेहनतीने पुन्हा गोडवा का चढणार नाही ? आता तुझा गळा सुधारला आहे. विद्या पेलण्याजोगा झाला आहे. सुरेल लागू लागला आहे. "

भास्कर नाराजीने म्हणाला– " हे आपलं मत झालं. खाँसाहेबांना असं वाटत नाही. त्याचं काय ? "

" का बरं ? सहा महिन्यांत किती राग झाले ? "

" भूपाच्या ' सुधे बोलात 'च सहा महिने जीभ अडकली आहे. आणि या वातावरणात सेवेपायी मेंढयांना पाय बांधला आहे. "

भास्करला गद्‌गदून हुंदका आला. तशी स्वतःच्या हाताने त्याचे डोळे टिपीत हिरवळीवर बसत न्यायमूर्ती म्हणाले– " असा जवळ बैस. आणि मनातलं सारं सांगून टाक. अन्याय असेल तर असाच आत जातो आणि फैजची हजामत करतो. "

उन्हाची तिरीप येताच बर्फ वितळावे तशी मायेची ऊब येताच भास्करच्या डोळ्यांतले बर्फ वितळले. स्फुंदत स्फुंदत त्याने स्वतःची सारी दयनीय अवस्था कथन करायचाच अवकाश–

बाळशास्त्री आवेशातच उठले, आणि त्याच्यासह फैजमहंमदांपुढे जाऊन ठाकले–

आज ते न्यायमूर्ती बाळशास्त्री नव्हते, तर जसे न्यायमूर्ती रामशास्त्रीच झाले होते !

संस्थानचे बडे अधिकारी न्यायमूर्ती तेलंग अवेळी आलेले पाहताच फैज-महम्मदखाँसाहेब चिरंजिवांची तालीम थांबवून लगबगीने पुढे झाले आणि अदबीने मुजरा करून म्हणाले, " आइये, आइये. तश्रीफ लायीये पंडतजी. "

भिवई चढवून– आवाज चढवून न्यायमूर्ती गरजले,

" दिव्याने दिवा लावतात तसे विद्वानाने विद्वानाला तयार करायचे असते. मला एकट्यालाच पंडीत रहायचे नाही. भास्करलाही गानपंडीत करायचे आहे. नदीचा आणि विद्येचा प्रवाह पुढे गेला नाही– एकाच जागी साचला तर त्याचे डबके होते. "

" सच है. सच है. "

" मग या पोराचे गाणे कुठवर आलेय ? ऐकव रे. चार-दोन राग सयाजीराव-

महाराजांचे उत्सवात याने ऐकवायचे आहेत."

महाराजांच्या नावाची मात्रा बरोब्बर लागू पडली. नेहमी सा सा प प करणारे फैजमहम्मद सयाजीमहाराजांचे नाव ऐकताच त त प प करीत म्हणाले,

"हा– हा, म्हटलं तर अजून भूपातच आहे."

"अजून भूपच ? तो सुरू होऊन तर वर्ष-सहा महिने झाले. अहो, कला राजाश्रयावर चालते तशीच लोकाश्रयावरही चालते. भास्कर राजमान्य गायक होईल, तसा तो लोकमान्य गायकही होईल. पण 'भूपा'लाच वंदन करीत त्याची कला महान् सहा महिने बसल्यावर जनताजनार्दनापर्यंत पोहोचणार केव्हा ?

हे ब्राह्मणाचं अत्यंत तल्लख डोक्याचं एकपाठी– सुसंस्कृत– निष्ठावंत– शालीन पोर तुमच्या हाती दिले ते त्याचे केरपोतेरे करून पायदळी तुडविण्यासाठी नव्हे. उलट त्याचे मानलेले पिते होऊन त्याच्या कंठात दडलेल्या साक्षात शारदेचा शोध तुम्ही घेतला पाहिजे. इथे रक्ताच्या नात्यापेक्षा गुणाचे नाते महत्त्वाचे असते.

त्यातून गुरूने फक्त स्वतःच बडा गायक राहून चालत नसते. बडा गायक निर्मून बडेपण सिद्ध करायचे असते. तरच कुठल्याही कलेची परंपरा चिरंतन राहते. जिवंत राहते. लोण पुढे जाते.

घरादाराचा त्याग करून आई-भावाला दूर सारून हे रत्न दारी आलंय, त्याची निराशा करू नका. पैलू पाडा आणि रत्नपारखी आहोत हे सिद्ध करा. दरबारचा तनखा दरबारच्या आज्ञा पाळण्यासाठी असतो हे विसरू नका."

फैजमहम्मद उमगले– वरमले. ढाल्या स्वरात म्हणाले, "शास्त्रीबुवा, आपली निकड लक्षात ठेवितो आणि भास्करला मनापासून शिकवतो. वर्ष-दोन वर्षात उस्ताद बनवतो."

भास्कर थोडाथोडका नव्हे, अर्धे तप फैजमहम्मदखाँच्या जवळ राहिला आणि आश्चर्यकारक प्रगती करून गेला. निष्ठावान शिष्य आणि विद्वान गुरू यांचा 'समसमा संयोग की जाहला.' संगीताच्या चैतन्यवृक्षाला दोन्ही अंगी नवनवे धुमारे फुटले. नवनवे फुलोरे आले.

एकाच्या अविरत कर्तृत्वाला आणि दुसऱ्याच्या अविरत दातृत्वाला सुमधुर सकस फळ लटकले. सकाळपासून रात्रीपर्यंत तालीम चालू राहत असे.

हा संगीत सुसंवाद ऐकायला चांदण्यांचा थवा आभाळी गर्दी करीत असे. स्वर्लोकीचा शापभ्रष्ट गंधर्वच भूलोकी अवतरला आहे, अशी एकमेकींना ग्वाही देत असे.

फैजमहम्मदखाँ हे सुप्रसिद्ध हस्सुखाँ हद्दुखाँ यांच्या वडिलांचे मातब्बर शिष्य

आणि पक्के उस्ताद. त्यामुळे खानदानी संगीताचे सारे अलंकार– सारे जडजवाहीर त्यांच्या कंठात विराजमान झालेले होते. उदार सासूने लायक सुनेच्या हाती सारा जामदारखाना सुपूर्द करावा तसा हा वंशपरंपरागत संगीताचा खजिना खाँसाहेबांनी या लाडक्या लालाला बहाल करायला सुरुवात केली.

भास्करच्या जीवनातले एक वर्ष आपण वाया घालवले याची फैजमहम्मदना आता रुखरुख लागून राहिली. त्या जाणिवेत ते आणखीनच दामदुपटीने विद्याधन देऊ लागले.

अशा या स्वरानंदात असले म्हणजे स्वरानंद हे ब्रह्मानंदाचेच सशब्द रूपडे आहे, हे उभयतांना समजे आणि उभयतांची नादब्रह्मी समाधी लागे. अशा तऱ्हेने संगीताचे नवनवे साक्षात्कार– नवनवे चमत्कार अनुभवीत भास्करची गायकी ऐश्वर्यसंपन्न होऊ लागली.

मात्र विद्येच्या मदात भास्कर कधीही मदोन्मत्त झाला नाही. स्वतःची पायरीही विसरला नाही.

'भास्करबुवा होईन तेव्हाच तोंड दाखवीन' असे ठणकावून सांगून भाऊराव कोल्हटकरांना रामराम ठोकणारा भास्कर कुणाचीही थुंकी झेलणारा नव्हता, हे सिद्धच झाले होते. पण जगासमोर तुम्ही उंटावरून चाललात तरी गुरूसमोर तुम्ही विनम्र पदयात्रिकच असता याची भास्करला पुरेपूर जाणीव होती. आणि त्या जाणिवेची प्रचीती एकदा खुद्द फैजमहम्मदखाँना विलक्षण रीतीने आली.

थंडीचे दिवस होते. वयपरत्वे खाँसाहेबांना खोकला झाला होता. घशात अधूनमधून कफ दाटत होता. तरी विद्यादान चालूच होते आणि भास्करचेही 'तन मन धन सब वारु' या भावनेने विद्याग्रहणही चालू होते.

शिकवता शिकवता खाँसाहेबांना खोकल्याची उबळ आली. जवळपास पिकदाणी दिसेना. रंगाचे भंग करण्याचे पाप भास्करला करवेना. त्याने झटकन आपली ओंजळ पुढे केली आणि गुरूचा खांसरा ओंजळीत घेतला आणि हात स्वच्छ करून पूर्वीइतक्याच स्वच्छ मनाने शिकवणीला बसला.

गुरुनिष्ठेला जागून भास्करने पुढे केलेली ओंजळ न विसरता आल्याने की काय गुरूंनी ओंजळी भरभरून विद्या द्यायला सुरुवात केली.

ज्या दिवशी हे घडले त्या दिवशी भास्करनंतर शिकवणी असलेला बड्या सरदार घराण्यातला दाजी तांबे तिथेच बसला होता. त्याला ही सेवा अपमानकारक वाटून त्याने त्या दिवसापासून गाणेच सोडले.

त्यामुळे गारेचे दगड कुठले आणि हिरे कुठले हे फैजमहम्मदखाँना लवकरच कळून चुकले आणि त्यांनी या हिऱ्याला अष्टपैलू करावयाचे ठरवले.

कलावंताला जात नसते हे गुरू-शिष्यांनी सिद्ध केले, इतके ते पुढे पुढे

एकजीव झाले. त्यांचे नाते पिता-पुत्रांचेच झाले.

भास्करची जातिवंत प्रतिभा, तीव्र ग्रहणशक्ती आणि सर्व अलंकार झेपण्याचा गळ्याचा वकुब ओळखून अनेक रागरागिण्या मुक्त हस्ताने देण्यात आल्या आणि मुक्त कंठाने आत्मसातही करण्यात आल्या.

खाँसाहेब तापट होते. विद्याग्रहण करतानाचा एवढाही प्रमाद सहन करणारे नव्हते. त्यामुळे एकदा छोटयाशा चुकीबद्दल खाँसाहेबांची लाथही खावी लागली होती. पण पिंगळेबुवांच्या मागे उभे राहून भास्करने पौराणिक कथा हृदयात भिनवल्या होत्या. त्यामळे भृगुमुनींची लाथ महाविष्णुंनी छातीवर घेतली, आणि तीच पद्‌मुद्रिका 'श्रीवत्सलांछन' म्हणून भूषण ठरली.

तसेच गुरूच्या लाथेने डोळयांतून पाणी न निघता कंठातले पाणी मात्र सिद्ध केले. आणि तो आणखी लक्षपूर्वक शिकू लागला. सावध चित्ताने श्रवण करू लागला.

सहा-सात वर्षे या खडतर तपस्येत केव्हाच लोटली.

प्रत्येक नवा दिवस नवे रागरूप घेऊन जन्माला येत होता. उगवतीचा भास्कर संगीतक्षितिजावरच्या या भास्करला पाहून चकीत होत होता. कोकिळा आम्रवृक्षाच्या डोलीत बसून भास्करचा पंचम लक्षपूर्वक ऐकत होत्या. आणि मग त्याचेच अनुकरण करीत होत्या. मयूरही भास्करचा घनगंभीर मल्हार श्रवण करीत आणि गगनात जलदांनी गर्दी केलीय असे समजून नृत्य करीत होता.

फुलांचा आणि गुणांचा सुगंध वाऱ्याबरोबर पसरतो. भास्करचे नावही बडोद्यात हां हां म्हणता सर्वतोमुखी झाले, त्याला अनेक संगीतप्रेमी दोस्त मिळाले. आत्मारामबुवा, बाळकृष्णबुवा, गणपतराव गोखले सतारवाले, केशवबुवा या विद्यार्थ्यांचे भास्करभोवती कडे असे.

पण ते भास्करला साकडे वाटत नसे. कारण तोही गानवेडाच नव्हता तर माणूसवेडाही होता. सगळे दोस्त एकत्र जमत. गप्पा– गाणी चालत. मैफलीही झडत.

त्यांतून बैठकीची रंगत येत होती, सभाधीटपणा वाढत होता. कुठलाच संगीतक्षण वाया जात नव्हता, भास्कर सर्वांवर मात करी आणि गाण्यातले अनेक चमत्कार मित्रांपर्यंत पोहोचवी. म्हणून दोस्तांनी त्याला पदवी देऊन टाकली होती 'अवघडदास.' तरीही एखादा त्याला 'एकलव्य' म्हणे. कुणी धनुर्धारी अर्जुनही म्हणे. भारती वेगळी. आरती तीच.

आणि खरंच हा गुरूरूपी जलद भास्करवर बरसता बरसता जसा संपून गेला असे समजू लागला. थोर माणसाची केवढी ही विनम्रता ! केवढी विद्येची चाड ! केवढी शिष्याच्या भल्याची ओढ...

फैजमहम्मदखाँनी हा गरुड आहे हे ओळखून स्वतःच्या प्रांगणातून त्याला

बाहेर काढायचे ठरवले व म्हटले–

"बेटा, माझ्या गाठी जेवढं विद्याधन होतं तेवढं सारं मी तुझ्या कंठी बांधलं आहे. आता तू आग्रा घराण्यावाले नथ्थनखां यांचेकडे जा. ते कधी मुंबईत असतात, तर कधी म्हैसुरात असतात. माझं नाव सांग म्हणजे ते तुला शिकवतील. तू नाव काढशील. हिंदुस्थानचा महशूर गायक होशील.

बेटा, तू जाणत नाहीस पण मी जाणतो आहे. सुरवंटाचे हे फुलपाखरू किती मोहक आहे. त्या बीन पखाच्या खडबडीत पिल्लाला फुटलेले हे गरुडाचे पंख किती तेजस्वी आहेत ते !

केवढे तेज, केवढे ओज या गायकीत तू कष्टाने आणि जिद्दीने आणले आहेस. धन्य तुला जन्म देणारी माऊली ! आणि तिची कूस जगन्मान्य करणारा धन्य बखल्यांचा भास्कर ! !"

गुरूचा आपल्यावरचा विश्वास पाहून भास्करचे डोळे ओलावले. भास्करच्या मनात आले–

"स्वतःच्या विद्येचा अपुरेपणा ओळखून दुसऱ्या गुरूकडे तयार शिष्याला सुपूर्त करण्याचा या गुरूचा केवढा हा मोठेपणा. नाहीतर काही गायक खोटा मोठेपणा मिरवतात. स्वतःचा थिटेपणा झाकतात. आणि पदरी रत्न असले तरी त्याला काचमणी म्हणून वागणूक देतात.

धनुर्धारी अर्जुन द्रोणाचार्यांचा पट्टशिष्य असूनही धनुर्विद्येतले आणखी कावे आणि बारकावे यावेत म्हणून त्याला भगवान शंकरांची आराधना करावी लागली नव्हती काय ?

पार्थाने भूलोकीच्या विद्येचा टणत्कार स्वर्लोकापर्यंत गाजवला. मी स्वर्लोकीचे संगीत भूलोकी आणीन. आणि माझ्या गुरूने मला तयार केले तसाच एखादा भूलोकी गंधर्व तयार करून दाखवीन."

*

# सात

बडोद्याला वडील बंधूंच्या घरी घरचा गणपती बसवायला आलेले भाऊराव कोल्हटकर पहिल्या झोपेवर जागे झाले, ते वाऱ्यावर स्वार होऊन आलेल्या कुणा दिव्य सुरांनीच ! जसा कुणी यक्ष-किन्नरच त्या स्वरांवर स्वार होऊन– राजकुमार होऊन आला होता, भाऊरावांची त्याच रात्रीची नव्हे, तर अनेक रात्रींची झापड

उडवीत होता !!

ते झपाटल्यागत उठले. कुणी जंतरमंतर केल्यागत ताडकन् खिडकीशी आले. उभे राहिले. लक्षपूर्वक ऐकू लागले. गल्लीच्या टोकाला त्या भागाचा सार्वजनिक गणपती बसला होता. लोकमान्य टिळकांचे सार्वजनिक गणेशोत्सवाचे लोण बडोद्यापर्यंतही आले होते. कारण पुण्या-मुंबईप्रमाणे तीही एक संपन्न नगरी होती ना ? विद्या नगरी होती ना ?

कुणी गायक बागेश्री गात होता. कमालीच्या तयारीने गात होता. पण त्या तयारीच्या आहारी गेलेला नव्हता. द्रुत चीज मोठ्या जोशात चालू होती. शब्द स्वच्छ होते पण कडकडीत नव्हते. तान दाणेदार होती. निर्मळ प्रवाहाप्रमाणे खळखळत चिजेच्या मुखड्याशी लडिवाळपणे खेळत होती. तिन्ही लोकांत संचारणाऱ्या नारदाप्रमाणे तीन सप्तकांत संचारणारी ती तान– सुरुवातीपासून सारखीच भरदार– एकाच रुंदीची– लयीची पकड न सोडणारी– रागाची छाया लोपू न देणारी– केव्हा तोंडाला आली भाऊरावांना कळलेच नाही. चीजेचे मधुर बोल होते– मधुमास सांगत येत होते.

"ऋतबसंत की अपने उमंगसो
पियु जनको निकसी सरसोऽऽ–" ॥ धृ. ॥

"आहाहाऽऽ! वाहव्वाऽऽ!" म्हणतच भाऊरावांनी कोट चढवला. फेटा बांधला. जरीचे उपरणे खांद्यावर घेतले आणि झपाटल्यागत तो गानलुब्ध रसिक मांडवाच्या दिशेने चालू लागला. तोच बागेश्री संपला. प्रचंड टाळ्या वाजवून जनताजनार्दनाने पसंतीचा कौल दिला. बागेश्री ऐकून सुखावलेले श्रीसुद्धा कान मोठे करून ऐकू लागले.

तोच त्या कल्पक गायकाने गायन कंटाळवाणे होऊ न देण्यासाठी सर्वांना पचेल आणि रुचेल असा सोहनी राग सुरू केला. बुंध्यांतून फांद्यांचा विस्तार व्हावा तशा आलापाच्या शाखा-उपशाखा निनादू लागल्या. एकमेकांशी नाते जोडीत जाणारी ती उपज संगीताची समज असणाऱ्या भाऊरावांच्या हृदयाला चाटून गेली. ते जागेवरच उभे राहिले आणि खिळून ऐकू लागले. तो कस– तो स्वरांचा ध्यास– ती रागाची आंस ऐकत ऐकत त्यांनी समोर पाहिले–

तो– तो काय आश्चर्य ! व्यासपीठाच्या मध्यावर तेजस्वी डोळ्यांचा– प्रसन्न चेहऱ्याचा– शब्दानुरूप हावभाव करणारा– बांधेसूद अंगलटीचा भास्करच बसलेला पाहून ते चकित झाले. भारावून गेले. फुलाच्या ओढीने मधुकर झुकावा तसे त्या गाण्याभोवती त्यांचे मन रुंजी घालू लागले.

भास्करची गानसमाधी त्यांना मोडवेना. गाण्याचे भान असल्याने मैफलीचा मान त्यांना राखावाच लागला. त्यांनी मोठ्या प्रयासाने व्यासपीठाकडे धावणाऱ्या

पायांना आवरले. पण गालाकडे धावणाऱ्या आसवांना आवरणे त्यांच्या हाता-बाहेरचे ठरले.

तरुण भास्करला मात्र मांडवाच्या दारी आलेल्या त्या श्रोत्याचे भान नव्हते. तो आपल्याच नादात धुंद होऊन म्हणत होता–

" काहे अब तुम आये हुए मोरे द्वारे "–

भाऊराव दबत दबत पुढे चालू लागले. माणसाचा समुद्र कापीत पुढे जाऊ लागले. तोच गायक अंतऱ्यावर पुढे म्हणू लागला–

" मिठी मिठी बतिया करो न मनरंग तुम.
वही जावो जिनको छतियन सो लागे–"

हा बोचरा नखराही आपल्याचसाठी आहे असे वाटून भाऊरावांच्या डोळ्यांतून पश्चात्तापाच्या आसवांची नदी उतरली, त्या नादसमुद्राला मिळायला आतुर झाली.

अंतऱ्याची आक्रमक कामगत संपल्यावर आणि राग संपल्यावर मात्र त्यांना अगदी राहवेना. त्या सिंधूला भेटायला हा बिंदू उतावळी करून व्यासपीठाकडे गेला आणि भास्करला मिठी मारून खांद्यावरचे उपरणे त्याच्या खांद्यावर घालून सद्‌गदित कंठाने भाऊराव म्हणाले–

" शाब्बास ! म्हटल्याप्रमाणे भास्कर होता त्याचा आज भास्करबुवा झाला. झालं गेलं विसरून जा. तेव्हा चुकलो म्हणून तुमच्यासारख्या रत्नाला मुकलो. पुन्हा कंपनीकडे पाय वळवा. आमच्यावर दया दाखवा."

भाऊरावांना कडकडून भेटून त्यांची पायधूळ माथी घेऊन बुवा म्हणाले.

" आपल्यामुळेच हा दिवस माझ्या आयुष्यात उगवला. त्या अपमानामुळेच मला आजचा सन्मान लाभला. काहीतरी करण्याची जिद्द माझ्या मनात जागवून गेला. कधी कधी अपमानही अपकार न ठरता उपकार ठरतो तो असा."

मग खास भाऊरावांच्या फर्माइशीची नाटचगीते होऊन ती अपूर्व मैफल संपली.

फैजमहम्मदखाँनी नथ्थनखाँकडे शिफारस करूनही भास्करबुवांना मनचे मन-सुबे काही दिवस मनातच ठेवायला लागले. कधी कधी निर्झर आणि सागर यांची गाठ पडेपर्यंत मध्ये अनेक वळणे जातात. अनेक वर्षेही जातात. भास्करबुवा आणि नथ्थनखाँसाहेब यांची गाठ पडेपर्यंत या गुणी छात्राला मधली वाट तुडवावीच लागली.

छोटे छोटे जलसे करून त्यांनी घराला मदत करायचे ठरवले. आणि एकीकडे थोडाफार पैसा कमवून मग नथ्थनखाँकडे जावयाचे ठरविले.

कलाकाराला फक्त कलेचाच संसार करून भागत नसते, तर संसाराची

कलाही अवगत असायला लागते. एकीकडे या मनस्वी व्यक्तीला कला आमंत्रण देत असते, तर दुसरीकडे संसारपाश त्याला जखडू पाहत असतात.

कलेचा सूर संभाळता संभाळता संसाराचा सूरही सांभाळावा लागतो. काही कमनशिब्यांच्या भाळी संसारात पदोपदी तार सप्तक आले की ते दुसऱ्या कुठल्या-तरी संवादी स्वरांकडे ओढले जाण्याची शक्यता असते.

काहींना ही संसृतीची कर्कश बडबड न ऐकवून ते भरकटतात, डोक्यात राख घालून प्रसंगी गृहत्यागही करतात.

कलासक्त विमुक्त आत्मा नव्या क्षितिजांच्या शोधात असतो. अशावेळी घराच्या टीचभर अंगणाच्या कुंपणात तर त्यांचे मन कसे लागणार ? पण तरीही सांसारिक कर्तव्यांची व मातृपितृऋणाची फेड करण्यासाठी डोईफोड करावीच लागते.

भास्करचे गायक भाऊराव कोल्हटकरांनी पदवीदान केल्यानंतरही त्याला घर चुकले नाही. कारण बुवा संन्यासी नव्हते. सर्वसंगपरित्यागी नव्हते. पण ही तारेवरची कसरत करताना तंबोऱ्याच्या तारेवरची कसरत कमी पडे. मग घर-कामावरचे लक्ष उडे.

हिरव्या रानाची चटक लागलेल्या राव्याला चार वाळक्या काटक्यांचे घरटे किती बांधून ठेवणार ? बुवा एकटेच बसत. आणि फैजमहम्मदखाँच्या आठवणींना उजाळा देत असत.

अशातच नथ्थनखाँसाहेब बडोद्यात आले. बडोदे सरकारला कलांची बूज आहे हे कळल्यावर, अनेक बुजुर्ग गायक, वादक आणि नर्तक बडोद्याला येत. कुणा-तरी मार्फत दरबारी वर्णी लावत. कीर्ती आणि संपत्ती मिळवून परत फिरत.

अशाच कलावंतांतील एक– आग्रा घराण्याचे विद्वान– अधिकारी गायक नथ्थनखाँसाहेब बडोद्यास आले. योगायोगाने त्यांची पहिली बैठक फैजमहम्मदखाँ-साहेबांकडेच झाली. एका थोर कलावंताने दुसऱ्या थोर कलावंताला दाद द्यावी तितक्याच उंचीचे ते गाणे झाले. अतोनात रंगले.

गुरुजन समोर असल्याने भास्कर अंग चोरून– मागे बसून गाणे ऐकत होता. तशी लहान वयातलीही त्याची समज जाणून, आपल्या लाडक्या चेल्याला हाताने धरून फैजमहम्मदखाँनी पुढे बसवले. अगदी मांडीला मांडी लावून बसवले. मोकळे-पणी भास्कर ऐकू लागला.

नथ्थनखाँसाहेब बैठकीवर येऊन बसले. आणि गायन सुरू करण्यापूर्वीच निम्मी बैठक जिंकून गेले. बालरवीच्या आगमनाची चाहूल केशरी सडे शिंपीत येणारी प्राची देऊन जाते. तशी रागमालेच्या आगमनाची चाहूल त्या रुबाबदार व्यक्ति-मत्त्वाने दिली.

उजळ रंगाचे– थोराड देहाचे आणि तेजस्वी डोळ्यांचे खाँसाहेब तंग, तुमान, काळी शेरवानी, आणि जरीकाठी फेटा यामुळे अधिकच रुबाबदार दिसत होते. त्यांची ती भव्य छबी भास्करबुवांच्या हृदयावर आगळाच ठसा उमटवून गेली.

हा पहिलाच पदन्यास डोळ्यांतून खोलवर रुतला. पार हृदयापर्यंत पोहोचला.

तोच नटबिहाग सुरू झाला. नटाची जानी दोस्ताप्रमाणे बिहागच्या गळ्यात गळा घालून चाललेली ती दिलजमाई, बैठक एकदम जमून गेली. द्रुतगतीतली 'झन् झन् झन् झन् पायल बाजे.' ऐकताना नूपुर घातलेली अभिसारिका श्रोत्यांच्या समोर येऊन उभी राहिली. ती आक्रमक चीज श्रोत्यांना जिंकून गेली.

विशेष म्हणजे नथ्थनखाँने अखेरपर्यंत आपली बैठक शिथिल वा कंटाळवाणी होऊ दिली नाही. नंतरचे परज, बहार इत्यादी राग एकाहून एक चढते बढतेच झाले.

फैजमहम्मदखाँच्या मैफलीत भास्करने सुंदर स्वरांचा आविष्कार अनुभवला होता. आत्मसातही केला होता. आज तो ठायलयीचा अवघड आविष्कारही किती सुंदर असू शकतो; त्याचा नव्यानेच अनुभव घेत होता.

चिजेचा मुखडा पकडतानाही ते अतिशय सहजतेने आणि तितक्याच अकल्पित-पणे समेवर येत आणि श्रोत्यांना अतिशय सुखद धक्का देत. तानही तयारीची, असिलतेच्या तडफेची. त्यामुळे बैठकीची बाजी झाली. विजेत्याच्या विश्वासाने लयीचे मारे डावपेच खेळवले गेले. तेव्हा नथ्थनखाँच्यावर– 'वाहव्वा– बहोत अच्छा' अशा स्तुतीसुमनांचा अखंड वर्षाव झाला.

नथ्थनखाँ गायलेले मालकंससारखे काही राग फैजमहम्मदांनी शिकवले होते. पण आज जसे नवे रंगरूप लेवून– अधिक राजबिंडे होऊन सामोरे आले होते. नेहमीच्या ओळखीचा मुलगा वरघोड्यावर बसून आला म्हणजे आगळा वेगळा वाटतो तसेच झाले.

त्या राजस आणि लोभस रूपाला विद्यार्थ्याचा विनय संभाळून देता येईल तेवढी वाहव्वा भास्करनेही दिली.

नंतरची राजवाड्यातली मैफलही अशीच आतोनात रंगली. त्या मैफलीच्या धुंदीत भास्कर असतानाच फैजमहम्मद या लाडक्या शिष्याला जवळ बोलावून म्हणाले—

"नथ्थनखाँका गाना कैसा लगा ?"

"बहोत अच्छा. जितके कसदार तितकेच रंगतदार. अशा तऱ्हेने गाईल तो हमखास मैफल मारील."

"अरे, हुकुमाचे पत्ते हाती असल्यावर कुठलाही डाव फत्ते होणारच. बेटा, तूही कलेचा व जीवनाचा डाव जिंकण्यासाठी याच गुरूकडे जायचं आहेस, शिकायचं

आहेस."

पुन्हा तोच विषय निघताच भास्कर गांगरला. आवंढा गिळून म्हणाला, "नही नही. ये सच नही."

त्याच्या पाठीवर हात फिरवून फैजमहम्मद म्हणाले–

" बिलकुल सच है बेटा, बिलकुल सच. जितनी ये धरती– ये आकाश– ये पानी– ये हवा– ये सूरज सच है इतनाही सच."

भास्कर गोरामोरा होऊन म्हणाला– " लेकीन आप..."

" पोरा, देऊन देऊन आमचा माठला आता खाली झालाय. आता तू नथ्थन-खाँकडे जायचं आहेस. नवं नवं हवं हवं ते मिळवायचं आहेस. बाबा रे– तुम्हा हिंदू लोकांत मुंज मुलगा पोटासाठी दहा घरी मधुकरी मागतो. तसा विद्येसाठी तू दहा घरी शिदोरी माग."

फैजमहम्मदखाँचे मूळचे घराणे हिंदूंचे होते हे भास्करबुवा ऐकून होते. पण " ॐ भवती भिक्षांदेही !" चा आणि भिक्षावळीचा अर्थ या मुसलमान पंडीताने त्यांना समजावून दिला, तेव्हा कलावंताचा कला हाच धर्म असतो याची प्रचीती भास्करबुवांना आली. तरीही त्यांची मान या प्रस्तावाला होकारार्थी हलली नाही. तशी भास्करला गदगदा हलवून फैजमहम्मद म्हणाले–

" तुझे मनूच्या माशाची कथा मालूम है ?"

" जी."

" तो ओंजळीत मावेनासा झाला तेव्हा मनूने त्याला तलावात, तिथे मावे-नासा झाला तेव्हा नदीत आणि शेवटी महासागरात ढकलले."

बुद्धिमान भास्कर संस्कृत शास्त्रे अवगाहन केलेला, त्यातून हजरजबाबी. झटकन गुरूला म्हणाला–

" पण खाँसाहेब, मनूने या साऱ्या गोष्टी माशाच्या विनंतीवरून केल्या. मी आपल्याला मला कुठे नेऊन सोडा अशी विनंती आजवर कधीच केलेली नाही !"

फैजमहम्मद सद्गदित होऊन म्हणाले–

" होय बेटा. आणि पुढेही करणार नाहीस. इतका माझ्याशी एकजीव झालास."

" आपल्याला मी पित्याच्या ठिकाणीच मानतो."

हुशार छात्राला त्याच्याच शब्दात पकडीत फैजमहम्मद म्हणाले– " होय ना ? मग या पित्याची आज्ञा म्हणून या आज्ञाधारक मुलाने नथ्थनखाँकडे जायचे आहे. संगीत कलेचा विकास साधायचा आहे. लयीचा विलास शिकायचा आहे. आणि मैफलींचा विश्वास संपादन करायचा आहे."

हुंदका देऊन खाँसाहेबांचे पाय घट्ट धरून भास्कर म्हणाला–

"या पायांपेक्षा मला कुठल्याच गोष्टी जास्त नाहीत."

त्याला जवळ बसवून–त्याच्या पाठीवरून हात फिरवीत त्याचे अश्रू स्वतःच्या बोटाने पुशीत फैजमहम्मद म्हणाले–

"अरे, देहाने दूर गेलास तरी मनाने तू इथे माझ्या मनातच राहशील. कान भरभरून ऐकवत राहशील."

"आणि मुठी भरभरून देतही राहील, खाँ साहेब–" जवळ बसून गुरुशिष्य संवाद ऐकणारा एक शिष्य दिनकर सरदेसाई न राहावून बोलून गेला.

गुरूला वंदन करून भास्कर म्हणाला – "आज चलतो. दिनकरच्या शिकवणीची वेळ झाली. मी कुठेही शिकलो, कुठेही गायलो तरी माझ्या दिवसाची आणि माझ्या मैफलीची सुरवात आपल्या पवित्र स्मरणाने होईल. कारण गुरूला स्मरून केली, की कुठलीही अवघड गोष्ट तरून जाईन."

तरीपण या तपोभूमीतून भास्करचे पाय लवकर बाहेर पडले नाहीत. दरम्यान तान्हुताई आणि दक्षिणादास यांचेतर्फे सातारच्या देवस्थळींची वेणू नामक मुलगी बुवांना सांगून आली. चांगल्या घराण्यातली चांगली मुलगी म्हणून लवकरच हे शुभमंगल झाले.

पण मुलगी तत्कालीन पद्धतीची म्हणजे केवळ बारा-चौदाचीच. संसाराला अजाण. म्हणून मातोश्री जानकीबाई बडोद्यात लेकाच्या बिऱ्हाडी राहायला आल्या. मुलीला वळण लावू लागल्या.

वडील बंधू त्र्यंबकराव याचा भास्करवर लोभ होता. आणि त्याच्या संगीत साधनेला आशीर्वादही होता. त्याने पुढाकार घेऊन लग्न करून दिले. आणि भांडी-कुंडी देऊन संसार थाटून दिला.

कुठे कुठे मैफली होत होत्या. कुठे कुठे शिकवण्या चालू होत्या. त्यातून साधे राहाणीमान, चैनीला फाटा. आणि स्वस्ताई. त्यामुळे कर्जबिर्ज न होता भास्करबुवा सुखासमाधानाने संसार करू लागले. नाहीतरी सुख पैशापेक्षा समाधानावरच अवलंबून असते.

गम्मत अशी की, याच दरम्यान फैजमहम्मदखाँकडे नथ्थनखाँनी भास्करचे गाणे प्रथम ऐकले. आणि तेही त्या छोटचा गायकावर प्रभावित झाले. नंतर मेहमानांच्या 'खाण्यापिण्याचा' कार्यक्रम झाला.

यावेळीही भास्करने सर्व तऱ्हेची–अगदी मांस–मटण आणण्यापासून शिजवण्यापर्यंत– सेवा केली. पण कशाचेही सेवन केले नाही. तेव्हा मैफलीस आलेल्या फैजमहम्मदांच्या शिष्या आणि भास्करांच्या गुरुभगिनी अभिमानाने म्हणाल्या–

"खाण्यापिण्याचे नियम आमचे गुरुजी पाळतात आणि भैय्या, भास्करही पाळतात. काय खायचे-प्यायचे हेच नव्हे, तर काय ऐकायचे हेही आमचे गुरुजी

ठरवतात."

नथ्थनखाँ हसून म्हणाले, " बिलकुल बराबर. बिलकुल बराबर. कुठलीही वाईट गोष्ट गळ्यात झटकन् जाऊन बसते. पण एकदा बसली की पटकन् निघू शकत नाही. फैज, आपल्याला तुमचा हा तेजस्वी लडका आवडला. आणि त्याची ओजस्वी गायकीही."

"होय ना ? मग आता हा तुमच्याच हवाली करणार आहे."

भास्करने आशेने विचारले, "आपण मला शिकवाल ?"

"क्यूं नही ? अरे, दगडावर संस्कार केला तर शिल्प होते–हिऱ्यावर केला तर तेज त्रिखंडात जाते. हो ना ? आणि तू तर फैजने पैलू पाडलेले रत्न."

"भैय्या नथन, मग हे अमोल रत्न पदरी असू दे."

"लेकीन आम्ही आज मुंबई, तर उद्या म्हैसूर-धारवाडकडे. विद्या जमणार कशी ?"

"आपण तिथे असाल तिथे येत जाईन आणि विद्या घेत जाईन."

आणि मग बडोद्यातली नथ्थनखाँची एकही बैठक ते तिथे असेपर्यंत या बेटयाने चुकवली नाही.

नथ्थनखाँकडे गाणे शिकायचे भास्करने मनावर घेतले. पण मनामागोमाग देहाला नेहमी जाता येते, असे थोडेच आहे ? परिस्थितीचे लगाम वळवतील तिकडे देहाच्या अश्वाला वळावेच लागते.

*

# आठ

भास्करबुवांना लहान वयात तीन सप्तकांचा संसार पेलता आला, तरी वेणूला लहान वयात तीन दगडांचा संसार कसा पेलवणार ? म्हणूनच जानकी सासूबाई मदतीला आल्या होत्या. सुनेला हळूहळू मदत करीत होत्या. स्वयंपाकही शिकवीत होत्या.

कधी वेडीवाकडी भाकरी झाली, की भास्करबुवा चिडवायचे– "आज दंतुर किनारा दिसतोय !" कधी थोडीफार जळली–करपली, की म्हणायचे– "आज खग्रास चंद्रग्रहण की खंडग्रास सूर्यग्रहण ?"

विनोद न समजून वेणू मुसूमुसू रडू लागायची. मग सासू मदतीला धावायची–

" पुरे रे, मोठा आलाय चिडवणेवाला. गायकी तुला एका दिवसात आली का ?"

" बरं बुवा, चुकलो. होऊ देत मुंगीच्या पावलाने प्रगती." आणि भास्करबुवा शिकवणीला जात.

तरीही लगीन झाल्यावर तब्बल पांच वर्षे वेणू माहेरी जाऊ शकली नाही. तशी सातारकरांनी छेडायला सुरवात केली–

" तो नाटक्या ब्राह्मणतरी आहे ना ? का आपला अलबत्या गलबत्या ?"

मग वेणूची आई फणकारायची, " इथे साताऱ्यात दीक्षितांकडे मुलाची मावशी दिलीय्. ती कऱ्हाडे ब्राह्मण आहे. आता कळली ना जात ? नसता बात !"

नंतर धारवाडला जायचं ठरवल्यावर मात्र, सातारला बुवांनी स्वतः वेणूला देवस्थळींकडे पोहोचवली. आणि बजावले–

" मुलगी पांच वर्षांनी आलेली आहे. तेव्हा प्रत्येक वर्षाचा एकेक महिना म्हणून चांगली चारपाच महिने ठेवून घ्या. माझे धारवाडला लागी लागल्यावर पत्र लिहीन."

जावयाला देवस्थळी दांपत्याने खुशीत निरोप दिला. तरी शेजारच्या दुतोंडी आयाबाया कुत्सितपणे विचारू लागल्या–

" आग्गोबाई, चार महिने का मुलगी माहेरपणाला धाडलीन् ? टाकून बिकून तर देणार नाही ? परत नेणार ना ?"

बिचारी वेणू आता लहान नव्हती, अठरा-एकोणीसाची होती. या असल्या फुसकुल्या एका कानानी ऐकायची आणि दुसऱ्या कानाने सोडून द्यायची. कारण त्या कानात बडोद्यात पोटभर ऐकलेले, यजमानांचे सुमधुर संगीत आधीच घर करून राहिलेले असायचे.

आणि मग भास्करबुवांची निरोप देतानाच्या रात्रीची धून आठवायची. "माहेरचं वेणू नाव आहे ना तुझं ? रंध्रारंध्रातून संगीत भरून घ्यायला हवंस तू. तरच या गानवेड्या तरुणाच्या सुखदुःखाशी समरस होशील. सुखी होशील."

ती उत्तर द्यायची– " मी प्रयत्न करीन. जरूर प्रयत्न करीन."

" हे बघ. बाळासाहेब महस्त्रबुद्धे म्हणून धारवाडच्या ट्रेनिंग कॉलेजमध्ये अधिकारी आहेत. ते माझ्या गाण्यावर खूष आहेत. म्हैसूरला जाणार असलेल्या नथ्थनखाँकडे माझे शिक्षण बिनबोभाट व्हावे म्हणून त्यांनी मला संगीत शिक्षकाची जागा देऊ केली आहे."

" वा. मग छानच झालं."

" ते अजून ठरायचं आहे. कारण माझा पिंड गाण्यामागे धावणाराचा आहे.

नोकरीच्या पैशामागे धावणाऱ्याचा नाही."

"सासूबाई म्हणत होत्या–बाळासाहेब उदार आहेत. त्यातून स्वारीचे चाहते आहेत. तेव्हा मैफलीसाठी आणि शिक्षणासाठी अधूनमधून रजा देणार आहेत."

"त्या अटीवरच तर नोकरी पत्करतो आहे. पण वेणू, तू मला समजून घ्यायला हवंस. जन्मभर ढापणं लावून धृतराष्ट्राशी संसार करणाऱ्या गांधारीगत पत्नी नको आहे मला. माझ्या आवडीनिवडीशी समरस होणारी पत्नी हवीय् मला."

"म्हटलं, मला गाणं आवडतं. म्हणूनच स्वारी आवडली." आणि कुशीवर वळून उशीत तोंड खुपसून वेणू गुणगुणू लागली, "उगीच का कांता गांजीता."

तिचे केस कुरवाळीत बुवा म्हणाले– "असं नाही म्हणायचं वेडाबाई."

"मग कसं ? ऐकवा ना."

आणि मग हुकमी स्वर लावणाऱ्या बुवांनी आपल्या आवडत्या माणसाची फर्माईश पुरी केली. 'उगीच का कांता" ऐकता ऐकता वेणूचा डोळा लागला. आणि ते ऐकवता ऐकवता भास्करबुवांचाही गळा थांबला.

सन अठराशे पंचाण्णव ते एकोणीसशे पाचपर्यंत भास्करबुवांचे पाऊल मुंबई, धारवाड, म्हैसूर अशा त्रिज्येमध्ये फिरत राहिले. कारण नव्याने अंगीकारलेले गुरू नथ्थनखाँसाहेब या त्रिकोणातच हिंडत होते. मधून मधून भोज्याला शिवून यावे, तसे हा आग्रा घराण्याचा गायक वर्षातून एकदा तरी आग्ऱ्यालाही जाऊन येत असे.

जी सूर्याची दिशा, ती सूर्यफुलाची. जी गुरूची दिशा, ती शिष्याची. नथ्थन-खाँच्या बडोद्यातील मुक्कामात संगीताची नवी क्षितिजे भास्करबुवांना दृग्गोचर होऊ लागली. घरच्यांची उपासमार होऊ नये आणि संगीत शिक्षणाचीही उपास-मार होऊ नये, या दूरदृष्टीने भास्करबुवांनी धारवाडला घर करून शिवाय मुंबई-तही पाऊल टाकायचे ठरवले.

मुंबई ही बहुढंगी–बहुरंगी. अठरापगड जातीने भरलेली. तरीही कलांची कदर करणारी. कलावंताचा आदर करणारी. अंगी पराक्रम असेल तर हे पराक्रमाचे आगर जिद्दी कलावंतांला यशाचे शिखर सहज गाठू देत असे. म्हणून प्रथम बुवांनी मुंबईच गाठली.

हे जाणून फैजमहंमदांनी भास्करला मोठ्या प्रेमाने मुंबईस जाण्यास निरोप दिला. पण बालपणापासून लालनपालन केलेली शकुंतला सासरी धाडताना कण्वांच्या हृदयात दुःखाचे कल्लोळ उठले. त्याच जातीचे कल्लोळ भास्कर बडोदा सोडून

निघाला, तेव्हा फैजमहंमदांच्या हृदयात उठले. त्याचे हात कुरवाळीत ते म्हणाले–

"मेरी याद रखना, बेटा भास्कर. निर्झराचा सागर झाला, की जन्मदात्या डोंगर विसरतो."

"पण हा भास्कर जनसागराला मिळला, तरी उगवतीच्या पर्वतश्रेष्ठाला कधीही विसरणार नाही."

आणि सुरांचाच नव्हे, तर वाणीचाही सच्चा असलेला भास्कर खरंच या गुरूला विसरला नाही. मातेच्या उपदेशानुसार कीर्ती आणि संपत्ती पायाशी येऊनही उतला नाही, मातला नाही. विद्यार्जनाचा घेतला वसा टाकला नाही. म्हणूनच याचा गुरूंची कहाणी साठा उत्तरी सुफळ संपूर्ण झाली.

मुंबईस जाताना मात्र भास्करच्या हातात पैशाची पुंजी नव्हती; पण कंठात सरस्वती रुंजी घालीत होती. त्याच भांडवलावर हा युवक मुंबापुरीसारख्या, सर्वश्रेष्ठ मंडळींची स्पर्धा असणाऱ्या आखाड्यात उतरण्यास सिद्ध झाला होता.

बडे हुद्देदार तेलंग बंधू, संगीत विद्याचालक परशुराम बर्वे, भाऊराव कोल्हटकर आणि इतर अनेक या गुणी युवकाची मुंबईत वाटच पाहत होते. या फुलाचा सुगंध फूल तिथे पोहोचण्यापूर्वीच वाऱ्याचे बोट धरून मुंबईच्या सीमेवर पोहोचला होता.

त्यातून मुंबापुरी मोठी नखरेल नारी. स्थापत्य–चित्र, शिल्प, आदींत तिची कुणी करावी बरोबरी ?

सारांश अशा सुरील्या वातावरणात भास्करबुवांचे उत्स्फूर्त स्वागत झाले.

मुंबईकर त्याचे बांधेसूद अस्ताई अंतरे आणि रंगिले गायन ऐकून चकीत झाले. राग भरण्याची रंगतदार व तितकीच शिस्तवार पद्धत प्रथमश्रवणीच श्रोत्यांच्या मनात घर करून गेली.

आणि हिंदूंतही काही अद्वितीय मुसलमान गायकांना जड वाटणारा– भारी होईलसा गायक उदयास येत आहे हे पाहून अभिमानही वाटला.

नाटकातल्या पदांचे छंदिष्ट पित्रे वकील शेजारी बसलेल्या मणेरीकर मास्तरांना मैफील ऐकताना म्हणाले–

"हा भास्कर वर आल्यावर मुंबईच्या क्षितिजावरील ताऱ्यांना आणि चांदण्यांना पार खाऊन टाकणार. नोकरीसाठी धारवाडला गेले, तरी मैफलीसाठी अधूनमधून इथं आलेच पाहिजेत हे."

"अहो, यांच्या गायकीला भिऊन काही बुजुर्गांनी मुंबई सोडली नाही म्हणजे मिळवली."

कावळे मणेरीकर मास्तर असे म्हणताच शेजारी बसलेले नाना ठोसर म्हणाले– "अहो, हा बखल्यांचा भास्कर नाही. हा एक योगभ्रष्ट गंधर्वच आहे."

परशुराम बर्वेही कौतुकले– "मुख्य म्हणजे याचे गाणे जितके मनोहर, तितकीच मुद्राही मनोहर. चिजेचा मुखडा जितका सुंदर, तितकाच याचा रुबाबदार मुखडाही सुंदर. शब्द वेडेवाकडे होणार नाहीत की तोंडही वेडेवाकडे होणार नाही."

वाणी तरी किती शुद्ध. नुसता गानपंडीतच नव्हे, तर संस्कृत पंडीतही आहे म्हणे. अंगविक्षेप नाहीत. आळोखेपिळोखे नाहीत."

"अहो, उगीच इकडून तिकडून गोळा केलेले ब्याऊम्याऊ नाही. गुरुमुखीचा सामवेद आहे हा. म्हणूनच शब्द वेचून– घासून, पुसून टाकतो आहे. अहाहा ऽ ! गायन नव्हे, दिव्य सुगंधाची खैरात करणारा सदाबहार प्रफुल्लित गुलाबच." असा मंगेशराव तेलंगांनी शेरा मारला. त्यावर त्यांचे बंधू पुरुषोत्तमराव तेलंग म्हणाले–

"अरे, या गाण्याला असला तसला सुगंध नाही. महाराष्ट्रातली कढीभात की बी नही. बल्के कोर्मेकी खुषबों आती है !"

गाणे संपल्यानंतर बुवांना काहीजणांनी जिज्ञासेने विचारले, "तुमच्या गाण्यात कोर्मेकी खुशबू आहे म्हणजे काय ?"

"पुरुषोत्तमराव मोठे विनोदी आहेत."

तोच गोविंदराव टेंबे म्हणाले, "पण कोर्मा म्हणजे काय ?"

भास्करबुवांनी हसून रहस्य कथन केले, "कोर्मा म्हणून मुसलमानांमध्ये मुबलक मसाल्याचं मटणाचं कालवण."

गोविंदरावांनी मिस्कीलपणे विचारले, "तुम्ही ते चाखलंत वाटतं ?"

यावर भास्करराव आवेशाने म्हणाले,

"मी मांसाहारी नाही. त्यामुळे कोर्मा नाही, परंतु मी बडोद्यास माझ्या वस्तादाच्या हाताने बनवलेली कढी प्यायलो आहे. आणि त्या कढीला कोर्म्याची खुशबू होती. त्या कढीची तुम्हाला गम्मत सांगतो–

माझा बालपणी आवाज चांगला म्हणून मी बडोद्यातील फैजमहंमदखाँ-साहेबांकडे शिकू लागलो. एक दिवस घरी पक्ष असल्यामुळे मला तालमीला जायला जमले नाही. तशी खाँसाहेबांनी विचारले–

"काल का आला नाहीस ? का टिवल्याबावल्या करीत राहिलास ?"

"छे छे, घरी पक्ष होते– म्हणजे पितरांना भोजन होते."

"पक्षात काय काय जेवायला करतात ?"

"गोडधोड, वडे आणि कढी."

कढीचं नाव घेताच आंबटषौकी खाँसाहेब यांच्या अंगात काय संचारलं कोण जाणे ? ते मांडीवर थाप मारून म्हणाले–

" अबे, तुम बम्मन कढी क्या पकाओंगे ? मैं तुझे कढी खिलाता हूँ."

तालीम राहिली बाजूला आणि कढीचीच मिरवणूक पुढे सुरू झाली. खाँ-साहेबांनी अंगावर कपडे चढवले आणि मला बरोबर घेऊन काठी टेकत ते कुंभार-वाड्याकडे निघाले. आता ही मुसलमानाच्या हातची कढी प्यायची कशी ? अशा मोठ्या संकटात मी पडलो ! परंतु वस्तादांचा प्रसाद नको तरी कसा म्हणायचा ?

गाडगीमडकी विकतात तिथे कढी विकतात हे प्रथमच पाहणार होतो. पण कुभारवाड्यात गेल्यावर खाँसाहेबांनी एक शेराचं कोरं मडकं खरेदी केलं. आणि ते माझ्या हातात दिलं. माझ्या हातातलं मडकं पाहून बाजारात कुणाच्या मनात काही अभद्र येऊ नये म्हणून मी सतत हसतमुखच चाललो.

खाँसाहेब पुढे आणि मी मडके घेऊन त्यांच्यामागे, अशी आमची वरात भर बाजारात.

मग गंध्याकडे गेलो. अत्तरबित्तर न खरिदता केवळ गुलाबपाणीच मागितले गेले. तेव्हा त्या गंध्याच्या काळजाचे पाणी पाणी झाले असणार.

घरी आल्यावर त्यांनी ते मडकं माझ्याकडून धुऊन घेतले आणि नंतर त्यात गुलाबपाणी ओतून ते टांगून ठेवले.

शिकवणी झाल्यावर चार तासांनी मडके उघडले तो गुलाबपाण्याचा थेंबही मडक्यात दिसेना. गुलाबाचा वास मात्र आसमंत भरून उरलेला.

मी प्रश्नचिन्हांकित चेहरा करून विचारले– " गुलाबपाणी कहा है ?"

फैजमहम्मद डोळे मिचकावून म्हणाले, " बेटा, चार घंटे मे तू माझा हमीर राग कंठात जिरवून टाकलास. तसेच या मडक्याने गुलाबपाणी जिरवून टाकले."

अन् मग त्यांनी आटीव दूध मडक्यात विरजून टाकले. रवीने घुसळून विरजण लावताना ते म्हणाले–

" राग चांगला मंद्र सप्तकापासून तार सप्तकापर्यंत घुसळला म्हणजे कानांना चांगला लागतो तसेच दही खालपासून वरपर्यंत चांगले घुसळले म्हणजे विरजण चांगले लागते अच्छा, कल सुबह आ जाव."

दुसरे दिवशी मी सकाळी जाऊन पाहातो तो खाँसाहेब एका सुरीने कांदा कापत बसले होते. तो इतका नाजूक की जाईच्या फुलांच्या पाकळ्यांच ढीगच जणू !

मला दोन पलटे घटवायला सांगून ते आत गेले. आणि सुमारे तास दीड तासाने कढीमकट बाहेर आले.

भल्या मोठ्या वाडग्यातली ती कढी कसली ! खाऱ्या मसाल्याची बासुंदीच ती ! मी जन्मात पुन्हा तशी कढी चाखली नाही. कारण ती कढी असूनदेखील तिला कोर्म्याची खुशबू होती.

माझ्या गाण्यात त्यामुळेच कोर्मेकी खुशबू आहे. नाहीतर समजाल मी कोर्मा खातो."

गोविंदराव टेंबे म्हणाले, "तुमच्यासारखी गाण्यात खुशबू येईल तर कधीच काय, पण कोणीही कोर्मादेखील खाईल."

बुवा एकदम डोळे मिटून म्हणाले, "पण माझ्या गुरुजींचे प्रेमळ अंतःकरण त्यात कुठून येणार ? माझं केवढं भाग्य !"

हजरजबाबी टेंबे पटकन म्हणाले, "माझं भाग्यही कमी नाही. मी आपल्याला गुरू केलंय."

अशा तऱ्हेने गाजलेल्या पहिल्या मैफलीचे बऱ्यापैकी मानधन आले, पण ते पैसे हाती येताच भास्करबुवांना ना आठवला त्रिंबकदादा– ना आठवली माता वा नवोढा कांता. त्यांना स्मरला फक्त गुरू. केवळ गुरू.

हा गुरुपरायण कृतज्ञ तरुण उठला. तडक जव्हेरी बाजारात गेला. तेथे तीन तोळ्याचे ठणठणीत कडे करून आणले.

सवड सापडताच तडक ते बडोद्याला गेले. गाठोडे जेमतेम तान्हुताईंच्या घरी टाकले आणि 'आलोच' म्हणून तातडीने फैजमहम्मदखाँच्या मठीकडे पळाले.

अनेक दिवसांनी भावाची स्वारी घरी आली म्हणून दारी स्वागताला आलेली बहीण रुसून उंबऱ्यावरच बैठक मारून बसली. तशी दक्षिणदासांनीच समजून घातली–

"रागावू नका. भास्कर पहिल्यापासून असाच नादिष्ट आहे. मनस्वी आहे. गुरूला सामोरे जाताना बहीणच काय अख्खे घर आडवे आले तरी बाजूला करील. नव्हे, आजवर तेच करत आलाय. म्हणूनच एवढ्या लहान वयात एवढा मोठा गायक झालाय. बरं, ते जाऊ दे. आत चला. फार दिवसांनी लेकरू आलंय. त्याच्या आवडीचे काहीबाही करा. गोडधोड करा. मी बाजारात जातो नि त्याच्या आवडीच्या भाज्या घेऊन येतो."

असे म्हणून ते लगबगीने बाहेर पडले

इकडे भास्करच्या जेवणाची चर्चा चालू असताना तिकडे तहानभूक हरपून भास्कर गुरुचरणावर लोटांगण घालीत होता. कुणाच्या शिकवणीची वेळ नसल्याने खाँसाहेब अंधारात बसून हातातील स्मरणी ओढीत अल्लाचा जप करत होते, तोच त्यांच्या पायांना कुणाचा तरी घट्टमुट्ट स्पर्श झाला

"कौन है ?" असे डोळे मिटूनच विचारले. तो हातांना कसल्यातरी वलयांचा स्पर्श झाला.

"ये क्या है ?"

असा प्रश्न पुन्हा येतोय तोच सवयीने माहीत झालेला दीप घेऊन भास्कर

आला. त्या प्रकाशात हातातल्या नव्या कड्यातले बावनकशी सोने एकदम झळाळले. डोळे दिपून खाँसाहेब म्हणाले, " ये तुमने क्या किया भास्कर ?"

" कुछ नहीं. आपण माझ्या गळ्यात चिजांची सोन्याची खाण बसवलीत. मुंबईच्या पहिल्या मैफलीत त्या खाणीने दिलेले हे सोने गुरुचरणी अर्पण केले तर चुकले कुठे ?"

" अरे पण तुझा घर-संसार ?"

" कलेचा संसार आधी, घरचा संसार नंतर. "

खाँसाहेबांनी प्रेमभराने या मानसपुत्राला कडकडून मिठी मारली. जशी पुनवेच्या चंद्राची आणि भरतीच्या सागराचीच गळाभेटी झाली.

त्यानंतर भास्कर जेव्हा जेव्हा बडोद्याला येई तेव्हा तेव्हा फैजमहम्मदखांना थैली– कापडचोपड– उपरणे– चढाव आदी घेऊन जाई. रक्ताच्या नात्यापेक्षा कलेच्या नात्याला जागणारीच ही वल्ली नव्हती काय ? रक्ताला यश येतंच असं नाही, पण भक्तीला जरूर येतं– हे भास्करबुवा ओळखून होते म्हणूनच " माझी देवपूजा पाय तुझे गुरुराजा ' असे होते–

*

## नऊ

नंतरच्या बिदागीची थैली दत्तासमोर ठेवताना भास्करबुवा पत्नीला म्हणाले, " वेणू, या पैशातून तुला पातळाची जोडी आणायची बरं का."

" पातळाची जोडी राहू दे. प्रथम तंबोऱ्याची जोडी येऊ दे. "

" पण बाहेर यायला जायला चांगलेसे लुगडे......"

" नसू दे. देहाभोवती स्वर लपेटलेले असले की दुसऱ्या कशाची शुद्ध राहतीय् कुणाला ?"

वेणूचा हा वाग्विलास ऐकून भास्करबुवांच्यातला विलासी पुरुष जागा झाला आणि त्यांनी वेणूला दोन्ही हातांनी लेपटून घेतले......

ती दूर होण्यासाठी धडपडत म्हणाली, " छे ! छे ! हे काय ?"

" स्वराशी लय जेव्हा एकरूप होते तेव्हाच मैफल रंगते."

आणि अशाही मैफली अधूनमधून रंगत. जीवनाची बढत करत.

काही दिवसांनी भास्करबुवांना पहिला वहिला मुलगा झाला. पण हा कळा

फूल होण्याआधीच कोमेजून गेला.

सहा महिन्यांच्या मुलाचे जास्त झाले तेव्हा नेहमीच्या वैद्यांना बोलावण्यात आले. वैद्यबुवा तपासून मात्रा चाटवून निघून गेले. आणि बुवा शांतपणे शिकवणीला बसले.

सुमारे चार तासांनी भास्करबुवांचा स्वर अनंताचा वेध घेत असतानाच ते चिमणे पाखरू अनंतात उडून गेले ! ! पण ते मातापित्यांना कळलंच नाही...

फैजमहम्मद एकदा बोलता बोलता आपल्या जवळच्या नातेवाईकांची हद्दुखाँची आठवण सांगून गेले होते की त्यांना गाण्यापुढे खाण्याचीच नव्हे तर मनुष्यप्राण्याचीही शुद्ध नसे.

त्यांची बहीण वारली आणि कबरस्तानात नेण्याची वेळ आली तेव्हा रियाज करणाऱ्या हद्दुखाँना बोलावणे गेले. तशी त्यांनी फर्मान काढले,

"आणखी तीन तासांनी माझी मेहनत संपल्यावर प्रेतयात्रा काढा. पहिला गाना–फिर खाना–बाद एकदिन जाना."

–मुलाची हालचाल होईना म्हणून कुशंकेने घेरून वैद्यबुवांना बोलावण्यात आले. त्यांनी मुलाला तपासले आणि गंभीर निदान केले–

"मूल तासांपूर्वीच गेलेले आहे !!!"

हे ऐकून वेणूला ब्रह्मांड आठवले. आणि भास्करबुवांना हद्दुखाँ आठवले...

त्याच पंधरवडयात नथ्थनखाँसाहेबांचे म्हैसूरला निघून येण्यासंबंधीचे आग्र्याहून पत्र आले. तेव्हा भास्करबुवांचे शिष्य मणेरीकर मास्तर यांच्या पत्नीला वेणूच्या सोबतीसाठी महिनाभर आणून ठेवण्यात आले. आणि मगच बुवा म्हैसूरच्या रस्त्याला लागले.

नथ्थनखाँना जशी संगीताची नजर होती तशीच व्यवहाराचीही नजर होती. दोन्हीकडे ते सारखेच चतुर होते. पोषाखी मुंबापुरीत आपल्या गायकीची हवा लगोलग निर्माण होण्यासारखी नाही असा अंदाज येताच साधारण एका वर्षातच नथ्थनखाँनी मुंबापुरीला रामराम ठोकला. आणि बडोदे नरेशांइतकेच रसिक व कलाप्रेमी असलेल्या म्हैसूर दरबारचा आश्रय घ्यायचे ठरवले. हा लागाबांधा जुना होता.

कारण पूर्वी एकदा म्हैसूरचे त्यावेळचे राजे चामराज महाराज उत्तरेस गेले असता त्यांनी आग्र्यास नथ्थनखाँचे गाणे ऐकले होते. ते खूष झाले होते. दक्षिणात्य संगीताचे भोक्ते असून उत्तरेने त्यांना भारावून टाकले होते. नथ्थनखाँना मानापानाचे निमंत्रण देऊनच चामराज परतले होते.

आग्रा ते म्हैसूर प्रवास कंटाळवाणा होऊ नये म्हणून त्यांनी महाराष्ट्रातून भास्करबुवांना आपल्याबरोबर घेतले होते. चेला हजर झाला. आणि गुरुजींची

अवस्था पाहून स्तंभितच झाला.

कारण प्रवासाच्या श्रमपरिहारार्थ खाँसाहेबांनी मदिरादेवीचा भरपूर प्रसाद ग्रहण केला होता.

" मद्यानंदी लागे टाळी कोण देहाते सांभाळी " –
अशा अवस्थेतच ते दरबार हॉलमध्ये गेले. भास्करबुवांनी वाद्ये लावली. सारंगिये सरसावून बसले. पण आज सुरांपेक्षा सुरेचीच पकड अनावर झाली. समोरच्या महाराजांना डावलून मदिरेचीच राणी प्रस्थापित झाली.

एका रागाचे चरण, दुसऱ्याचा मुखडा, तिसऱ्याचा अंतरा अशा अवस्थेतच गाणे झाले. झाले कसले ! स्पेशल आडवे पडले !! गाणे आणि गाणारा – दोन्ही !!

नथ्थनखाँ बऱ्यावाईटाच्या शुद्धीपलीकडे होते. पण भास्करबुवांच्या जिवाला घोर जखम झाली ! खाँसाहेबांना जन्माचा म्हैसूर दरबार आंचवेल अशी खात्री झाली.

तोच राजांचे खाजगी कारभारी–दरबार बक्षी–दोन हजारांच्या दोन थैल्या ठेवून निरोप सांगते झाले. –

" ही कालच्या गाण्याची बिदागी. पैसे घ्यावेत आणि आग्र्यास परत जावे."

आज शुद्धीवर असलेल्या खाँसाहेबांनी भास्करबुवांना विचारले–

" भास्कर, ये क्या मामला है ?"

भास्करबुवा कधी न बोलणारे–न संतापणारे; पण राजलक्ष्मी गुरूच्या कर्माने दूर गेली याची चीड आणि खंत एकवटून निर्व्यसनी बुवा बोलून गेले– " हे आपले कमनशीब !"

आणि भास्करबुवाच कपाळाला हात लावून बसले.

" पण बेटा, झालंय तरी काय ? तुझ्यागत सात्विक लडक्याचा रोष ? नेहमीची रोषणाई टाकून ?"

" रोषणाई ? हो. दारूत बुडलेलं गाणं ऐकून महाराजांनी हातांचे दिवे ओवाळले नाहीत हे नशीबच समजा. काल रात्री महाराजांच्यापुढे आपलं जे दिव्य गाणं झालं त्याचा हा परिपाक...परिणाम."

खाँसाहेबांच्या डोक्यात प्रकाश पडला. त्यांची अस्मिता पेटून उठली. त्यांनी ती बिदागी परत केली. आणि परत निरोप दिला–

" आज रात्री महाराजांना गाणं ऐकवीन, मगच हा नथ्थनखाँ आग्र्याला परत जाईल. महाराजांनी गाणं ऐकलंच पाहिजे. सांगून ठेवतोय. त्यावाचून हालायचा नाही."

म्हैसूरचे राजे म्हणजे कलावंतांचे माहेरघर. त्यांनी तो निरोप ऐकला. मानला. पुन्हा दरबार भरवला. त्या रात्रीचे गाणे 'न भूतो न भविष्यती' इतके

रंगले. सुरा जाऊन गुरथी प्रकटली. ब्रह्मानंदाचे कमळ फुलले !

स्वत:च्या हाताने विस्कटलेले दैव स्वत:च्याच हाताने माणसाला सावरता येते. नथ्थनखांचे तसेच झाले. महाराजांनी त्यांची कदर केली. त्यांची दरबार गायक म्हणून नेमणूक झाली. म्हैसूरच्या—हिंदुस्थानभर गाजत असणाऱ्या विजया-दशमीच्या महोत्सवात हजेरी लावण्याची संधी मिळाली.

या संधीचा पुरेपूर लाभ न उठवील तो द्रष्टा गायक कसला. नथ्थनखांनी स्वरात प्राण ओतून मैफल रंगवली. चामराज महाराजांनी कानात प्राण आणून ती ऐकली. आणि आणि या आग्रा घराण्याच्या लयीच्या बादशहाला गळ्यातला मोत्याचा कंठा काढून महाराजांनी घातला. तेव्हा नथ्थनखांच्या नेत्रांचे पाणी अधिक की कंठ्यातल्या मोत्यांचे अधिक असा भास्करबुवांना प्रश्न पडला.

सच्चा कलावंत हा मुक्तात्मा असतो. स्वच्छंद कलाविहार करण्यात आनंद मानणारा असतो. सरकारी मुजरे करण्यापेक्षा सरस्वतीला मुजरे करण्यातच धन्यता मानणार असतो.

नथ्थनखाँसाहेबही या कलावंताच्या स्वातंत्र्याला मानणारे होते. जपणारे होते. त्यांना राजसिंहासनाच्या वजनाने कलेचे कलेवर करून घ्यायचे नव्हते.

स्वत:ची व कलेची मस्ती संभाळणाऱ्या या गायकाने मग दरबारी आमंत्रण असेल तेव्हाच म्हैसूरला जावे आणि एरवी गानशौकीन महाराष्ट्राच्या जवळ म्हणून धारवाडला घर करायचे ठरवले.

नथ्थनखाँच्या हालचालीवर बारीक नजर असणारे आणि त्यांची वेळोवेळी खबर घेणारे भास्करबुवाही धारवाडला आधीच ट्रेनिंगकॉलेजमध्ये नोकरीवर संगीत-शिक्षक म्हणून रुजू झाले होते.

खरे तर भास्करबुवांचे बस्तान मुंबईत चांगले बसले होते. गिरगावात खोली घेतली होती. कुटुंब व आईसकट बिऱ्हाड केले होते. चरितार्थ चालवण्यापुरती गाणी होत होती. नावही होत होते.

पण घराच्या अंगणात उडणारा तो कुक्कुट थोडाच होता ? तो तर दशदिशा मिठीत कवळायला निघालेला जातिवंत गरुड होता. संगीताची नवनवी क्षितिजे धुंडाळून संगीताचा अमृतकुंभ हस्तगत करायला निघालेला वैनतेय होता.

बाळासाहेब सहस्रबुद्धे यांनी संगीतप्रसारासाठी देऊ केलेली नोकरी भास्कर-बुवांच्या सर्व अटी मान्य करून देण्यात आलेली होती. देताना बाळासाहेब सहस्रबुद्धे म्हणाले होते—

" तुम्हाला हवी तेव्हा हवी तेवढी रजा मिळेल. आपणागत मातब्बर गायक संस्थेच्या पटावर आहेत याचा संस्थेला अभिमान आहे. तुमचा अपमान होईल असे मी कधीही करणार नाही. बिनधास्त कुटुंब इथे घेऊन या. कोपतकेरीजवळ जागा बघून

घेतली आहे."

अशातऱ्हेने संसारासाठी पैशाची ठराविक आवक येऊ लागल्याने भास्कर-बुवांनी वेणूला धारवाडला आणले होते. नेटका संसार सुरू झाला आणि उर्वरित वेळ त्यांना शिक्षणासाठी देता येऊ लागला.

याच सुमारास धारवाडला बनारसी बाज वाजवणारा कामप्रसाद नावाचा नामांकित तबलीया आला होता. तो लयीत मुरलेल्या भास्करबुवांच्या गाण्यावर बेहद्द खूष झाला. धारवाड आणि आसपासच्या परिसरात बुवांचा कार्यक्रम असेल तेव्हा साथीस जाऊ लागला.

या कायद्याने गाणाऱ्या गायकाबरोबर कायदे वाजवले तर भास्करबुवा बिचकत नसत. दबकत नसत. उलट तबलजीला दाद देत असत. बैठक आणखी फुलवत असत. खुलवत असत.

मात्र साथ बैठकीला मारक अगर आक्रमक नसावी यावर त्यांचा कटाक्ष असे. कुठल्याही मात्रेपासून उठून ते अचूक समेवर येत असत. हळूहळू कामताप्रसाद नथ्थनखाँकडेही जाऊ लागले.

एकदा शिकवणी चालू असताना खाँसाहेब कुणाबरोबर तरी गप्पांत रंगले होते. म्हणून कामताप्रसादने एक तेढा तुकडा ठेवून दिला. तरीही अष्टावधानी नथ्थनखाँनी अचूक चिजेचा मुखडा पकडला. तशी 'मान लिया' म्हणून तबलजीने वाजवता वाजवता कुर्निसात केला.

नथ्थनखाँची बाबलीबाई म्हणून शिष्या होती. तीही आपल्या गुरुबंधूवर खूष असायची. स्वत:ची शिकवणी संपल्यावरही भास्करभैय्याची शिकवणी ऐकत बसायची. त्यांची विलक्षण तयारी ऐकून– हा गुणी शिष्य गुरूचे नाव आसेतु-हिमाचल नेणार अशी खूणगाठ मनी बांधायची

संगीत ही नथ्थनखाँसाहेबांची वृत्ती होती. त्याला पैशाची हाव नव्हती. याचा भास्करबुवांना विलक्षणरीत्या प्रत्यय आला–

भास्करबुवा खाँसाहेबांचे रोज मटण आणायला जायचे. हा गंध लावणारा ब्राह्मणाचा माणूस रोज कुणासाठी मटण नेतो ? असा कलालाला प्रश्न पडायचा. त्या कुतुहलापोटी त्याने विचारले–

"बम्मन दिसतोस. मटण खातोस ?"

"मटण माझ्या गायनगुरूंसाठी नेतो."

ते कळल्यावर कलाल म्हणाला– "मला तुझ्या खाँसाहेबाचे गाणे ऐकवशील? मी बिदागी देईन."

भास्करबुवांनी हे सांगितल्यावर नथ्थनखाँ म्हणाले–

"अरे मग उद्याच त्याला माझ्या बिऱ्हाडी आण. गाणं सुनावतो."

दुसऱ्या दिवशी बुवांबरोबरच कलाल आला. चांगले दोन-तीन तास गाणे झाले.

"ये आपकी बिदागी."

–म्हणून तीन रुपये खांसाहेबांच्या गादीवर ठेवून सलाम करून निघून गेला. भास्करबुवांना विलक्षण संताप आला. मनसोक्त मैफलीची किंमत कलालाने केवळ तीन रुपये केली याचे परमदुःख झाले ! स्वतःची मध्यस्थी आठवून स्वतःच अवमानित झाल्यासारखे वाटले.

तो कलाल गेल्यावर भास्करबुवा खाली मान घालून बसले. बोलेचनात. तशी नथ्थनखाँनीच समजूत काढली–

"अबे, इसमी बुरी बात क्या है ? माकडासमोर रत्न ठेवले तरी तो त्याला काचमण्याचीच किंमत देणार. तो अजाण आहे. पण आपण सुजाण आहोत. तीन रुपयांत आमचा भाजीपाला तर सुटला, आणि त्याहीपेक्षा तीन तास संध्याकाळ रंगीत होऊन गेली. आनंदात गेली. ये भी बहोत खूब है !"

ही हृदयाची दिलदारीही नथ्थनखाँचे गाणे उचलता उचलता भास्करबुवांनी उचलली. बिदागी महत्त्वाची नसून त्यामागची भावना महत्त्वाची आहे, हे समजून चुकले. पुढे जेव्हा जेव्हा मानधनाचा प्रश्न येई तेव्हा तेव्हा नथ्थनखाँची ही भावना खूप काहीसे शिकवून जाई.

म्हैसूर-धारवाडच्या मुक्कामात भास्करबुवांनी कर्नाटक संगीताच्याही मैफली अनेक ऐकल्या. त्यातले थोर आचार्य– वासुदेवाचार्य, मुत्तय्या, भागवत, इत्यादी बुजुर्ग त्यांना मित्रवर्य मानू लागले. आणि मग चिजांची आणि गायकीची देवाण-घेवाण होऊ लागली.

भास्करबुवांच्या गायकीला कर्नाटकी कशिद्याची सुंदर किनार येऊन मिळाली.

वेणूने एकदा शेजारच्या कानडी मालकिणीकडून शिकून घेऊन मेजावर घालायचा कर्नाटकी कशिद्याचा पडदा विणला. तशी भास्करबुवा कौतुकाने म्हणाले–

"वाऽऽ ! महाराष्ट्राने कर्नाटकी गुण एकदम आत्मसात केला म्हणायचा."

"हे स्वारीजवळ तर शिकले."

"ते कसे काय बुवा ?"

"अहो, परवा ते कर्नाटकी गायक आपल्याकडे आले होते. आणि हुबळीला सिद्धारूढ स्वामींकडे घेऊन गेले होते आपल्याला. तेथून आल्यावर एक माणूस कर्नाटकी भजन गुणगुणत होते. म्हणजे गळ्यातून कर्नाटकी कशीदाच काढत होते की."

थक्क होऊन बुवा म्हणाले– "पण आमच्यापेक्षा तुमचा कशीदा सरस."

"अंहं. आपलाच सरस."

आणि त्या दिवशी दोघांनाही समजले की, लटक्या भांडणातील प्रेमरसात उभयतांची सरशी एकाचवेळी होत असते.

धारवाडला कोपतकेरी– तळ्याजवळ लहानशी जागा मिळाली होती. परिसर रम्य होता. कुठल्याही साधनेला सुयोग्य होता. तळ्यावर बलाकमाला विहार करून जायची आणि भोवतालच्या गर्द झाडीच्या ओढीने अनोखे पक्षीही पायांची नक्षी काढून जायचे.

समोर दुर्गादेवीचे छोटेसे मंदिर होते. रियाजाला बसले की, मंदिराचे शिखर दिसायचे. त्यावर नजर रोखून भास्करबुवांची साधना चालायची. त्यांची ती गान-समाधी पाहून वेणूला वाटे–

पाया पक्का झाल्यावर माणूस शिखरावर पोहोचायला वेळ लागत नाही. माझं माणूसही तसंच शिखरावर पोहोचणार आहे. खरं ना दुर्गादेवी ?

देवीच्या माथ्यावरचा कडुलिंब त्याचवेळी सळसळे. आणि वेणूला होकारार्थी उत्तर मिळे.

लाइनबझारच्या पलीकडेच नथ्थनखाँनी मकाण घेतले होते. बाहेर रियाजाची खोली. आत रसोईघर आणि त्याच्या पलीकडे पडदानशीन शय्याघर अशी रचना असे भांड्याकुंड्यास छाटछूट असे. तांब्यापितळेपेक्षा ॲल्युमिनियम आणि मृत्तिकेची भांडी असत. खाटलेही भक्कम विणलेले नसे. साधे बाजलेच असे.

संसार तसा सुटसुटीत असे. बाहेरच्या खोलीत एखादी सतरंजी, एखादी चटई, पानदान हुक्का आणि चारदोन वाद्ये.

नथ्थनखाँना महम्मद आणि अब्दुल्ला ही मुले होती. त्यांत महम्मदला विशेष आवाज नव्हता. आणि अब्दुल्ला आळशी होता. नथ्थनखाँ मात्र दोघांना वेठीला धरून वेळी अवेळी संगीताची संथा देत. इतकेच नव्हे तर एखादी खास घराणेदार चीज शिकवायची असली तर शिकायला आलेल्या भास्करला दूरच्या बाजारात मटण आणायला पिटाळत.

भास्करबुवा सारे ओळखून होते. पण गप्प गप्प होते. रामाच्याच नव्हे तर विद्येच्याही नशिबी वनवास असतो हे अनुभवीत होते. त्यांच्या गाण्यातच नव्हे तर वाचेतही संयम होता. वागण्यात आणि गाण्यात ते कधी भरकटले नव्हते.

विशेषतः गुरुपूजा ही त्यांच्या लेखी देवपूजा होती. त्यामुळेच नथ्थनखाँचे अभक्ष्यभक्षण असो नाहीतर अपेयपान असो, तो सारा सरंजाम ते आस्थापूर्वक गोळा करीत आणि नथ्थनखाँच्या खाण्यापिण्याचा इंतजामही करीत.

एवढेच नव्हे तर आडाचे पाणी भर, केरवारे कर, शेणसडा कर, इत्यादी लेकुरवाळ्या गुरुमाऊलीची सेवाही मनोभावे करीत. गुरुपत्नीही या मुलावर मनापासून जीव करी.

भास्करबुवांनी शिष्याला शिकवू न देणाऱ्या कजाग स्त्रिया पाहिल्या होत्या गुरूची तंद्री लागली तर तंबोरे हिसकावून घेणाऱ्या कडकलक्ष्म्याही पाहिल्या होत्या.

गुरूच्या घशातले गाणे जपण्यापेक्षा त्याच्या खिशातले नाणे जपणाऱ्या महामायाही ऐकल्या होत्या.

पण नथ्थनखांची पत्नी अतिशय प्रेमळ होती. एक चांगल्या घरचा ब्राह्मणाचा माणूस नोकरचाकर होऊन आपल्या घरी राबतो आहे याची तिला जाणीव होती आणि तरीही आपला नवरा त्याला हातचे राखूनच शिकवतो आहे याची विलक्षण खंतही होती.

एक दिवस या तरतम भावाचा कळस झाला. मटण शिल्लक असून मटणाचे निमित्त करून भास्करबुवांना दूरच्या बाजारात धाडले.

" इतना मटण ? कोई मेहेमान आनेवाला है क्या ?" या बिबिसाहेबांच्या प्रश्नावर उत्तर न देता खाँसाहेबांनी तंबोरा काढला आणि दोन्ही मुलांना 'कौन घर आये जनमलियो–' ही दरबारीतील खास चीज तिच्या सर्व खासीयतींसह शिकवायला सुरुवात केली.

भास्करबुवांपासून चीज चोरून ठेवण्याचा नवऱ्याचा डाव बिबिसाहेबांना उमगला. प्रामाणिक भास्करवरच्या मायेने त्या संतापाने वेडया झाल्या. खानापकाना सोडून दरवाजा लावून त्यांनी बिछाना गाठला.

तासाने मुलांची शिकवणी संपली. भास्करही आला. खाँसाहेबांना रसोईघरात सामसूम दिसताच त्यांनी मोठयाने विचारले,

" आजका खानेका इंतजाम क्या है ? मामला तो बिलकुल ठंडा दिख रहा है. "

गुरुमाऊली बिछान्यातूनच फणकारली, " तुम्ही भास्करला शिकवण्यात थंडपणा दाखवाल तवर चूल थंडच राहील. बेटा भास्कर घरात नसताना त्याच्या धाकटया भावंडांना खास शिक्षण देता का, बच्चमजी ?

अहो, पण ते पेलण्याची त्यांची अजिबात लायकी नाही. थोरल्याला आवाज नाही. धाकटा आळशी आहे. मी म्हणते, शिष्य मुलगाच नाही का ? तोही मुलाप्रमाणेच सेवा करतोच आहे ना ? कुणीही हेवा करावा असा त्याचा गळा आहे ना ? तोच तुमचं नाव करील, लक्षात ठेवा. तेव्हा अशा या बाळाला शिकवत नाही तोवर खाना नाही. "

घरातून अशी कानउघडणी आणि तीही जनान्याकडून ! त्यामुळे खाँसाहेब चमकले. स्वतःची चूक उमगली. त्यांनी भास्करला चीज शिकवली आणि मगच भोजनप्रबंध उरकला.

त्यानंतर नथ्थनखाँ पालटले. गुरूला गृहसचीवांचा सल्ला पटला आणि त्यांनी

हातचे न राखता भास्करला तालीम द्यायला सुरुवात केली. त्यांच्याकडून मिळालेल्या चीजेचे तो चीज करील अशी त्यांची खात्री झाली. ते स्वतःच्याच घरी नव्हे, बुवांच्या घरी जाऊन शिकवू लागले.

धारवाडच्या मुक्कामात भास्करबुवांना नथ्थनखाँची आणि त्यांच्या चीजांची जवळीक खूप साधली. गुरूच्या बाबतीत त्यांनी मानपान गुंडाळून ठेवला होता. पण नोकरीच्या बाबतीत स्वाभिमान आड आला.

काही वर्षांनी धारवाडच्या संगीत विभागाचे प्रमुख श्री. बळवंतराव सहस्रबुद्धे हे कालवश झाले. ते वारले तेव्हा बुवा धारवाडात नव्हते. कार्यक्रमांच्या दौऱ्यावर होते.

ते परत आले. कामावर रुजू झाले. पण ते पोचल्या पोचल्या भास्करबुवांची किंमत न ओळखणारा शिस्तप्रिय नवीन आलेला डुढ्ढाचार्य संस्थेच्या नियमावर बोट ठेवून गुरगुरला,

"मि. भास्कर बखले, ही संस्था आहे. केव्हाही यावे केव्हाही जावे अशी आवजाव घर तुम्हारा धर्मशाळा नाही. तिला कायदेकानु आहेत. नीतीनियम आहेत."

हे नवख्या इसमाच्या तोंडचे उद्धट वक्तव्य ऐकून भास्करबुवा चकीत होऊन म्हणाले,

"मी प्रथम गायक आहे. नंतर शिक्षक आहे. म्हणूनच मैफली सांभाळून उरेल तेवढाच वेळ मी येथे येणार व शिकवणार असे पूर्वीच ठरून गेलंय. संचालक सहस्रबुद्धे यांना ही कल्पना आहे आणि त्यांनी या गोष्टीला परवानगीही दिलेली आहे."

"पण आता ती मान्यता काढून घेण्यात येत आहे. सर्व सवलती रद्द करण्यात येत आहेत. कारण आता संचालक सहस्रबुद्धे नाहीत, मी आहे."

"नावाप्रमाणेच अफाट बुद्धी असलेले सहस्रबुद्धे गेले तरी कुठे ?"

तो इसम क्रूरपणे हसून म्हणाला, "ते गेले वर कायमचे. आता कधीच नाही यायचे. सारांश त्यांची बेशिस्त त्यांच्याबरोबर गेली. आता इथे यायचे असले आणि संस्थेत राहायचे असेल तर–"

"ही जरतारी भाषा बंद करा. मला यायचेही नाही आणि कलावंताची कदर न करणाऱ्या या संस्थेत रहायचेही नाही. सहस्रबुद्धे जिथे असणार नाहीत तिथे यापुढे भास्कर बखलेही असणार नाहीत. हा घ्या राजीनामा."

खाडकन राजीनामा खरडून धाडकन बुवा एखाद्या तराण्यासारखे बाहेर पडले.

*

# दहा

भास्कर नोकरीवर लाथ मारून केवळ विद्येसाठी धारवाडात राहिलेला आहे या गोष्टीचा नथ्थनखाँच्यावर खोलवर परिणाम झाला. ते एकदम पालटले. आणि त्यांनी हातचे न राखता भास्करला तालीम द्यायला सुरुवात केली.

फैजमहम्मदखाँनी या चेल्याला स्वरांचा चांदवा उभारायला शिकवले होते. आता त्या छात्राला लयरूपी नाना शिल्पकृतींचे स्तंभ द्यायला शिकवले- राग ज्ञान दाखवण्याच्या भरात स्वतंत्र गाताना भास्कर कंटाळवाणा गाऊ नये म्हणून नथ्थन-खाँनी समज दिली–

" तेरा रियाज घरमे कर. सुननेवालोंको अपने इलमसे खूष कर."

आता ते त्यांच्या मागे तंबोऱ्याला बसू लागले. खाँसाहेबांच्या मागे तंबोऱ्याला बसणे म्हणजे जिवंत मैफलीचे साक्षात शिक्षण घेणेच होते.

श्रोत्यांना स्वरांच्या झुल्यावर कसे झुलवावे– लयीच्या वायूवर कसे डोलवावे, विडीकाडीचे व पानतंबाखूचे भानही कसे राहू न द्यावे– अखेरपर्यंत रंगत वाढवण्या-साठी चढत्याबढतीचे राग कसे निवडावेत– ही अवघड कला या शागीर्दाने हसत हसत आत्मसात केली. आणि–

' शिष्यात् इच्छेत् पराजयम् ।'

या कोटीपर्यंत पोहोचवली. त्यामुळे लवकरच भास्करबुवांचे गाणे म्हणजे पंचपक्वान्नाचे खाणे– मानवकृत लेणे– आणि देवाघरचे देणे. अशी त्रिसुत्री कीर्ती कर्नाटकांत फैलावली.

नथ्थनखाँ स्वतःच्याच घरी नव्हे, तर भास्करच्या घरी जाऊनही तालीम देऊ लागले. स्वतःच्या चिजांचे चीज झालेले पाहू लागले.

ते अगदी पहिल्यांदा तालीम द्यायला घरी येणार हे कळल्यावर आपणही गुरु-शिष्य संवाद ऐकणार या कल्पनेने वेणूही विलक्षण खूष झाली. तिने पहाटे उठून कानेकोपरे झाडले. गुलाबपाणी घालून दारापुढे सडे शिंपले, मग सुरेख रांगोळी काढली. त्यात रंग भरले.

मग या कलाचतुर स्त्रीने एक पुठ्ठ्याचा पंखा कापला. त्यावर मोगरीच्या कळ्या कलात्मक तऱ्हेने शिवून टाकल्या. आणि हा सुगंधी पंखा नथ्थनखाँना वारा घेण्यासाठी सिद्ध केला.

वाड्याच्या मालकीणबाईंनी कुतूहलाने विचारले–

" आज घराचा एवढा थाटमाट ? रांगोळी काय, तोरण काय ? दसरा तर दूर आहे. दिवाळी तर त्याहून दूर."

वेणू हजरजबाबात म्हणाली–

" साधुसंत येती घरा तोची दिवाळी दसरा. आज एका गानतपस्व्याचे पाय पहिल्यांदाच घराला लागणार आहेत."

तोच भास्करबुवांचे जोडे वाजले. मालकीणबाई निघून गेल्या. आणि वेणूही लगबगीने घरात पळाली. पत्नीने सजवलेले घर पाहून भास्करबुवांचे मन आनंदाने मोहरून आले. ते हर्षोत्फुल्ल स्वरात उद्‌गारले–

" वाऽवा ! खाँसाहेबांच्या स्वागतात तूही मनापासून हातभार लावला आहेस वाटतं ?"

" मी आपली अर्धांगी नाही का ? आपली आवड आणि माझी आवड एकच नाही का ? बायकांना यशस्वी संसार करण्यासाठी रोज सप्तपदी चालावी लागते."

भास्करबुवा हसून म्हणाले–

" अस्सं ! एकूण या प्यालाच्या खुशालीसाठी ही व्रतचीज निघाली आहे वाटत ?"

" इश्श ?"

तोच खाँसाहेब आले. सुखासमाधानात शिकवणी सुरू झाली.

एक दिवस खाँसाहेब म्हणाले–

" भास्कर, बहु शिरा अच्छा पकवते. खानेका इन्तजाम होता है । लेकीन पीने का ?"

भास्करबुवा चमकले. गोरेमोरे झाले. गडबडून हलक्या आवाजात म्हणाले–

" हे कानडी ब्राह्मणाचं घर आहे. आणि घरमालक महाकर्मठ आहे. आणि जिभेचाही तिखट आहे. त्याने माझ्या घरात बाटली पाहिली तर तो बाटली बाहेर फेकील. आणि तिच्याबरोबर सामानासकट तो मलाही बाहेर फेकील."

एवढे सांगूनही एक दिवस नथ्थनखाँनी स्वतःच्या लांब कोटातून बाटल्या काढल्या. भास्करला सोडा आणायला लावला. ग्लासही आणायला लावले. आणि कार्यक्रम सुरू केला.

एकीकडे शिकवणे आणि एकीकडे पिणे. शिकवणीची खोली अंगणाला सन्मुख. मद्याचा सरंजाम अगदी शंकरासमोर नंदी असावा तसा अगदी समोर मांडलेला.

तेवढ्यांत– मालकांचे खाकरणे ऐकू आले. गोग्रास घालायला निघालेला तो चौकस गृहस्थ दारावरून जाणार आणि गाणे ऐकून कानच नव्हे तर डोळेही टवकारणार...आत पहाणार...आणि मग आपली खरी कंबक्ती निघणार– गच्छन्ती होणार या कल्पनेने भास्करबुवा विलक्षण घाबरले ! ते झटकन उठले. आणि

पेल्यावर सतरंजी टाकायला निघाले. तशी त्यांना हाताने बाजूला करून ख्याल बंद करून खाँसाहेबांनी धाडकन् भजन सुरू केले–

" घडी घडी भजन राम नाम."

भजनाचे ते ओले रसीले सूर कर्मठ मालकांच्या हृदयाला भिडले. ते दारासमोर आले. ऐकत उभे राहिले. पण त्या भजनाचे पेले कानात रिते होत असल्याने मद्याच्या पेल्यांकडे त्यांचे लक्षच गेले नाही.

संगीत रसात नाहून निघाले की सुज्ञच नव्हे तर अज्ञ श्रोताही कसा देहभान विसरतो याची विलक्षण प्रचीती त्यादिवशी भास्करबुवांना गुरूने आणून दिली.

त्यानंतर कर्मठ मालकही नथ्थनखाँची वारंवार स्तुती करू लागले. संसाराचा मार्ग सुरळीत करणाऱ्या रामनामाने शिकवणीचा मार्गही सुकर केला.

एक दिवस असेच ध्यानीमनी नसता नथ्थनखाँ भास्करबुवांच्या धारवाडच्या दारात ऐन तिन्हीसांजेचे दत्त म्हणून उभे राहिले. घरात मिट्ट अंधार होता. पण बांगड्यांची किणकिण ऐकू येत होती. खाँसाहेबांनी बाहेरूनच विचारले–

" भास्कर है अंदर ?"

आतून वेणू अदबीने म्हणाली–

" समई लावून आलेच हं. पण आपण आत यावं. बसावं. कंदिलाची काच अचानक फुटलीय. म्हणून हे काच आणायला बाजारात गेलेत."

" ठीक है. मी बाहेर पायरीवर बसतो. बाहर बिल्कुल आराम है."

आणि मारवा गुणगुणत खाँसाहेब पायरीवर बसून राहिले. तास झाला– दीड तास झाला– दोन तासांनी भास्करबुवा कुठलीशी ठुंबरी गुणगुणतच आले. दुरूनच पायरीवर कुणीसे बसलेले पाहून म्हणाले–

" कोण आहे ?"

" मैं हूँ नथ्थन. बहू अंधारात एकटीच आहे म्हणून सोबत करतोय. लेकीन काच लानेको तीन घंटे ? बाजार सोडून पार कारखान्यापर्यंत गेलात वाटतं ?"

खाली मान घालून भास्करबुवा आत आले. लगबगीने कंदील लावीत म्हणाले–

" यावं, यावं. आत बसावं. काच खरेदी केव्हाच झाली. बाजारात राहणाऱ्या एका वकिलांनी घरात नेले. तंबोरे काढले. आणि मग कशासाठी बाहेर पडली हेच विसरलो."

नथ्थनखाँ थट्टेने म्हणाले–

" थांब. उद्या तुला दीप रागच शिकवतो. म्हणजे दिवा आणायला बाजार

पहायला नको."

नथ्थनखाँ साहेबांच्या स्वरांची ताकद भास्करबुवांना पुढच्याच आठवड्यात एका विलक्षण घटनेने अनुभवायला मिळाली. गोष्ट धारवाडात नव्हे, म्हैसुरात घडली-

दरबारच्या सेवेसाठी खाँसाहेब म्हैसुरला गेले. जाताना नोकरीचे बंधन नस-लेल्या भास्करलाही बरोबर घेऊन गेले. वेणुताईंना आईकडे पोहोचवून भास्करबुवा मुक्तपणाने गुरुसेवा करायला सिद्ध झाले.

म्हैसुरचे चामराज महाराज परम हरिभक्त होते. कडक सोवळ्यात त्यांची पूजा-अर्चा दोन-दोन तास चालत असे. आणि त्याचवेळी बाहेरच्या सभामंडपात दरबार गायक नथ्थनखाँसाहेब यांचे गायन चालत असे.

त्या दिवशी नथ्थनखाँसाहेब असेच मंदिरापुढच्या सभामंडपात गात होते. ललत रागाची नोम्‌तोम् संपली. ख्याल संपला. तराणा संपला. आणि त्यानंतर उजव्या-हाताला बसलेल्या कामताप्रसादाला खाँसाहेब म्हणाले–

" भजनी ठेका लाव. एक हरीभजन सुनावतो."

कामताप्रसादनी 'जी' म्हणून तबल्यावर थाप मारली आणि लयीचा अद-मास घेतला. मागे तंबोऱ्यावर बसलेले भास्करबुवाही कान टवकारून ऐकू लागले. करुण रसात थबथबलेले– आर्ततेने वेडेपिसे झालेले– भक्तीची वल्कले नेसलेले भजन सुरू झाले.

" गोपाला, मेरी करुणा क्यूं न आवे ?"

ती विराणी ऐकताना भावनाप्रधान भास्करबुवांचे डोळेही ओलावले. कामता प्रसादही आकुळ व्याकुळ झाले ..

ही कुणा व्रजबालेची विनवणी होती–

कुणा राधेची बतावणी होती–

की कुणा मीरेची तिच्या प्रभूसाठी केलेली आर्त आळवणी होती ? तो अनुभव अत्यंत दिव्य होता...

ते आर्त सूर सूर नव्हते तर आसवांचे पूर होते. शब्दरूप घेऊन खाँसाहेबांच्या कंठातून ओघळत होते. श्रोत्यांना वृंदावनात घेऊन जात होते...

अशा वृंदावनात भास्करबुवा हरवले असतानाच एकदम पितांबरधारी महाराज धावत धावत सभामंडपात आले. आणि सोवळ्यानेच त्या मुसलमान गायकाला मिठी मारून म्हणाले–

" अरे महान् गायक तासन् तास पूजा अर्चा करूनही जो गोपाळ आम्हाला शिसवीच्या देव्हाऱ्यातल्या सोन्याच्या मूर्तीत दिसला नाही–भेटला नाही, तो आज तुझ्या भजनात प्रकटला...नसा नसांना भेटला..."

आणि पुढे न बोलवून त्यांनी खाँसाहेबांना दृढ आलिंगन दिले. राम आणि रहीम यांचा संगम झाला. नाव काही असो. सर्व मानव एकाच ईश्वराची लेकरे आहेत. आणि ' विष्णुमय जग वैष्णवाचा धर्म. ' याचा सुखद प्रत्यय सर्वांना आला.

गाणारे आणि ऐकणारे साऱ्यांच्याच नयनाची गंगा या गोपाळाच्या पदप्रक्षालनासाठी अवतीर्ण झाली.

बुवांना वाटले– नादब्रह्म आणि परब्रह्म सहोदर असावेत म्हणूनच दिव्य आनंद निर्मिती हाच उभयतांचा हेतू असतो.

त्या दिवसभर बुवांनी तंबोरा काढला नाही. करुणेत भिजलेलं त्यांचं मन स्वरसमाधीत निमग्न राहिलं.

भास्करबुवांचे नथ्थनखाँच्या फक्त गायकीकडेच लक्ष नव्हते, तर त्यांच्या कुटुंबाकडेही लक्ष होते. अगदी वडील मुलाने कुटुंबाकडे जिव्हाळ्याने पहावे तेवढ्या जिव्हाळ्याने ते त्या कुटुंबाशी समरस झाले.

तुटक गायकी त्यांच्या गळ्यात नव्हती तशीच तुटक वागणूक त्यांच्या रक्तात नव्हती. प्रत्येक स्वराचे एकमेकांशी नाते ठेवून ते राग मांडीत तसेच प्रत्येक व्यक्तीशी स्वतःचे नाते जोडून ते त्यावर प्रेम करीत.

नथ्थनखाँना एकंदर पाच अपत्ये झाली. थोरला महम्मद बुवांपेक्षा दोन वर्षांनी लहान तर त्याच्या पाठचा अब्दुल्ला चार वर्षांनी लहान. या दोघांनाही घराणेदार संगीताची ओढ होती. आणि कमावलेल्या आवाजाची जोड होती. महम्मद गळ्याच्या प्रतिकुलतेमुळे प्रयत्नवादी, तर अब्दुल्ला आवाजाच्या वरदानामुळे काहीसा आळसावलेला. तरीही भास्करबुवा उभयतांना सांभाळून घेत.

अब्दुल्लाच्या पाठीवरच्या तीन मुलांपैकी विलायतखाँ मात्र संग्राहक वृत्तीने व मेहनतीने नावारूपास आला.

एकोणीसशे साली नथ्थनखाँची प्रकृती एकाएकी ढासळली. त्यांना स्वतःचा भरवसा वाटेना. पण संगीताचा वसा भास्करला दिला होता. आणि त्यानेही एवढीही सांडलवंड न होऊ देता तो जसाच्या तसा उचलला होता. यातच गुरू समाधान मानत होता.

एका ज्योतीने दुसरी ज्योत प्रज्वलित केल्यावर दुसरी क्षीण झाली तरी तिची इतिकर्तव्यता संपलेली असते. जीवितकार्य पार पडलेले असते.

एक दिवस जास्त झाले. तशी खाँसाहेबांनी भास्करला व मुलांना जवळ बोलावले. भास्करबुवा पाय चेपीत पायाशी– शिष्याच्या स्थानाशी बसले. तर मुले पित्याच्या डाव्या उजव्या अंगाला बसली. एकीकडे खोकत खोकत, धाप संभाळीत खोल गेलेल्या आवाजात नथ्थनखाँ म्हणाले–

" बच्चे लोक, आता आमची अल्लाकडे निघायची वेळ जवळ आली आहे."

मुलांनी हुंदका दिला. धाकटा विलायत ओरडला–

" नही, नही अब्बाजान, मी तुम्हाला जाऊ देणार नाही."

तशी त्याचा गालगुच्चा घेऊन त्याच्या पाठीवरून हात फिरवून ते म्हणाले–

" रो मत. तुमच्यावर खुदाची बहोत मर्जी है. माझ्याजागी आता माझा बेटा भास्कर आहे. तोच तुम्हाला शिकवीलही आणि संभाळलेही."

आसू अनावर होऊन भास्करबुवांनी खाँसाहेबांच्या चरणाला घट्ट विळखा घातला. खाँसाहेब मुलांच्या मदतीने उठले. भास्करचे हात हाती घेऊन म्हणाले–

" बेटा भास्कर, माझे चरण नाही धरायचे. माझ्या गायकीचे चरण धरायचे. आमच्या घराण्याची विद्या तू खूप लुटली आहेस. आता आणखी अवघड राग–कूट गायकी घेण्यासाठी जयपूर घराण्याच्या अल्लादियानखाँच्या सहवासात जाऊन रहा."

बुवा गदगदून म्हणाले–

" मला आपलाच सहवास अजून खूप खूप हवा आहे. अजून बरेच देणे घेणे बाकी आहे."

खाँसाहेब शिष्याची हनुवटी वर करून म्हणाले–

" अरे पण पैगंबरांची बाकी चुकती करण्यासाठी ते मला खुणावू लागले आहेत त्याला काय करणार ? आत्ता चेहरा रडका केलास तर केलास पण तुझा चेहरा नेहमीसारखा हसरा राहिला पाहिजे. लोकांना आनंदच देत राहिला पाहिजे."

भास्करबुवा समजले की गायकाचा आर्त हुंदका मारव्याचा रिषभ बनला पाहिजे. आणि त्याचे आसू जोगियाचे घर बनून डोळ्यातून नव्हे तर गळ्यातून ओघळले पाहिजेत. नीलकंठ शिवाने विष प्राशन केल्यानंतर तांडव नृत्य केले होतेच की.

प्रत्येक कलावंताला यातनांचे विष प्राशून नटराज व्हावेच लागते...

गुरूच्या जात्या जिवाला बरे वाटावे म्हणून त्याने बळेच चेहरा हसरा केला. तशी खूष होऊन नथ्थनखाँ म्हणाले–

" तू तो बहोत बडा लडका आहेस. तुला सदैव यश मिळो. खुदा सदैव तुझ्या पाठीशी राहील. तू विद्येला जप. आणि तुझ्या या धाकटया भावंडांना जप."

" जपेन. आमरण जपेन."

असेच आणखी दोन दिवस गेले. नथ्थनखाँसाहेब मृत्युशय्येवर आहेत ही बातमी आगीसारखी संगीताच्या जगात पसरली. आणि बडी बडी मंडळी त्यांच्या भेटीस येऊ लागली.

त्यांच्या भेटीस बाहेरगावाहून जुने जिवाचे दोस्त हैदरबक्षखाँ आले. ते विद्वान सारंगीवाले आहेत, आणि खाँसाहेब अब्दुलकरीमखाँ यांचे नातेवाईक आहेत हे कळताच भास्करबुवांनीच त्यांचे पुढे होऊन प्रेमाने स्वागत केले. त्यांना आसन

दिले. चहापाणी केले.

आपला तो जुना जानी दोस्त पाहिल्यावर नथ्थनखाँना एकदम अवसान आले. उठून बसत ते ओरडले–

"देखो भास्कर, रामको मिलनेको भरत आया है."

आणि मग दोघांची गळाभेट झाली. मग प्रकृतीच्या गोष्टी सुरू झाल्या. तशी त्या थांबवून नथ्थनखाँ म्हणाले–

"शी ऽ शी ऽ ! दोन संगीतकारांनी भेटायचे आणि खोकल्या पडशावर बोलायचे ? ये सच नही. भास्कर, तानपुरा काढ."

"आपण तूर्त शरपंजरी आहात. बरे झाल्यावर ऐकवा."

"नही, ये सच नही. कुठला श्वास शेवटचा श्वास ठरेल त्याचा नेम नाही."

"म्हणूनच गायचं नाही."

"चुकताहात हैदरबक्ष. म्हणूनच गाणार आहे. ऐकवणार आहे.

सुन ले– अब नथ्थन जा रहा है. ये बात फिर नही सुननेमे आयेगी..."

आणि त्यांनी क्षीण पण मधुर आवाजात–

"जावो जावो काहे ठाडे डारे गरे बैंय्या !"

ही ठुंबरी मोठ्या ढंगात सुरू केली. भास्करबुवांनी धावत जाऊन डग्ग्याचा ठेका धरला. दोस्ताने पेटीचा सूर दिला. मग काय विचारता– मुरक्या– खटके– हरकती– नाजूक साजूक जागांचा वळीवच बरसून गेला. सर्वांना गार करून गेला.

दारात चूपचाप उभ्या असलेल्या महम्मद, अब्दुल्ला, विलायत, नन्हे आदी चिरंजिवांना अब्बाजानांचे हे आर्तगीत ऐकून हुंदकाच आला !

भास्करबुवांनाही रडे आवरेना. त्या गानगंगेला भेटायला हैदरखाँच्या नेत्रांतील यमुनाही धावून आली. तशी गाता गाता नथ्थनखाँसाहेब म्हणाले–

"अबे, सुन. रोता है क्यूं ? नथ्थन जायेगा. लेकीन ये रंग तो तुम्हारे पास रहेगा ?"

आणि पुन्हा गाण्यात नथ्थनखाँ रंगून गेले !

पुढे चार दिवसांनीच हा सूर अनंतात कायमचा विलीन झाला !!

बुवा मग आठवणीने नथ्थनखाँसाहेबांची पुण्यतिथी स्वत:च्या घरात करू लागले. आणि गुरूला श्रद्धांजली वाहू लागले. आग्रेवाल्या बुजुर्गांची गाणी घरात करू लागले.

गुरूची प्रतिमा मनात साठवलेली, डोळ्यांनी आठवलेली, पण कुठल्याच छायाचित्रात टिपलेली नव्हती. पण तीव्र इच्छेला फळ येते म्हणतात. तसेच झाले. एक दिवस चित्रकार शिष्य मणेरीकरने नथ्थनखाँचे कृष्णधवल रंगात स्वत: काढलेले रेखाचित्र बुवांना अर्पण केले.

ते तेजस्वी डोळे. तो करारी आविर्भाव– ते कलासक्त व्यक्तिमत्त्व अहाहा ! धारवाडच्या घरी पाहून, लक्षात ठेवून हुबेहूब चितारलेले ते चित्र पाहून बुवा भारावले. त्या फोटोला त्यांच्या नेत्रजलाने स्नान घातले.

ते गद्‌गदून म्हणाले–

" मणेरीकर, मी नथ्थनखाँच्या चिजांचा मुखडा दाखवू शकतो. पण तुम्ही समक्ष खाँसाहेबांचाच मुखडा कागदावर चितारलात. धन्य तुमची, धन्य तुमच्या कलेची. "

त्या दिवशी ते चित्र बुवांच्या हृदयावरच नव्हे, तर घराच्या भिंतीवरही चढले !

*

## अकरा

नथ्थनखाँच्या विरहाचा उरातला बाण भास्करबुवांच्या हृदयात जन्मभर रुतून राहिला. तो डाव्या हाताने दाबून धरून बुवा उजव्या हाताने तंबोरा छेडू लागले की नथ्थनखाँच्या अनेक नखरेल चिजा बुवांच्या कंठाशी लगबगीने येऊन उभ्या रहात, त्यांच्या खास डौलात श्रोत्यांकडे जाण्याची घाई करीत.

नथ्थनखाँ वारल्यावर बुवांचे मन कर्नाटकात लागेना. त्यांनी म्हैसूर दरबारचा दसरा साजरा केला. आणि बिऱ्हाड मुंबईला हलवले. पण निघण्यापूर्वी या गुरुनिष्ठ शिष्याने नथ्थनखाँच्या पत्नीला नवे बिऱ्हाड मांडून दिले.

महाराष्ट्रीय कुटुंबासारखी तांब्यापितळेची भांडी, ताटे-वाटया, सुसज्ज स्वयंपाकघर, पलंगासकट शेजघर इ. पाहून गुरुपत्नी भांबावली. मुसलमानी पद्धतीचे छाटछुटीचे भांडेकुंडे इथे नव्हते. हलके– फुलकेही काही नव्हते. नथ्थनखाँच्या गाण्याइतकेच सारे वजनदार होते.

हे नवे नेटके घर आपलेच आहे, यावर गुरुमाऊलीचा विश्वासच बसेना. पण बुवांबरोबर आलेल्या वेणूने हळदी-कुंकू वाहून चुलीची पूजा करुन सांगितले,

" माँजी, हे सारं आपलंच आहे. आपल्या थोरल्या लेकानं मानलेल्या आईसाठी हे सारं केलं आहे. धाकटया तिन्ही मुलांसह आपण इथंच राहायचं आहे. हे अधून- मधून येत राहतील. खबर घेत जातील. महम्मदभाई आमच्या बरोबरच येतील. अब्दुल्लाभाई येऊन जाऊन राहतील. माझी चूल नथ्थनमामंजींनी पेटवली होती. म्हणून यांनी हे केलं. "

त्या विधवेचे डोळे ही कृतज्ञता पाहून भरून आले. तिने त्या लाडक्या लेकाला— भास्करला दुवा दिला.

भास्करबुवा गिरगावच्या गोरेगावकर चाळ नं. पाच मध्ये तिसऱ्या मजल्यावर राहू लागले, पण गिरगावच्या तत्कालीन सनातनी वातावरणाला हे वेळीअवेळी उगवणाऱ्या आणि जातपात न मानणाऱ्या गायकाचे बिऱ्हाड धक्के देत गेले. पण त्या धक्क्यांकडे लक्ष देण्याचा बुवांचा स्वभावच नव्हता.

हत्तीने आपल्या मस्तीत चालायचे असते. भुंकणाऱ्या कुत्र्यांकडे लक्ष द्यायचे नसते. पण त्यांना बाहेरचे धक्के जाणवले नाहीत तरी कौटुंबिक धक्के जाणवावेत येवढे मोठे बसत गेले ! मनाच्या आणि तंबोऱ्याच्या तारा थरथराव्यात येवढे मोठे धक्के होते ते !

त्यांना संगीत शिक्षणाच्या वाटचालीत पहिला वहिला आधार झालेले— वडील भगिनी तान्हुताई यांचे यजमान दक्षिणादास पुराणिक अकाली मृत्यू पावले ! हातावरचे पोट असलेले पुराणिक वारल्याने अनाथ झालेली तान्हुताई आणि तिचा मुलगा गणपती यांना घेऊन भास्करबुवा बडोद्याहून परतले.

जवळ असलेल्या मातोश्रींना— जानकीबाईंना लेकीच्या वैधव्याचा घाव जिव्हारी लागून की काय— जावयाच्या पाठोपाठ थोड्याच दिवसांत त्याही कालवश झाल्या. अशा रीतीने घरगुतीही आसरे गेल्याने भास्करबुवा सैरभैर झाले !

अशावेळी त्या थोर गायकाला— थोर अंतःकरणाच्या त्याच्या चाहत्यांनी पुन्हा श्रोत्यांपुढे रूजू केले.

विद्वान सर भालचंद्र भाटवडेकर यांनी तर एक इंग्रजी पत्रकच काढले—

८ फेब्रुवारी १९००

रा. भास्कर रघुनाथ बखले यांस मी अनेक वर्षे ओळखतो. ते भारतीय संगीताचे आचार्य आहेत. त्यांची गाणी बडोदे, पालनपूर, इंदूर वगैरे दरबारात झाली आहेत. तेथे त्यांच्या गाण्याचे कौतुक झाले असून त्यांस राजेराजवाड्यांकडून मान्यताही प्राप्त झाली आहे. नुकतेच भास्कररावांचे गाणे मुंबईच्या गव्हर्नर साहेबांच्या सल्लागार समितीचे सभासद नामदार सर चार्लस् ऑलिव्हियंट, के. सी. आय्. ई., ह्यांनी ऐकले आणि गेल्याच सोमवारी हिज् एक्सलन्सी लॉर्ड व लेडी सॅण्डर्ट ह्यांनी भास्करबुवांचे गाणे ऐकून आपली अतिशय तारीफ बोलून दाखवली, हैद्राबाद व म्हैसूर येथे भास्करबुवांना असेच यश मिळावे अशी माझी इच्छा आहे. त्या भागात संगीताभिरूची बरीच चांगल्या दर्जाची आहे.

— सर भालचंद्र कृष्ण.

बुवांच्या गाण्यात जशी शिस्त होती तशीच त्यांच्याबद्दलच्या या प्रशस्तीपत्रकातही होती. त्या पत्रकाचा सगळीकडे बोलबाला झाला. परिणामी एकोणी-

सशे साली झालेल्या म्हैसूर युवराजांच्या लग्नात वासुदेवाचार्य मुनल्या भागवत यांच्याबरोबर बुवांनाही निमंत्रण आले. त्यांनी अलौकिक मैफल जमवून गुरूची शान वाढवली आणि स्वत:च्या कलेची मान ताठ ठेवली.

पाठचे बंधू मानलेले नथ्थनखांचे चिरंजीव महम्मद आणि अब्दुल्ला हे तंबोऱ्याच्या साथीस घेतले गेले. पुढे मुंबईसही ते दोघे मागे बसत आणि रंग भरीत. गुरूचे आणि गुरुबंधूंचे पाठबळ कधीच वाया जात नसते.

मुंबईच्या नव्या बिऱ्हाडात आता बुवांना बरेच शिष्य मिळाले. परशुरामपंत बर्वे वारल्याने त्यांच्या शिष्या हिराबाई पेडणेकर येऊ लागल्या. नाना हार्डिकर, नाना ठोसर व नाना गाडगीळ या तीन नानांनाही नन्नाचा पाढा न लावता नाना चिजा बुवांनी शिकवल्या.

गणपत पुरोहित व पोस्टातले बळवंत बर्वे आणि शंकर गुरव यांनीही बुवांची जवळिक साधली.

नथ्थनखांपुत्र महम्मद खाँ तर बुवांच्या जवळच काही महिने रहात. घरात तान्हुताई सोवळी झालेली ! तिच्या सोवळ्या-ओवळ्याआड यायला नको, आणि तिला दुखवायला नको म्हणून महम्मद बाहेरच्या खोलीत जेवायला बसे आणि या गुरुबंधूचे उष्टे खरकटे स्वत: भास्कर बुवांकडून काढले जाई. इतकेच नव्हे तर बहिणीच्या धाकाने ताट–वाटीही घासली जाई.

अशा वेळी महम्मद लज्जित झाला, तर बुवा म्हणत,

" भाई महम्मद, शरमिंदा होनेके बातही नही । मला ज्या पितृतुल्य नथ्थन-खाँनी अन्नाला लावले त्यांच्या मुलाला मी अन्न दिलं, तर बिघडलं कुठं ? हे माझं प्रेमाचं कर्तव्य झालं."

बुवा गुरूशी त्यांच्या मृत्यूनंतरही कृतज्ञ राहिले म्हणून गुरुदत्त कलाही त्यांच्याशी कृतज्ञ राहिली. तरी पण महम्मदखाँना स्वत:चे असे स्थान निर्माण व्हावे म्हणून बुवा त्यांच्या मैफली घडवून आणू लागले.

श्रोते यावेत म्हणून प्रथम आपण गाऊ लागले आणि मग महम्मदखाँना बसवू लागले. इतकेच नव्हे तर धारवाडच्या घराकडेही त्यांनी लक्ष पुरवले. हुबळी–धार-वाडकडे गेले, आणि गाऊन आले, की बिदागीचे पैसे ते नथ्थनखाँच्या कुटुंबाला देत आणि अखंड बारमास गुरुपौर्णिमा साजरी करीत.

किर्लोस्कर कंपनीतले गायक नट नानासाहेब जोगळेकर शिकवा म्हणून मागे लागले, तशी भास्करबुवांनी त्याला अब्दुल्लाचा गंडा बांधायला लावला. आणि गुरुघराण्याच्या अधिकारावर आक्रमण करण्याचे सफाईने टाळले.

तरीही नानासाहेब जोगळेकर व कृष्णराव गोरे नाटचसंगीताच्या ओढीने बुवांकडे अधूनमधून येतच राहिले. बैठकीचे व शिकवण्याचे हे असे लागी लागते–न

लागते तोच आणखी एक महान् कौटुंबिक आपत्ती ओढावली ! संकटे एकटी दुकटी येत नसतात– मुग्यांच्या रांगेप्रमाणे कधी कधी पाठोपाठ येत असतात...

वडीलबंधू त्र्यंबकराव यांना हाडचा–व्रण होऊन मुंबईस औषधोपचारासाठी आणले गेले. त्र्यंबकदादांनी बुवांना वेळोवेळी मानसिक व भावनिक आधार दिल्याचे विसरण्याइतके बुवा कृतघ्न नव्हते. 'गरज सरो वैद्य मरो' असे म्हणणारेही नव्हते.

बुवांनी अमाप पैसा ओतला आणि अमाप शुश्रुषाही केली. पण काळाने तड-जोड केली नाही ! त्यानं चार–पाच महिन्यांतच बंधूंना ओढून नेले !

गोरेगावकर चाळीवरून बुवांचे मनच उडाले. आणि ते पेपर मिल लेन-मधल्या स्वतंत्र बंगलीत राहायला गेले. बंगली स्वतंत्र असल्याने शेजाऱ्यांचा उपसर्ग नव्हता. मुसलमान बिसलमान आले तरी टीका–टिपणी व्हायचा संभव नव्हता. त्यातून शिकवणीसाठी आंग्रेवाडीत निराळी खोलीही घेतली होती.

या बिऱ्हाडात एक फारच मोठे पाहुणे आपण होऊन भास्करबुवांकडे रहा-वयास आले आणि बुवांचे मन आनंदाने मोहरून गेले. पंढरीचा राजा पाहुणेराला आल्यावर भक्ताला जो आनंद होईल, तोच आनंद एक गायकांचा राणा अलादिया खाँ आल्यावर भास्करबुवांना झाला.

कलकत्त्याला एकोणीसशे तीन साली श्रीमान रसिक लाला दुनीचंद यांचेकडे वास्तव्य असलेले अलादिया खाँसाहेब मुंबईला आले, ते थेट बुवांकडेच उतरले. तसा परिचय नवा नव्हता. मुरलेलाच होता. परस्परांच्या स्वभावाची आणि गाय-कीची पुरी ओळख पूर्वी बडोद्यातच झालेली होती.

कारण फैजमहम्मद खाँचे दोस्त अलादिया खाँ हे बुवांचे शिक्षण चालू असतानाच बडोद्यातच वास्तव्य करून होते. पण संस्थांनी राजकारण पचवता न आल्याने दरबार गायक न होताच परतले होते. फैजमहम्मद थकले होते. पण त्यांनी आपल्या पाठोपाठ जामात फैयाज खाँ यांची वर्णी आगाऊच लावून ठेवली होती.

तरी पण राजकारणाशी संबंध न ठेवता केवळ अनन्य भावाने कलाकारांचा शोध व वेध घेणाऱ्या भास्करबुवांनी अल्लादियांची अवघड कूट गायकी बडोद्यात दीड दोन वर्षे न चुकता ऐकली होती. नुसती ऐकलीच नव्हे तर पचवलीही होती. स्वतःला मित्रांच्या कोंडाळ्यात 'अवघडदास' ही पदवी प्राप्त करून घेईपर्यंत पचवली होती.

बुवांनी आणि पत्नी वेणूताई यांनी या बड्या मेहमानाचे आगतस्वागत अगदी राजेशाही थाटात केले. स्वयंपाक करताना वेणूताई स्वतःचे सारे कौशल्य पणाला लावीत. तर सेवा करताना भास्करबुवा सारे आतिथ्य पणाला लावीत. या गान श्रीमंतांची थोडीही बेअदबी होऊ नये म्हणून बुवांनी त्यांच्यावर गुलाल–बुक्क्या-

गत पैसा उधळला.

नशानेच अल्लादिया खाँ आजारी पडले. तेव्हा वसईच्या एका वैद्यबुवांच्या औषधाने खाँसाहेबांना बरे वाटले. त्याची परतफेड म्हणून खाँसाहेब वसईला जाऊन त्या जीवनदात्याकडे विनामूल्य गायले.

पण मनोभावे दोन महिने निष्काम शुश्रूषा करणाऱ्या भास्करबुवांचे कसे उत-राई व्हावे, हे अल्लादियांना कळेना. प्रकृती सुधारून मुक्काम हलवला. त्या दिवशी खाँसाहेबांनी आश्चर्याने विचारले,

“भास्कर, या अल्लादियाकडून पुष्कळांनी चोरून मारून– खोटी [illegible] करून ही विद्या उपटली आहे. पण तू अजीब लडका दिसतोस ! खरा कर्तव्य–कठोर दिसतोस. मी दोन महिने तुझ्या मकानी राहिलो, तरी तू गाण्याबद्दल– शिकवण्या-बद्दल अगदी एखाद्या चिजेबद्दलही गोष्ट काढली नाहीस ! आश्चर्य आहे !”

भास्करबुवांनी उत्तर दिले,

“आपण माझे सन्मान्य पाहुणे होतात. घरच्या पाहुण्यांची फक्त सेवा करा-यची असते. सरबराई करायची असते. त्याच्याकडून कसलीच अपेक्षा ठेवायची नसते. माझ्यागत सर्वार्थाने छोट्या गायकाचा पाहुणचार एका बड्या गायकाने स्वीकारला– जेवण्याबरोबर वागण्याच्याही चुका पोटात घातल्या, हा आपलाच मोठेपणा.”

खाँसाहेब दिलखुलास हसून म्हणाले,

“अरे, वागण्या बोलण्याच्या चुका तुमच्यासारखा सात्त्विक बम्मन करणार नाही. आम्ही मात्र तारुण्यात केल्या.”

“खाँसाहेब,”

“चूप. बोलू नकोस. आमचे पिताजी लवकर पैगंबरवासी झाले. तशी आमच्या चुलत्यांनीच आम्हाला वाढवले. गाण्याला आणि वागण्यालाही वळण लावले.

काय सांगावं, तरीही एक दिवस वाहवलो. कसल्यातरी नादात मध्यरात्री-पर्यंत बाहेर राहिलो. गपचूप घरी आलो. पण गुहेवर सिंहाचा पहारा असेल्याची कल्पना नव्हती !

चुलते जागे होते. आमची वाटच पहात होते. तय्यारात्री त्यांनी चाबूक घेऊन आमची चामडी लोळवली. पण हूं की चूं न करता आम्ही मार सोसला. कारण चूक आमची होती. गुन्हा आमचा होता. पण ती शिक्षा आयुष्यभर लक्षात राहिली. आमचे गाणे आणि वागणे सुधारले.”

“माझ्या बाबतीत भाऊराव कोल्हटकरांनी केलेला अपमान इष्टापत्ती ठरली. त्यांनीच काहीतरी नवीन करून दाखवण्याची ईर्षा मनात जागी केली. अप-काराच्या उन्हातून कधीकधी दुपारीच फुलं फुलतात ती अशी.

नथ्थनखाँना शुक्राचार्य म्हटले तर आपल्याला बृहस्पती म्हणायला हवे. नथ्थनखाँ म्हणत,

" भैया अल्लादिया खाँ का गला जहाँ जाता है, वहाँ हमारी नजर भी नहीं जा सकती। "

" अहाहा ! कितनी इन्साफी। "

असे म्हणत खाँसाहेब पान खात बसले तोच– खाँसाहेबांनी खिडकीतून सहज पाहिले, आणि उद्गारले,

" बेटा भास्करराव, मियांजान आ रहा है, शायद तुम्हें मिलनेको." एवढ्यात कलावंत मियांजान पैलवानाप्रमाणे डुलत खिडकीखाली पोचला व पुढच्या पावलांनी जाऊ लागला. खाँसाहेबांनी त्याला पुकारले,

" क्यू मियां, उपर तो देखो। झुकते ही चले जा रहे हो।" मियांजाननी चपापून वर पाहिले आणि वरमल्याप्रमाणे हसून हजरजबाब दिला,

" हुजूर यह झुकने कीही जगह है !"

अल्लादियाँ खाँसारखे गानवेदात सिद्धी मिळवलेले योगिराज घराला पाय लावून गेले, त्याच क्षणी आपल्या घराचे तीर्थक्षेत्र होऊन गेले, असे भास्करबुवांना वाटले.

निरोप घेताना अल्लादिया खाँनी शिकवण्याची इच्छा अप्रत्यक्षपणे बोलून दाखवली तशी भास्करबुवा विलक्षण आनंदित झाले. नथ्थनखाँसाहेबांनी अखेरच्या दिवसांत याच जयपुरी गायकाच्या दिशेने बोट दाखवून पुढे जायला सांगितलेले त्यांना आठवले.

भास्करबुवा स्वतःला गुरूचा आशिर्वाद आहे असे म्हणवीत त्याचप्रमाणे दत्तगुरूंचाही आशीर्वाद आहे असे म्हणवीत. त्याला कारणही तसेच घडले.

एकदा धारवाडहून म्हैसूरला जाताना हवेतील गारव्यामुळे आवाज बसला. बुवा धास्तावले. ह्या अटीतटीच्या मैफलीचा बेरंग होणार म्हणून निराश झाले. मैफलीला निघण्यापूर्वी त्यांनी स्वतःला एका खोलीत कोंडून घेतले. समोर दत्ताची तसबीर ठेवली आणि मौन धरून नामसाधना केली.

साश्रू नयनांनी साष्टांग प्रणिपात करून–

" सांभाळून न्या "

अशी अर्चना करून ते मैफलीत गेले. गाता गाता आवाज सुटला. दरबारातली प्रतिष्ठेची मैफल जमली. घरी परतल्यावर वेणूताईंनी भीत भीत विचारले,

" गाणे कसे झाले ? सर्दीने कितपत त्रास दिला ?"

बुवा गद्गदून म्हणाले,

" गुरुमहाराजांनीच भक्ताला तारले."

तेव्हापासून गुरुवारला बखल्यांच्या घरात नवा अर्थ आला. आणि दत्तजयंतीही न चुकता पार पडू लागली.

त्यानंतर हैद्राबाद संस्थानातील माणिकप्रभूंच्या मैफलीत माणिकप्रभूंनी संगीत सम्राट म्हणून गौरवले. या सर्व यशस्वी मैफलीत तीव्र इच्छाशक्ती, शुद्ध आत्मिक बल आणि अचल श्रद्धा यांचा वाटा फार मोठा...

*

# बारा

एक दिवस बुवा कौतुकाने वेणूताईंना सांगू लागले–

" अगं आज अल्लादिया खाँकडे गेलो, आणि तिथे एक शादी ठरलेली पाहिली. दहेज म्हणून– हुंडा म्हणून काय दिले असेल ?"

" घरदार ?"

" अंहंऽ !"

" सोने नाणे ?"

" अंऽहं !"

" मग हजार रुपये ?

" हजारच दिले, पण रुपये नव्हे– हजार चिजांचे अस्ताई– अंतरे दिले. अगं त्यांच्यात श्रीमंती किती हजार रुपये बाळगून आहात, त्यावरून मोजत नाहीत– तर या गायक घराण्याकडे किती हजार ध्रुपदे व चिजा आहेत त्यावरून मोजतात."

" अगंबाई ! विलक्षणच म्हणायचं सारं !"

" अगं ही कलेची श्रीमंती बरं. कलेचं खानदान बरं."

" नाहीतर मेलं आपल्याकडे ! गायक-वादकांना अजूनही तुच्छ लेखतात, व्यसनी– चैनी लेखतात. हलक्या प्रतीचं मानतात. भले त्यांच्या पदरी किती का चिजा असेनात !"

" काळ पालटेल तसा हा समजही पालटेल. हळूहळू महाराष्ट्रालाही कलावंतांची किंमत कळेल. आणि तोच सर्वांत मोठा रसिक प्रांत ठरेल."

" स्वारीच्या तोंडात साखर पडो."

" त्या साखरेचा चहा द्या आधी. खाँसाहेबांनी शिष्याला बोलावलंय लगेच."

प्रत्येक फुलात वेगवेगळे सौंदर्य असते. कुणाचा आकार सुंदर; उदाहरणार्थ गोकर्ण किंवा बदकाचे फूल

कुणाचा प्रकार सुंदर, उदाहरणार्थ कृष्णकमळ.

कुणाचा रंग सुंदर, उदाहरणार्थ दिवसमावळीचं फूल, कमळ.

कुणाचा गंध मनोहर, उ. जाई, जुई, मोगरा.

कुणाचे सारेच देखणे, उदाहरणार्थ गुलाब.

तरी आपापल्या परीने प्रत्येक कुसुमाला स्वतंत्र व्यक्तिमत्त्व असते. वैशिष्ट्य असते. सौंदर्यही असते.

एखादा फूलवेडा स्वतःच्या पुष्पदाणीत आकर्षक रचना करून या सर्व फुलांना एकत्र आणू शकतो. भास्करबुवांनीही स्वतःच्या कंठात फैजमहंमद, नथ्थनखाँ आणि अल्लादिया खाँ या तीनही गुरूंना आणून बसवले. पहिल्याची आलापी– दुसऱ्याची लयकारी आणि तिसऱ्याची कूटता यांचे मधुर रसायन घडवून स्वतःची एक वेगळी गायकी तयार केली. दत्ताप्रमाणे या दत्तभक्ताने अनेक गुरू केले. आणि नादब्रह्माला जिंकले.

दिल्ली, आग्रा, बनारस, जयपूर ही संगीताची केंद्रे होती. भास्करबुवांनी चिजांबरोबरच ठुंबऱ्या– भजने आणि पदे याही कंठगत केल्या आणि आपली गायकी रोचक, संग्राहक आणि लवचिक बनवली. त्यांनी कलेला कुठल्याही अटी-तटीत कोंडले नाही. विद्वतेच्या काथ्याकुटात बंदिस्त केले नाही. त्यामुळेच त्यांची बैठक नेहमीच सर्वस्पर्शी होत असे. बहुजन समाजापर्यंत पोहोचत असे.

विद्वानांच्या माना डोलावणारा आणि सामान्यांची मने डोलावणारा हा तयार शागिर्द मिळाल्यावर गुरूच फुलला. श्रीकृष्ण आश्रमात आल्यावर सांदिपनी ऋषींना झाला असेल तसा आनंद संगीतमहर्षी अल्लादिया खाँसाहेबांना झाला.

जयपुरी गायकीतली प्रौढ– विद्वत्ताप्रचूर– आणि क्लिष्ट वाटणारी लयकारीही भास्करबुवांच्या तयार गळ्याने सहज उचलली. इंद्रधनुष्याच्या रंगात सप्तरंग मिसळावेत तसा भास्करबुवांच्या सप्तसुरात हा जयपुरी रंगही कसा एकजीव झाला.

नथ्थनखाँची अवखळ लय मुरलेला हा गायक अल्लादियांच्या अवजड लयी-शीही कुस्ती जिंकण्याच्या आवेशात झटापट करू लागला आणि खोकर– बिहागडा रायसा कानडा– बसंती केदार आदी रागांवर प्रभुत्व गाजवू लागला. खाँसाहेब त्यांना भरभरून देत होते. भास्करबुवा फिरफिरून ऐकत होते. सारे पक्के करून घेत होते. ते अल्लादियांचे गंडाबंद शिष्य नव्हते, तरी त्यांच्या गायकीतले मर्म अचूक उचलणारा शिष्य म्हणून या दर्दी शिष्याला हातचे न राखता विद्या दिली गेली.

हा ठसा इतका खोल होता, की तब्बेत बरी नसली, आणि केसरबाई केरकर

या मातब्बर शिष्येची शिकवणी चालू असली, तर खाँसाहेब खुशाल म्हणत,

"केसर, पुढची जागा भास्कर दाखवील. आता याचं ऐक."

बुवांजवळ केसरबाई स्वतंत्रपणेही काही दिवस शिकल्या होत्या. त्यामुळे हे नाते अगोदरच प्रस्थापित झाले होते.

बुवांचा दरारा खाँसाहेबांच्या चिरंजिवांना इतका वाटे, की मंजीखाँ वगैरे त्यांच्यासमोर तंबोरा काढत नसत. मनात आले तर आपल्या गुरूहूनही भास्करबुवा मैफल जमवतील, अशी मुलांची खात्री होती. पण तसा प्रसंग येऊनही भास्करबुवांनी खाँसाहेबांसमोर प्रौढी मिरवली नाही.

धारवाडला एक खाजगी बैठक होती. त्यादिवशी अल्लादियांचा आवाज काम देत नव्हता. ते संभाळून– जपून गात होते. भास्करबुवा तंबोऱ्यावर बसले होते तरीपण आवाज जात असून ते गुरूच्या पुढे दाखवण्याचा आगाऊपणा करीत नव्हते.

गायीच्या मागून वासराने जावे किंवा मेंढीच्या मागून कोकराने जावे तशागत गुरूच्या मागून हा शिष्य चालला होता.

का कोण जाणे, त्या दिवशी खाँसाहेबांचे गाणे विशेष रंगले नाही. बुवांच्या एका शिष्याने गाणे संपल्यावर एकीकडे गाठून बुवांना विचारले,

"बुवा, तुम्ही का गायला नाहीत ? सट्टेबिट्टे लगावले नाहीत ? त्यांचे गाणं धुऊन काढले असतेत पाच मिनिटांत. अगदी पार पुसून टाकले असतेत."

बुवा अदबीने म्हणाले–

"आज बोललात– पुन्हा असे बोलू नका. मला आवडायचं नाही. लोक खाँसाहेबांचे गाणे ऐकायला आले होते– माझे नव्हे. आणि चुकून एखादेवेळी जमला, न जमला तरी अखेर गुरूच शिष्यापेक्षा मोठा असतो."

बरोबर खाँसाहेबांचे बंधू होते. ते म्हणाले,

"भास्कर समंजस आहे. तो अतिक्रमण करणार नाही. तो गाऊ लागला, तर दुसऱ्याला बैठक जमवणं अशक्य !"

–आणि याचा अनुभव खुद्द अल्लादियाखाँनाच वसईच्या एका संस्मरणीय मैफलीत आला.

भास्करबुवांगत तयार गायकानेही विचार करावा– अभ्यास करावा, असे राग-वैभव अल्लादिया खाँजवळ होते आणि बुवा त्या वैभवाचा वारंवार गौरवही करीत. खाँसाहेबांसमोर आपल्या पूर्व-गुरूंची बढाई मारून ते चढाई कधीच करत नव्हते. पण त्यांचे नाव सांगून नव्हे– तर गाणे गाऊन लढाई मारण्याचा बाका प्रसंग वसईला या चिमाजीआप्पावर आला. त्या दिवशी वसईच्या ज्या वैद्यांमुळे अल्लादिया खाँना गुण आला त्या वैद्यांकडे खुद्द खाँसाहेबांचेच गाणे ठरले होते.

तेव्हा वसईला जाणाऱ्या गाड्या थोड्या होत्या आणि बऱ्याच अंतरानेही होत्या म्हणून खाँसाहेबांनी भास्करबुवांना तंबोरे, तबले इत्यादी आयुधे घेऊन पुढे जाण्यास सांगितले.

भास्करबुवा साज आणि साजिंदे यांच्यासह वसईला पोहोचले. तेव्हा शेकडो रसिक अल्लादिया खाँसाठी आधीच जमा झाले होते. नंतर वेळ मोडायला नको म्हणून भास्करबुवांनी वाद्ये लावून घेतली. तंबोरेही लावून घेतले.

त्यानंतरच्या साडेदहाच्या गाडीलाही खाँसाहेब आले नाहीत असे सांगत– हात हलवीत वैद्यबुवांचा नोकर आला. आता एकपर्यंत गाडी नव्हती आणि एक-नंतर पहाटेपर्यंत गाडी नव्हती.

श्रोते हवालदील झाले. आपसात कुजबुजू लागले ! अल्लादियांच्या उपस्थिती-बद्दल सर्व स्थानिक मंडळी आता साशंक झाली. मग वैद्यबुवाच उठले, भास्करबुवांना कानाला लागून म्हणाले,

" बुवा, आता तुम्हीच गा. गुरूची लाज राखा. "

भास्करबुवा कावरेबावरे होऊन म्हणाले,

" सारे भक्त महादेवाच्या दर्शनास जमले असताना नंदीने दर्शन दिल्याने त्यांचे कसे बरे समाधान होईल ?"

" होईल– होईल. "

श्रोते ओरडले.

एक मार्मिक साहित्यिक म्हणाला,

" अहो, तो इथला गावठी बैल नाही, शंकरांचा नंदी आहे. तो नांदीदाखल गाऊ दे, नंतर गुरुदेव येऊ देत."

तरीही भास्करबुवा उठेनात. कारण अल्लादियांचा तापट आत्मकेंद्रित स्वभाव बुवा ओळखून होते. विद्वान खाँसाहेब शिष्याने बैठक गाजवली, तर नकळत अव-मानित होतील आणि क्रुद्ध होतील हे ते जाणून होते.

पण बुवा उठेनात, तशी एकएक श्रोते उठून जाऊ लागले. मैफलीतून उठून जाण्याची ही लाट वाढत गेली, तर खाँसाहेब येईपर्यंत रसिकांची सारी सभाच आटून जाईल हे चाणाक्ष भास्करबुवांनी ओळखले आणि गुरू येईपर्यंत श्रोत्यांना जागेवर बांधून ठेवण्याच्या इराद्याने, केवळ गुरूसाठीच ते गायला बसले.

श्रोते आनंदरसात नाहून निघाले, बेहोष झाले. तास केव्हा गेला कोणालाच कळले नाही. काळाची चोरी कलेइतक्या सफाईने कोणीही करू शकत नाही. मग ते वाचन असो– वादन असो, नर्तन असो, नाहीतर गायन असो.

गाणे ऐन रंगात आले असतानाच एक वाजला आणि त्या गाडीने आलेले अल्लादिया खाँ मैफलीत अवतीर्ण झाले !

बुवांनी त्यांना पाहिले मात्र–

क्षणात मैफल थांबली...

तंबोरे थांबले...

भास्करबुवा धावत पुढे गेले आणि गुरूचे चरण धरून म्हणाले,

"खूप उशीर झाला. लोक ऐकेचनात, उठू लागले. आपण येईस्तोवर त्यांना झुलवण्यासाठी आणि थोपवण्यासाठी म्हणून नाईलाजास्तव गायला बसायला लागले. त्यात आपला अपमान करायचा हेतू नव्हता."

तरीही रागास येऊन ते संगीतातले गौरीशंकर मस्तकात राख घालून ओरडले,

"आपण माझे शिष्य नाही. फैजमहम्मद आणि नथ्थन यांचेच शागिर्द आहात. आता त्यांचीच गायकी ऐकवा आणि आमचेही कान पावन करा."

हा उपरोधिक सूर भास्करबुवांच्या हृदयात जसा सुरा मारून गेला! आद्य गुरूंबद्दलचा त्यांचा अभिमानही जसा डिवचला गेला. आता तेही हट्टाला पेटले आणि 'ठीक आहे' म्हणून परत बैठकीत बसले.

त्यांनी डोळे मिटून सर्व गुरूंचे स्मरण केले. त्यांनी गंडाबंधन केलेले बीनकार बंदेअलीखाँ, म्हणाले, "इस गंडेकी लाज रखो!"

फैजमहंमदांना वंदन करताच ते त्यांच्या डाव्या कानी लागून म्हणाले,

"ईश्वर तेरा भला करो!"

लयीचे बादशहा नथ्थनखाँ उजव्या कानी लागून म्हणाले,

"तू खूप समजदार आहेस. आमच्या घराण्याची विद्या तुला भरपूर मिळाली आहे. तुला सदैव यश मिळेल. खुदा सदैव तुझ्या पाठीशी आहे."

भास्करबुवांनी तृप्त मनाने तंबोरा छेडला. कसदार, ऐटदार, लोचदार षड्ज लावला आणि रागविस्तार सुरू केला आणि पाचच मिनिटांत रंग भरला.

एखादा माणूस दुरून पाहूनच त्याचा स्वभाव कळतो; तसा भास्करबुवांनी अस्ताई-अंतरा मांडताच लोकांनी राग ओळखला.

फैजमहंमदांनी जसे त्यांच्या गळ्यात गुपचूप येऊन स्वरांचे छत उभे करायला मदत केली. बीनकार बंदेअलींनी मींडकाम सुचवायला सुरुवात केली. तर नथ्थनखाँ साहेबांनी मध्येच घुसून लयीचे नर्तन सुरू केले.

कुशल पदन्यास करीत कुणी देवांगनाच जशी वसईच्या परिसरात त्या जादू-भरल्या निशेत रुमझुमत आली. जाणकारांवर सात्विक धुंद चढून गेली. दिव्य आनंद बरसत गेली. शुधबानी– शुधमुद्रा ठेवून भास्करबुवांनी सात्त्विक आनंदाची अशी काही पखरण केली, की वैद्यबुवांच्या अंगणात सुगंधाची उधळण करणारी प्राजक्ताची फुलेही चकीत झाली! दारा-खिडक्यांतून वाऱ्याबरोबर आत डोकावू

लागली.

स्वर्गलोकीच्या त्या वृक्षाला स्वर्गीय सुगंधाचा कोण अभिमान ! पण आज– अल्लादियाखाँबरोबर त्यांचाही तो अभिमान गळून गेला !

भास्करबुवांनी गाण्यात कसूर तर केली नाहीच, पण अल्लादिया खाँची एकही जागा न घेता व त्यांनी शिकवलेला राग न गाता त्यांनी मैफल पाहता पाहता जिंकली. सखोल अभ्यास आणि सजीव प्रतिभाविलास यांच्या सुरील्या संगमात श्रोते नाहून निघाले.

वसईच्या रसबाळचा रंभा तो रसाळ गाभा पाहून स्वतःची आभा विसरल्या. माणसांबरोबर बाहेरच्या बागांतले माडही आता डोलू लागले. सळसळ आवाज करीत म्हणू लागले,

" आम्ही नावाचे कल्पवृक्ष. रसिकांची हरएक इच्छा पूर्ण करणारा हाच खरा कल्पवृक्ष ! "

प्रहरभर ते दिव्यगाणे ऐकता ऐकता या भास्करला भेटायला आभाळीचा भास्कर निघाला. तेव्हा या अद्‌भुत गायनाने खाँसाहेबही प्रभावित झाले आणि साश्रू नयनांनी शिष्याला मिठी मारून म्हणाले,

" जीते रहो मेरे भास्कर ! "

श्रोत्यांनी टाळ्यांच्या कडकडाटांनी या वाक्याला दाद दिली.

अल्लादिया खाँ शांत झालेले पाहून भास्करबुवांना एखादे मराठी पद म्हणण्याची विनंती श्रोत्यांतर्फे वैद्यबुवांनी केली. आणि भास्करबुवांनी ती मान्यही केली. कारण तो फक्त चौफेर गाणाराच गायक नव्हता, चौफेर विचार करणाराही होता.

उच्च अभिजात संगिताची आवड सर्वसामान्य जनतेमध्ये निर्माण करण्याचे साधन म्हणून मराठी नाट्यसंगीताचा वापर त्यांना आवश्यक वाटत होता. काही कलावंत उच्चतेच्या नसत्या कल्पना उरात बाळगून–नाट्यसंगीताला ओवळे समजून फक्त शास्त्रोक्ताचे भोपळेच सांभाळत होते.

पण बहुतेक पदे अस्सल खानदानी चिजांवर आधारित असतात, कमीत कमी त्यांचा तोंडावळा तरी शास्त्रोक्तच असतो, हेही मानभावी मंडळी विसरत होती.

आंगडेटोपडे मराठी घातले, तरी मूळचे रुपडे तेच होते, हे जाणकार बुवांनी नुसते ओळखले नव्हते, तर त्यांच्या प्रसाराचे व्रत अभिमानाने डोळसपणे अंगि- कारलेही होते.

मात्र पदाविष्कार करताना रस आणि राग गळ्यात गळा घालून चालले पाहिजेत, स्वरांइतकीच शब्दांचीही निष्ठा असली पाहिजे, हे अजमावून; शब्द हे

स्वर टांगण्याच्या खुंट्या नसून, स्वरांना अंगाखांद्यावर घेणारे लतावृक्ष आहेत, हे जाणून बुवांनी समयोचित पद काढले–

" कोण तुजसम सांग मज गुरुराया
कैवारी सदया ॥ "

महाराष्ट्रात राहिल्याने मराठीची लपेट कळलेले खाँसाहेब ते वंदन स्वतःला आहे हे समजून अक्षरशः घायाळ झाले आणि –

" तूचि शिष्या पोसणारी माता
तू विद्यादाता ॥ "

या ओळीवर बुवा आल्याबरोबर स्फुंदत स्फुंदत उद्‌गारले,

" सच है । सच है । भास्कर, तुझ्यावरील या गुरुमाऊलीचा राग गेला बरं का. अगदी पार धुऊन गेला. "

आणि मग सारी सभाच गुरुभक्तीत न्हाऊन गेली–वितळून गेली. गाणे संपले. रंगात येऊन अल्लादिया खाँ म्हणाले,

" आज तू माझ्या डोळ्यांतून पाणी काढलेस, तसेच परवा कलकत्त्याला गेले, तेव्हा ठुमरी गायक मोजुद्दीन खाँने काढले. मी बाबू धुनीचंदाकडे उतरलो होतो. तिथेच मोजुद्दीनही उतरले होते. आमचे त्यांचे कमरे मात्र अलग होते.

एक दिवस आम्ही धुनीचंदाबरोबर फिरायला निघालो. ते बग्गीत जाऊन बसले. आम्ही आमच्या कमऱ्यात खोट चढवून फेटा बांधू लागलो, तोच शेजारच्या कमऱ्यात मोजुद्दीनने भैरवी ठुमरी सुरू केली.

हाय रे अल्ला ! फेटा बांधतच त्याच्या खोलीत गेलो. त्या भैरवीचेच झालो. ती भैरवी ऐकताना अर्धा फेटा बांधायचा राहूनच गेला आणि फिरणे त्याहून राहून गेले.

धुनीचंद आम्हाला बघायला आले, तेही तिथेच रमले. आज तू आमची तीच अवस्था केलीस. बिल्कूल तीच ! ! "

भास्करबुवांना आठवले –

श्रीकृष्ण बासरीच्या नादात कुंजवनात रमला, म्हणून त्याला पहायला गोपमेळा गेला. आणि तोही तिकडेच रमला.

गेले पहाया नवलक्ष गडी
वळकाविली यमुना थडी
तशीच काहीशी अवस्था...

तोच खाँसाहेब खिडकीबाहेर अंगुलीनिर्देश करीत म्हणाले,

" तो बघ बाहेरचा सूर्याचा गुलाबी फेटाही अर्धाच राहिला तुझे गुरुस्तवन ऐकताना. "

त्यानंतर दुसऱ्या दिवशी खाँसाहेब गायले.

या प्रसंगाने गुरु–शिष्य दुरावले नाहीत, उलट आणखी जवळ आले. त्या-नंतरच्या प्रत्येक मैफलीत भास्करबुवा अल्लादियांचा एखादा मुश्किल राग श्रोत्यांना मुद्दाम पेश करू लागले आणि श्रोत्यांची उंची वाढवताना गुरुचे नावही वाढेल अशी दक्षता घेऊ लागले.

हे सारे कळून अल्लादिया खाँची पट्टशिष्या केसरबाई केरकर भारावून जाई. आणि म्हणे,

" भास्करबुवांची खरी योग्यता जाणणाराच मला कुणी आढळला नाही. आमच्या गुरुजींचा मात्र बेटा भास्करवर विलक्षण जीव आहे. म्हणून ते त्याच्या-समोर जीव तोडून गातात आणि जिवातले सारे गातात."

एक दिवस ही जिवाभावाची शिकवणी चालू असताना अल्लादिया खाँचे लक्ष भास्करबुवांच्या कोटाला नव्यानेच अडकवलेल्या घड्याळाकडे आणि त्यातील सोन्याच्या छड्याकडे गेले. शिकवणीभर ते त्या छड्याकडेच पाहत राहिले.

शिकवणी संपताच म्हणाले,

" तुम्हारी घडी तो बहुत अच्छी है । "

त्या गुरुभक्ताने मागचा–पुढचा विचार न करता सोन्याच्या छड्याचे ते घड्याळ झटकन् काढले आणि अल्लादिया खाँच्या छातीवरील झब्ब्यास अडकवून दिले.

खाँसाहेब संकोचून म्हणाले,

" अरे–अरे हे काय ! हे साधे घड्याळ नाही."

" असू दे. सोन्याने सोन्याकडे धाव घेतली तर बिघडले कुठे ! नाहीतरी गाताना आमचे घड्याळाशी नाते राहतेच कुठे ?"

तो प्रसंग पाहणाऱ्या केसरबाईंना वाटले,

" महाविष्णू आणि महादेव यात कमी-अधिक कुणाला लेखायचे ? ती तर एकाच भक्तीची दोन रूपं. साजिरी. गोजिरी. मनोहारी. काळाशी नव्हे तर आत्म्याशी नाते जोडणारे हे योगी !

दोघं समकालीन आहेत. गुरुशिष्य आहेत. तोलामालाचे आहेत. असामान्य आहेत. त्यात डावं-उजवं करण्याच्या फंदात पडण्यापेक्षा दोघांच्या कलेतून मिळ-णाऱ्या आनंदात मश्गुल रहाणंच खरं !"

तोच भास्करबुवा म्हणाले–

" बापुसाहेब कागलकर सांगत होते की, कोल्हापूरचे शाहू छत्रपती या रत्नपारख्यांनी कांताप्रसाद तबलजींना पदरी ठेवले आहे. तसेच आपल्यालाही दरबार गायक म्हणून नियुक्त केले आहे. त्या संदर्भात आपल्या पूर्वजांचा ताम्रपटही मिरवला

गेला– आपण या काळातले तानसेनच."

"भास्करराव, आम्हाला राजदरबार मिळाला पण तुमच्या प्रत्येक मैफलीला जनतादरबार लाभतो–सन्मान लाभतो त्याला भारतात तोड नाही."

नंतर आठ दिवस बुवांना अलादियांकडे जाता आले नाही. पण नंतर आल्या आल्या स्नान झाल्या–झाल्या अगदी उन्हाचेच उपरण्याच्या टोकाला प्रसाद बांधून ते निघाले. तशी वेणुताईनी ते कुठे निघालेत ते अचूक ओळखले. पण तान्हु-ताईना ती नजर नव्हती, दृष्टी नव्हती. त्यांनी भावाला वडिलकीच्या अधिकारात हटकले–

"अत्ता गाडीतून उतरलास, स्नानबीन केलंस. तो जरा विसावशील की नाही ?"

बुवा मिस्कीलपणे म्हणाले–

"माझ्या विसाव्याकडेच चाललो आहे."

"कुणी गाणारीण गोवेकरीण की काय ?"

आलेला राग गिळून ते शांतपणे म्हणाले–

"गाणारीण गोवेकरीण नव्हे, तर संगीताचे शहेन्शाह खाँसाहेब अल्लादिया-खाँ यांचेकडे जातोय."

"अगोबाईऽऽ, मग त्या मुसलमानाला प्रसाद कशाला न्यायचा ? एवढा उपरण्यात बांधून अगत्याने ! तो काही पीराचा प्रसाद नाही. गाणगापूरचा अंगारा आहे."

भास्करबुवांनी न बोलताच जोडे पायांत अडकवले. तान्हुताईंची गणना त्यांना केव्हा केव्हा वर्ज्यस्वरात करावी लागत असे. आजचा प्रसंग त्यांपैकीच होता.

भास्करबुवा पोहोचले तेव्हा खाँसाहेब खिडकीत बसून त्यांची वाटच पाहत होते. त्यांना पहाताच आवाज चढवून म्हणाले –

"न सांगताच आठवडाभर कुठे पळालास ?"

"आम्हाला नुकतेच कन्यारत्न झाले ना ? माईच्या जन्मापासून सहकुटुंब गाणगापूरला जायचे होते. अचानक ठरले आणि जाऊनही आलो. कळवायला सवडच मिळाली नाही. माफ करा. हा प्रसाद. आणि हा अंगारा."

खाँसाहेबांचा पारा एकदम खाली आला. त्यांनी 'गुरुदेव दत्त' म्हणून अंगारा गळ्याला लावला. कपाळाला लावला. आणि जिभेवरही ठेवला. तशी तान्हुताईचे भाष्य आठवून बुवा चकित झाले. म्हणाले,– आपण हिंदू देवदेवता जाणता ?"

दाढी कुरवाळीत खाँसाहेब म्हणाले–

"बेटा भास्कर– आम्ही मूळ हिंदूच. आमच्या घराण्याचे मूळ पुरुष 'नाथ विश्वंभर'– हे संत वृत्तीचे शांडील्य गोत्री गौड ब्राह्मण."

"मला वाटतं, स्वामी हरदासजी याच कुळातले."

"अगदी बरोबर."

"मग– मग राग येणार नसेल तर विचारू ?"

"विचार. अरे कूट राग सांगतो तिथे. कूट प्रश्न का सांगणार नाही ?"

"ते वेगळं. हे वेगळं. धर्मांतर का केलंत ?"

"ऐक. आमचे धर्मांतर म्हणजे राजनिष्ठेचा, देशप्रेमाचा विलक्षण इतिहास आहे. आमचे पूर्वज म्हणजे नाथ विश्वंभरांचे वंशज 'अनूप' नामक संस्थानचे दरबार गायक. पण महाराज त्यांना गुरुस्थानी मानीत.

एकदा दिल्लीपती शहाजहानचे अनूप नरेशाशी वाकडे आले. त्यांना पकडून कैद केले गेले. त्यांच्या सुटकेचे अनेकांचे अनेक प्रयत्न फोल झाले !

मग संस्थानचे आश्रित गायक आपल्या लाडक्या राजाच्या सुटकेचा हेतू मनात बाळगून दिल्ली दरबारी पोहोचले. कसून गायले. रसिक शहाजहान खूष होऊन म्हणाला–

"चाहेल ते मागा. मागाल ते देईन."

गायक ताडकन् म्हणाले–

"आमचा प्राण आपल्याकडे गहाण पडला आहे. तो परत करा."

"प्राण ? तो कसा ?"

"आपल्या कैदेतले प्राणप्रिय अनूपचे राजेसाहेब परत करा."

"एक शर्त आहे."

"मान्य. एकदम मान्य."

"मागून नाही म्हणाल."

"आम्ही बच्चे असलो तरी आपणाप्रमाणेच वचनाचे सच्चे आहोत."

"ऐका. अनूपच्या राजाच्या मोबदल्यात तुम्हाला मी दरबारी ठेवून घेत आहे. तुम्ही इस्लामधर्म स्वीकारायचा आहे. आणि माझ्या पंक्तीला जेवायचं आहे..."

"राजनिष्ठेला धर्मनिष्ठा अशी शरण गेली तर !"

"बेटा भास्कर. तो राजनिष्ठ गौडबम्मन मुसलमान झाला. लेकिन आजही या नसांतून हिंदूरक्त वहाते आहे याचा मला अभिमान आहे. मी निषिद्ध खात नाही आणि पीतही नाही. मी मूळचा ब्राह्मण म्हणूनच तुझ्यागत ब्राह्मणपुत्र स्वतःचा पुत्र समजून जवळ केला आहे.

# तेरा

भास्करबुवांचे गायन जेवढे उच्च दर्जाचे होते, तेवढ्याच उच्च दर्जाचे जीवनही होते. त्यामुळे कुठल्याही गवयाचा हेवादावा करणे त्यांना माहीत नव्हते. प्रत्येकातल्या चांगुलपणांशीच त्याचे नाते बांधलेले होते.

वेणूताई कुणा मैत्रिणीबरोबर निवडटिपण करीत बाहेरच्या व्हरांड्यात बसल्या की कौतुकाने सांगत–

" अहो, काल काळ्या रामाच्या देवळातले कीर्तनकार सांगत होते–"

" काय सांगत होते ?"

" एकदा भगवान श्रीकृष्णांनी राज्यसभेतला चांगला माणूस आणण्यास दुर्योधनाला सांगितले तर स्वारी हात हलवीत आली आणि नाक मुरडीत म्हणाली, " शीऽ. उभ्या सभेत वणवणलो. पण एक माणूस धड सापडेल तर शपथ. वासुदेवा, प्रत्येकात काही ना काही व्यंग आहेच ! कमीपणा आहेच."

गालातल्या गालांत हसून सुयोधनाला जागेवर बसवून त्या सभेतल्या धर्म-राजांना उद्देशून श्रीकृष्ण म्हणाले–

" धर्मा, राज्यसभेतला एक वाईट माणूस धरून आण पाहू."

धर्मराज उठले व परत येऊन म्हणाले–

" गोपाळा– आपल्याला गोकुळातल्या साऱ्याच गाई कामधेनु वाटतात तसे सभेतले एकजात सारे पुरुष आम्हाला– सद्वर्तनी, सहृदय आणि सभ्य वाटतात. काय सांगू, कुणाच्यात वाईटपणा अगदी औषधालाही आढळला नाही !"

" जशी दृष्टी तशी सृष्टी."

शेजारणीने शेरा मारला. तशी अवसान येऊन वेणूताई म्हणाल्या–

" अगदी खरं. इकडच्या स्वारीलाही प्रत्येक गायकांत काही ना काही चांगुल-पणा दिसतोच."

" दिसणारच. म्हणूनच तुमच्या या बंगलीतल्या मैफलीत हिंदू, मुसलमान, पारशी, शीख, पंजाबी, गोवेकरणी साऱ्यांचाच समावेश असतो. सणसूद नसूनही गाणीबजावणी कसली चालतात ?"

" अहो, यांचे गायकमित्र आले की यांना सणच वाटतो. त्यातून पूर्वीच्या गुरूंची तिथबीथ आली की विचारूच नका."

" तुम्हाला कंटाळा नाही येत ?"

" बिलकूल नाही. अहो, मी पतिव्रता आहे. त्यांचे व्रत तेच माझं व्रत. त्यांचा आनंद तोच माझा आनंद."

" बखलेबुवांची बखळ गाणी होतात. मग पैसाही खूप मिळत असेल."

" चुकीची कल्पना आहे तुमची. कारण सारीच गाणी पैशाची नसतात. आणि केवळ पैशाकडे पाहून हे गातही नाहीत. काही दक्षिणेची असतात. कद्रु बिदागी क्वचित मिळते. पण त्यातला बराचसा वाटा नथ्थनखाँसाहेबांच्या लेकुरवाळ्या विधवा पत्नीकडे जातो. त्यांची मुलं मिळवती होईतो सांभाळायलाच हवं ना त्यांना ?"

" आणि काय हो त्या ग्रँटरोडच्या डॉ. भालचंद्रांच्या वाडीत ओळीने सहा गाणी झाली म्हणे ?"

" हो. पण पाच पैशाची. सहावं फुकटचं— लोभाचं आणि हौसेचं. कृतज्ञतेचं !"

शेजारणीने खवटपणे विचारले—

" गिरगाव ब्राह्मणसभेतल्या गणपतीतलं गाणंही हौसेचंच का ?"

" होय. पण त्यामागची भूमिका देशप्रेमाची आहे."

वेणूताई अभिमानाने म्हणाल्या. तशी मैत्रीण आ वासून म्हणाली— " अग्गोबाई ! ऐकावं ते नवलच !"

" नवल कसलं ? देशावर प्रेम फक्त पुढाऱ्यांनीच करावं काय ?"

वेणूताईंच्या या बिनतोड प्रश्नाने मैत्रीण पेचात सापडली. तोच वेणूताई म्हणाल्या,

" ब्राह्मणसभेतले लोक गाणं ठरवायला आले तशी यांनी विचारलं— " उत्सवात भाषण कुणाचं आहे ?"

चिटणीस म्हणाले—

" लोकमान्य टिळकांचं."

" त्यांची बिदागी किती आहे ?"

" ते मानधन न घेता भाषण करणार आहेत. राष्ट्रीय कर्तव्य म्हणून— गणपतीचं निमित्त करून— जनता संपर्क साधणार आहेत. जनजागर करणार आहेत."

" मग मीही काही घेणार नाही."

मैत्रीण हात जोडून म्हणाली—

" अग्गोबाई ! छान ! म्हणजे तो लोकमान्य नायक आणि हे लोकमान्य गायक. दोन मोठीच धेंडं पकडली ब्राह्मणसभेनं."

तोच भास्करबुवांचे जोडे वाजले. बरोबर शेठ विठ्ठलदास द्वारकादास होते. वेणूताई लगबगीने उठून घरात गेल्या. भाटीया मंडळींनाही बुवांच्या गाण्याचे वेड लागले होते. ते बुवांना सांगत होते,

" आम्ही पन्नास रुपये जमवले आहेत. आपल्या गाण्यासाठी केवळ."

" असं ? मग मला पस्तीसच रुपये द्या. आणि उरलेले पंधरा चहा, कॉफी आणि वाहनखर्चाला धरा."

अशी अल्पखर्चाची गाणी एकदाच नव्हे, तर अनेकदा भास्करबुवा स्वीकारीत. कारण समाजाच्या सर्व थरांत शास्त्रोक्त संगीताचा प्रसार झाला पाहिजे, अशी त्यांची जिद्द होती. त्यामुळे त्यांच्या खिशाला अमुक तमुक पैशांची हद्द नव्हती.

शिवाय कुणा संस्थानिकाने कदर केली की सारी कसर भरून निघे. म्हैसूर दरबारी एका दसऱ्याला हजेरी लावल्याबर चामराज महाराजांनी भास्करबुवांना महिनाभर सहकुटुंब ठेवून घेतले होते. चांदीच्या ताटात सहस्र रुपये घालून वर भरजरी पोषाख देऊन संभावना तर झालीच होती, आणि शिवाय रोजचा शिधा घरापर्यंत येई.

या शिध्यात शेर शेर लवंगा– शेर शेर वेलदोडे ! साजूक तुपाची चरवी– पायली पायली सुकामेवा इत्यादी गोष्टी असत. बुवांची लहानी माई खाऊन खाऊन किती खाणार ? त्यामुळे नथ्थनखांच्या महम्मद–अब्दुल्ला– विलायत– नन्ने इत्यादी मुलांच्यावरच खाऊची खैरात होई.

भास्करबुवांना घेणे माहीत होते, त्यापेक्षा देणे अधिक माहीत होते. म्हैसूरच्या महाराजांकडून सत्कार– पुरस्कार म्हणून ताटभर रौप्यमुद्रा आल्या तर बुवांनी बक्षीस घेऊन येणाऱ्यास थांबवले. आणि शेला बाजूला करून त्याला त्यातलेच शंभर रुपये बक्षीस दिले.

तो राजसेवक बक्षीस घ्यावयास कां कूं करू लागला. तशी बुवा म्हणाले–

"ही राजलक्ष्मी आहे."

"तरीपण इतके ?"

"राजलक्ष्मीला कद्रूपणा आवडत नाही."

या अशा औदार्यामुळे बुवांकडच्या लक्ष्मीकडची आवक मोठी असायची, तशीच जावकही मोठी असायची.

भास्करबुवांचा दक्षिण दिग्विजय असा ऐन जोशात असतानाच त्यांचा लौकिक उत्तरेलाही पसरला. आणि गायक जन्माने कुठल्याही प्रांताचा असला तरी कलेने तो साऱ्या राष्ट्राचाच होऊन जातो हे सिद्ध झाले.

पंजाबमधील जालंदर येथील 'देवीतलाव' मंदिराचे महंतबाबा हरिवल्लभ गिरी महान ध्रुपदीये. ते मंदिराची सेवा संगीताने करीत. प्रतिवर्षी गायन महोत्सव करीत. अठराशे पंचाहत्तराच्या आसपास या उत्सवाचा प्रारंभ झाला असावा.

अठराशे अठ्ठ्याण्णवमध्ये पंडित विष्णू दिगंबर पलुस्कर हे उत्तर दिग्विजयासाठी दिल्लीस गेले. तेव्हा जालंदरच्या उत्सवात गायले. त्यांच्या सात्विक-भव्य रूपाने आणि मधुर गायनाने सारा पंजाब त्यांच्यावर लुब्ध झाला. संगीताच्या या प्रसारकाने म्हणजेच विष्णू दिगंबराने एकोणीसशे एक साली लाहोरला गांधर्व महाविद्यालय स्थापन केले.

पंडितजी तिकडून महाराष्ट्रात येत तेव्हा इकडील मातब्बर गायक-वादकांशी संपर्क साधीत. अशीच एकदा भास्करबुवांची गायकी आणि कीर्ती त्यांच्या कानी आली. आणि त्यांच्याच प्रेरणेने जालंदरचे देवीतलाव मंदिराचे मानापानाचे आवंतन आले.

मात्र बिदागी केवळ तीनशे रुपयेच देऊ केली होती. तरीही दूरदृष्टीच्या मुंबईतील चाहत्यांनी गळ घातली. –

" पंडितजी, आपण जरूर जावे. आणि अस्सल गाणे म्हणजे काय चीज असते ते पंजाबला सुनवून यावे. मधुर द्राक्षांची चव कळल्यावर आंबट बोरांच्या मागे कुणी लागत नसतं. आपण होऊन द्राक्षांची किंमत मोजत असतो.

गायकाची खरी किंमत नाव ऐकून कळत नसते- गाणे ऐकूनच कळत असते. पाच नद्यांचा संगम असणाऱ्या पंजाबच्या कानावरून पाच गुरूंचा संगम असलेला हा संगीतौघ जाऊ दे. ते लोक रसिक आहेत. दरवर्षी आपल्याला बोलवत रहातील. "

" एकूण या भीमथडी तट्टाने अडेलतट्टूपणा न करता अटकेचे पाणी पिऊन यावे असे म्हणणे आहे तर तुम्हा लोकांचे. ठीक आहे, तसे करतो. "

बुवा विनयाने म्हणाले. आणि त्यांनी जालंदरला रुकार दिला.

जालंदरला साक्षात भाग्यदेवताच जशी भास्करबुवांची प्रतीक्षा करीत होती. जिथे रंगदेवता वसतीला जाते तिथे तिचा पाठलाग करीत भाग्यदेवता येते.

भास्करबुवा जालंदरच्या रंगमंचावर प्रथम आले तेव्हा लक्ष्मीने त्यांच्या पायाखाली सोन्याची रांगोळी काढली असली पाहिजे. म्हणूनच तो त्यांच्या आयुष्यातील सुवर्णक्षण ठरला.

उत्सवमंडप रसिकांनी ठेच भरलेला होता. रंगीबेरंगी झालरी पुढे भरणारा गाणरंग जशा अधीच सूचित करीत होत्या. रंगमंचाला लगटून किनखापी आभ्रांचे लोड आणि रेशमी गाद्यांची बैठक होती. त्यावर ग्वाल्हेर–इंदूर–भोपाळ–म्हैसूर बडोदा आदी अनेक ठिकाणचे गायक-वादक विराजमान झालेले होते.

तो जुना जमाना असल्याने विजेच्या बत्त्या नव्हत्या, तर गॅसच्या बत्त्या इथे तिथे लखलखत होत्या. भास्करबुवांच्या चेहऱ्याभोवतालचे तेजोवलय पाहून त्या लज्जित झाल्या !

तो जमाना दूरध्वनिक्षेपकाचाही नव्हता. पण सर्व गुरूंचे, नेत्र मिटून आदरपूर्वक स्मरण करून भास्करबुवाँनी षडज् लावण्याचा अवकाश– पुढच्या रांगेपासून मागच्या रांगेपर्यंत तो झारदार सूर पोहोचला, आणि प्रत्येकाचा ऊर उदंड आनंदाने भरून आला.

त्या षड्जाची अंगुळी धरून सारेच कुठल्याशा–दिव्यभव्य जगतात गेले.

देवांच्या दरबारातल्या रागाचा तो थाट पाहून जो तो चाट झाला. कुणी शापभ्रष्ट गंधर्वच देवाची सेवा करायला अवतरला असे कळून चुकला. कानांत प्राण आणून ऐकू लागला. डोळ्यांत प्राण आणून पाहू लागला.

लांब काळा कोट–शुभ्र धोतर–डोक्यावर जरीकाठी फेटा. आणि खांद्यावर जरीकाठीच उपरणे. नाकेला–गोरेला–तेजस्वी डोळ्यांचा हा माणूस पायणीच्या पायरीवरून हृदयाच्या सिंहासनावर कधी जाऊन बसला हे श्रोत्यांना समजलेच नाही !

अंगावरच्या शालीचे भान विसरून श्रोते समेची मान तुकवू लागले. मंडपाला लटकावलेल्या फुलांचा सुगंध खरा, की भास्करबुवांच्या गायकीचा सुगंध खरा असा श्रोत्यांना संभ्रम पडला.

कातचुन्याने रंगण्याआधी मैफल तालासुरांनीच रंगून गेली. विड्याची पाने एकटी पडली. तीही ऐकता ऐकता टवटवीत झाली. झोपेने पेंगुळलेली माणसे ताज्या गायकीने पुन्हा ताजीतवानी झाली.

ते गाणे गळ्याने गायले जात नव्हते, तर अंतःकरणाने गायले जात होते. म्हणूनच ते ऐकणाऱ्याच्या अंतःकरणाला भिडत होते. अजाण श्रोते तर या गानौघात वाहवलेच, पण सुजाण श्रोत्यांनाही आनंदाचे भरते येऊन डोळ्यांतली यमुना या गंगेला भेटायला धावून आली.

प्रत्येक सूर आपल्या जागी येऊन चपखळ बसत होता. त्या रागरचनेतील स्वतःचा दर्जा सांभाळत होता. रेसभर चढेपणा की श्रुतीभर माघार नाही. गंभीर स्वरभरणा–मूर्छना–मींड–आलाप–बोलताना–तान सारे अलंकार योग्यवेळी योग्य ठिकाणी चढवून भारदस्त रागमूर्ती श्रोत्यांसमोर जशी जिवंत उभी केली. त्यांचे गायन संपताच बुजुर्गांनी वाहावाऽची स्तुतीसुमने उधळली आणि पंजाबच्या आम-जनतेने जर शेकडो रुपयांच्या फुलांची भास्करबुवांच्यावर बरसात केली !!!

मंदिराच्या गाभाऱ्यात चालणारे अभिषेकाचे शुचित्व बैठकीच्या गाभाऱ्यात श्रोत्यांनी भोगले. ते धावले. आनंदले. बेहोष झाले धुंदफुंद झाले......

त्या आनंदकंद भास्करबुवांना मग तासभर बैठकीवरून हालता आले नाही. अभिनंदनांचा अपूर्व वर्षाव बराच वेळ चालूच राहिला. श्रोत्यांची ही दाद उत्सव-समितीला मग मानावीच लागली.

उत्सवसमितीने तीनशे रुपयेच ठरविले असले तरी या मौलिक गायनाचे मुख्य प्रमुख गायकाला द्यावयाच्या सहस्र रुपयांच्या मानधनाने केले गेले, तेव्हा बुवांपेक्षा त्यांच्या शिष्यांचीच छाती अभिमानाने फुगून गेली.

प्रेक्षकांनी दिलेल्या पावतीतच बुवांना ताम्रपट मिळून गेला होता. खऱ्या कलाकाराला मिळालेला श्रोत्यांचा हुंकार हाच त्याचा खरा सत्कार असतो.

उत्सवात शे-दोनशे कलाकारांनी आपापली कला सादर केली. त्यात महंत-जीकडून 'देवगंधर्व' ही अत्युच्च पदवी भास्करबुवांना प्रदान करण्यात आली. तेव्हाही अहंकार न दाखवता- 'सबगुरुकृपा-' म्हणून बुवांनी विनयपूर्वक त्या पदवीचा स्वीकार केला. 'विद्या विनयेन शोभते' हेच खरे.

या देवगंधर्वाचा ठसा दुसऱ्या दिवशी इतका खोलवर उमटला की बुवा ज्या सराईत उतरले होते त्या सराईजवळ हिंदू-मुसलमान गायक आले की पायांतून वहाव काढीत, रुमालात गुंडाळीत, काखेत ठेवीत, आणि तेथून बंदगी करीत पुढे जात.

मार्गात कुणी अनभिज्ञाने या विलक्षण प्रकाराबद्दल छेडले तर उत्तर मिळे-

"अरे पंडितजी सराईमे ठेहरे हुवे है। वेइज्जत थोडेही कर सकते है ?"

पंजाबवरील ही स्वरांच्या वारुवरील स्वारी खूपच यशस्वी झाली.

श्रेष्ठ गायकाची बिदागीही मिळाली. पण त्या सहस्र रौप्य मुद्रांपेक्षा सहस्रावधी श्रोत्यांच्या फुललेल्या मुद्रा बुवांच्या लेखी लाख मोलाच्या होत्या. कारण पैशाच्या सच्चेपणापेक्षा श्रोत्यांच्या सच्चेपणावरच कलेचे भवितव्य अवलंबून असते, हे तो द्रष्टा पुरुष पुरेपूर ओळखून होता.

जालंदरच्या त्या जिंकलेल्या फडानंतर भास्करबुवांना पंजाबची शेकडो निमंत्रणे आली. या देवगंधर्वाला लाहोर-अमृतसर इत्यादी ठिकाणच्या चाहत्यांनी आवर्जून नेले.

पंजाबप्रमाणेच अगदी अल्पावधीत भास्करबुवांनी सिंधप्रांत जिंकला, आपलासा केला. सम्राट सिकंदराप्रमाणे तो येतो, तो पहातो. तो जिंकतो या चालीवर ते येतात, ते गातात, ते जिंकतात, असे झाले. बुवा नशिबाचे शिकंदर तर खरेच. पण त्या मागचे प्रयत्नही धुरंधर.

पंजाब आणि सिंधला बुवांनी आपली गायकी नुसती ऐकवली नाही, तर तिथल्या लोकांच्या अभिरुचीला उंचीवर नेले. त्यांना चांगले गाणे ऐकायला शिकवले. गाण्याची उंची वाढली की श्रोत्यांची उंची आपोआपच वाढत जाते.

शिष्यामुळे गुरु जिवंत रहातो हे जितके खरे, तितकेच श्रोत्यांमुळे संगीतकला जिती-जागती रहाते हेही खरे.

महिन्या दोन महिन्यांनी भास्करबुवा महाराष्ट्रात परत आले ते उत्तरेला आपली पदमुद्रा ठेवूनच, पुढच्या गायकांसाठी त्या सकस भूमीत बीज पेरूनच. आणि तरीही मनात एक रुखरुख घेऊन -

"फैजमहम्मद आणि नथ्थनखाँ पैगंबरवासी झाले. अल्लादियाखाँ थकत चालले. आता मी अधिक चांगले कुठे आणि कुणाजवळ शिकू ?"

भास्करबुवा आमरण विद्यार्थीच राहिले. सिंध-पंजाबमध्ये हिंडताना सत्का-

राची फुले गोळा करता करता दोहे–लोकगीते–पहाडीगीते–ठुमऱ्या-गझल-कव्वाल्या आदींच्या माळा गळा घालूनच ते परतले.

*

# चौदा

भास्करबुवा उत्तर दिग्विजय करून आल्यावर पूर्वीच दक्षिण दिग्विजय केला असूनही त्यांच्या कर्नाटकातल्या चाहत्यांना त्यांचा पुन्हा एकदा सत्कार करण्याची उबळ आली. त्यांचे तेजस्वी गायन कर्नाटकच्या कर्णपथावर पुनश्च यावे अशी तीव्र असोशी निर्माण झाली.

पित्रे वकील, मणेरीकर ड्रॉईंग मास्तर, पुणेकर, डॉ. गोरे, बल्लारी वकील, गुट्टू इत्यादींनी भास्करबुवांना आवर्जून आमंत्रण देऊन, जंगी सत्कार करून सुवर्ण-पदक देण्याचे आयोजित केले.

त्याचे आणखी एक कारण म्हणजे त्यावेळी किराणा घराण्याचे ख्यातनाम गायक अब्दुलकरीमखाँ यांनी कर्नाटकात स्वतःचे बस्तान चांगले बसवले होते. राम-भाऊ कुनगोळकरांसारखे शिष्य– उत्तम शिष्य मिळवले होते.

भास्करबुवा खाँसाहेबांना बडोद्यापासून ओळखून होते. त्यांच्या रसिल्या, स्वरप्रधान गायकीबद्दल ऐकूनही होते. अब्दुलकरीमखाँच्या चाहत्यांना एक ब्राह्मण काय गाणार असे वाटले. त्यातून 'अभोगी'सारखे दाक्षिणात्य राग खाँसाहेबांनी पचवले होते. आणि लोकप्रियही केले होते.

खाँसाहेबांना अनेक वाद्ये अवगत असल्याने त्यांचा स्वरांवर विलक्षण ताबा होता. श्रुतींचा अभ्यासही दांडगा होता. तंबोऱ्यावरून स्वर न लावता त्यांच्या षड्जावरून वादक तबला लावीत. इतकी, स्वरांची मिरास होती.

ललत, आसावरी, जोगिया, मालकंस, अभोगी, शंकरा, पिळू, मांड हे त्यांचे हातखंडे राग होते.

दोन्ही मातब्बर गायक आपापल्या बैठकीत गात होते. आणि बैठकी गाज-वीतही होते. अशावेळी गायकांऐवजी श्रोत्यांच्याच मनात श्रेष्ठ-कनिष्ठतेची चुरस लागे. आणि दोन्हीकडे गर्दी आणि दर्दी यांची चढाओढ लागे.

पण आपापल्या परीने थोर असलेले हे दोन्ही कलावंत एकमेकांना जाणून होते. चांगल्या अर्थाने ओळखून होते. या दोन्ही फुलांना स्वतंत्र गंध होता– स्वतंत्र

-ग होता– स्वतंत्र आकार होता– स्वतंत्र व्यक्तिमत्त्व होते.

धारवाडचे उभय गायकांचे चाहते श्री. चाफळकर यांचे घरी उभयतांची मोठ्या चुरशीची गाणी झाली. एक दिवस एकाचे आणि दुसरे दिवशी दुसऱ्याचे. दोन्ही रंगली. स्वरभास्कराच्या तेजाने सभा मिलमिल झाली. तर अब्दुलकरीमखाँच्या स्वरचंद्रिकेने सभा चिंब झाली.

कुणाला ज्ञानदेवांची ओवी आवडते, तर कुणाला नामदेवांचा अभंग आवडतो. तसेच झाले. डावं-उजवं करणारांची पंचाईत झाली ! तरतमभावांची गाळण उडाली. संगीत हेव्यादाव्यांच्या पलीकडचं; सात्विकतेचं भांडार आहे याची प्रचीती आली.

दोन्ही दिवशी श्रोते आनंदोन्मादातच घरी निघून गेले. तरी पण ज्यांच्या घरी गाणे झाले, त्यांना श्रोत्यांचा अभिप्राय नको होता. तर त्या श्रेष्ठ गायकांचा परस्परांविषयीचा अभिप्राय हवा होता. गाण्याच्या दोन्ही दिवशी भास्करबुवांचा मुक्काम चाफळकरांकडे होता. मैफली संपल्यावर त्यांना एकीकडे गाठून चाफळकरांनी विचारले–

" बुवा, खरंखरं सांगा. आज अब्दुल करीमखाँ कसे गायले ?"

त्यावर दिलखुलास हसून भास्करबुवा मोकळेपणे म्हणाले–

" अशी मधुर आवाजाची तयारी सात जन्म घेतले तरी आपल्याला यायची नाही."

बुवांच्या गाण्याइतकेच त्यांचे मनही विशाल आहे याचा सुखद प्रत्यय येऊन चाफळकर एकदम सद्‌गदित झाले. वाहत्या झऱ्याला आणि वाहत्या गळ्याला आत-बाहेर नसतेच. त्यामुळे हा रसिला अभिप्राय ओठांपासूनचा नसून पोटापासूनचा आहे हे त्यांना कळून चुकले.

तरीपण अब्दुलकरीमखाँसाहेबांचे भास्करबुवासंबंधीचे मत अजमावल्या-शिवाय त्यांना रहावेना. त्यानंतर त्यांना भेटून– एकीकडे गाठून चाफळकरांनी खोचकपणे विचारले–

" खाँसाहेब, परवा भास्करबुवा कसे गायले ?"

त्या बुजुर्ग गायकाने तितकेच मार्मिक उत्तर दिले–

" क्या कहूं ? दख्खनमे एकही ऐसा गवय्या है ? सब हिंदूस्तान मे हिंदुओमे इनके लायक थोडेही गवय्ये है ।"

जवळच बसलेले शिकवणीला आलेले खाँसाहेबांचे मातब्बर शिष्य रामभाऊ कुनगोळकर बोलून गेले–

" अहाहा ! काय ती मैफील. सुरुवातीपासून शेवटपर्यंत रंगतदार. भास्कर-बुवा कोणताच राग कंटाळवाणा होऊ देत नव्हते. स्वरात– आलापात केवढी

जिवंत रंगत ! मला त्यातला थोडाजरी अंश साधला तरी मी स्वतःला कृतार्थ समजेन !"

वाफळकरांना उभयतांची थोरवी कळली. खरी कला मत्सराची क्षुद्र पायरी ओलांडून आत्मानंदाच्या माहेरपणाला आलेली नसते काय ?

धारवाडचे गानवेडे शामनाथ गुर्टु हेही भास्करबुवांचे अद्‌भुत साक्षात्कारी गायनाने झपाटले ! धारवाडात भास्करबुवांचा सत्कार समारंभ झाल्यानंतर दुसऱ्या दिवशी त्यांनी आपल्या मित्राला पत्र लिहिले—

'प्रिय दोस्त,

तू कमनशिबी ! धारवाडात नव्हतास. त्यामुळे मोठ्या मैफलीला आंचवलास !!

फार पूर्वी फैजमहम्मदखाँकडे बडोद्यात भास्करचा पुरीया धनाश्री ऐकला तेव्हाच भविष्यकाळात या विद्यार्थ्याला अतिशय उज्ज्वल यश मिळेल असे समजलो होतो.

नुकतेच हुबळीचे श्री. गोरे यांचेकडचे निमंत्रण आले. आवर्जून गेलो. सर्वांच्या आग्रहावरून मी गौरीरागाची फर्माइशी केली.

मला इथे कबूलच केले पाहिजे की बुवांनी गौरी राग इतका काही परिपूर्णतेने आणि रसिल्या स्वरांनी आळवला की वा ऽ !

रागस्वरूपाची त्यांची जाणीव विलक्षण खोल होती. सर्व सभा मंत्र-मुग्ध झाली होती. त्या संध्याकाळच्या स्मृती माझ्याजवळ आमरण टिकणार आहेत ! कारण शेवटी बुवांच्या गुणगौरवपर भाषण करण्याचा मान मला मिळाला.

बुवांना डॉ. गोरे यांच्या वतीने आठवण म्हणून सुवर्णाची मुद्रिका देण्यात आली. मैफल पूर्णतया यशस्वी झाली.

आपण हवे होतात...नव्हतात त्याची रुखरुख लागून राहिली...

आपला

शामनाथ गुर्टु.'

मूळ इंग्रजी पत्राचा हा मराठी अवतार. भाषा बदलली तरी भाव बदलत नसतो. कपडा बदलला म्हणून माणूस बदलत नसतो.

बिऱ्हाडी आल्यावर बुवा ती अंगठी काढू लागले. पत्नीजवळ देऊ लागले. तशी बुवांच्या उमद्या रूपाकडे डोळाभरून पाहत वेणूताई म्हणाल्या—

"त्या अंगठीमुळे बोटांना नव्हे तर एका माणसाच्या बोटामुळेच त्या मुद्रिकेला शोभा आलीय."

"अहो, पण आम्ही सारखे प्रवासात असतो. गाण्याच्या तंद्रीत असतो."



" म्हटलं, लक्षात आहे का ? आपण आता जोडप्याने माईला घेऊन कुळस्वामिनीच्या– नारायणीम्हाळसाच्या दर्शनाला जाणार आहोत. ते विसरलात वाटतं ? मग तिला बोटावरची शाबासकी नाही दाखवणार ?"

" दाखवणार तर. अहो लहानपणी आम्ही पहिलंवहिलं भजन नारायणी रागात गायलो आणि सभा जिंकून बसलो."

" म्हणजे देवीचीच कृपा म्हणायची."

" बरी आठवण झाली. तिकडे चांगलं चातुर्मास राहण्याच्या तयारीने चला."

" म्हणजे ? मी नाही समजले."

" अहो, आमच्या पेडण्याच्या हिराबाई आणि शिरोड्याच्या ताराबाई यांची निमंत्रणे आधीच येऊन पोहोचली आहेत. त्यांचे पाहुणचार घ्यायचे आहेत. आणि गाणेही शिकवायचे आहे. पूर्वतयारीसाठी त्या तिथे पोहोचल्यासुद्धा."

" छान. देवाआधी भक्तांनीच देवळात दाटी केली म्हणायची ?"

पाळण्यातल्या लेकीचा– अक्काचा– गालगुच्चा घेत बुवा म्हणाले–

" वेणूनादातून मुक्तता झाली की मग आम्ही शिष्यशिष्यिणींचा नाद ऐकणार ना ?"

आणि एकदम भारावून भास्करबुवा म्हणाले–

" ही वेणू हाडामासांची आहे म्हणूनच आमच्याबरोबरच्या उन्हापावसात टिकली. लाकडांची असती तर कधीच तडकली असती."

गोमंतकात बुवांना शिष्य-शिष्यीणीच भेटल्या नाहीत, तर खानदानी संगीताचा प्रसार करायला गोमंतकात आलेले पं. रामकृष्णबुवा वझेही भेटले.

पूर्वी नानासाहेब पानश्यांकडे इंदोरास उभयतांच्या गाठीभेठी झाल्या होत्या. त्या आठवणींच्या सरी अंगावर घेताना दोघेही भिजून गेले. एकाचे किशोरपण आणि दुसऱ्याचे बालपण त्या आठवणींचे बोट धरून जसे पुनर्भेट देऊन गेले.

भास्करबुवांना वझेबुवांचे खूप कौतुक होते. काट्यावरची वाटचाल करून या तपस्व्याने चिजांची फुलं वेचली आहेत हे माहीत होते. त्यामुळे नेपाळच्या या दरबार गायकाला गोमंतकात भेटल्यावर उभयता जसे दुधसागरच्या धबधब्यातच न्हाऊन निघाले.

भास्करबुवांकडून नाट्यसंगीताची प्रेरणा घेऊन वझेबुवांनी ' ललीतकलादर्श'-कडे कूच केले.

गोमंतकाचा चातुर्मास संपतो तोच पंजाबचा मधुमास सुरू झाला. असाच उत्तरेचा स्वरांचा दरबार भरला होता. अनेक बड्या बड्या गायकांबरोबर भास्करबुवाही बैठक सजवणार होते.

बैठक सुरू झाली. एका पंडीत गायकाने आपल्यापरीने उत्तम राग सादर केला. सर्वसामान्य श्रोत्यांनी त्याचा आदरही केला. पण बुजुर्गांनी त्या सवंग गाण्याची कदरही केली नाही. विशेषत: टिक्कासाहेब नावाचे संगीततज्ज दगडाप्रमाणे अचल राहिले.

त्यांच्या तोंडावरची सुरकुती हलली नाही, की रसिकतेची कुठली पावतीही त्यांनी मान हलवून दिली नाही. सर्व सभा या तऱ्हेवाईक माणसाला शिष्ट समजून- " हा टिक्काराव नसून टिक्कोजीराव दिसताय." अशा अर्थाने पाहू लागली.

एकतीस डिसेंबर एकोणीसशे पाचची रात्र. त्या रात्री टिक्कासाहेबांपुढे भास्करबुवांचे गाणे झाले आणि पूर्वीचे सारेच हिशेब बदलून गेले. गाण्याच्या आवाक्याबद्दलची सर्वच गणिते तोकडी पडली. संगीताचे क्षितिज धुंडाळणाऱ्या या बैठकीला पं. सखाराम, पं. अर्जुनदास, पं. तुळाराम आदी जाणकार उपस्थित होते.

मा. खुर्षामहम्मद पेटीला, सखाराम व नंदभट्ट तंबोऱ्याला, मलंग खाँ तबल्याला होते. भास्करबुवा दरबारीचा 'तू करीम रहीम पाक परवर दिगर–' हा ख्याल गाऊ लागले. दरबारची– रसबाळी– रसरशीत– भारदस्त रागमूर्ती धीमे धीमे पदन्यास करू लागली. तशी ते जिवंत साक्षात्कारी गाणे ऐकून टिक्कासाहेबही आस्ते आस्ते जागा सोडून पुढे आले ते थेट भास्करबुवांसमोर येऊन बसले. आणि एकदम म्हणाले,

" तोलो– पंडित, मी अरसिक नाही. आता माझं मस्तक पहा डुलतंय की नाही ? मी आज मंत्रमुग्ध झालो. खूष झालो. यापुढे कोणाही गायकाला माझ्यापुढे गाण्याचा आग्रह करू नका. तुम्हीच त्यांचं गाणं ऐकत जा. मी पैसे देईन. यापुढे मी मात्र फक्त भास्करबुवांचेच गाणे ऐकणार."

तेवढ्यात बुवांनी समयोचित अशी–

" बांधो रे बांधो सबमिलके–"

ही चीज सुरू केली. तसे टिक्कासाहेब भारावून म्हणाले–

" बांधलं रे बांधलं. भास्करजींचं आणि माझं नातं आता जीवनभरासाठी बांधलं गेलं. मी बंदा झालो !"

थोर कलाकार अलिबक्षही दुसऱ्या एका बैठकीला उपस्थित होते. हा माणूस गाण्याला फाकडू असला तरी जिभेला आखडू होता. एखाद्याचं भलं व्हावं म्हणून पैसा खर्च करेल. पण भलं म्हणून शब्द खर्च करणार नाही. पण तोही माणूस हा गायकांचा राणा ऐकून उदारांचा राणा झाला. म्हणाला,

" लोक म्हणतात– अलिबक्ष कुणाची तारीफ करीत नाही. फार अभिमानी आहे ! वास्तविक हे लोक मला खूष करणारे गाणेच गाऊ शकत नाहीत.

अलीकडे अलीकडे माझी तर कल्पना झाली होती की ख्यालगायकी मरत

आहे. पण खुदाची मेहेरबानी की ती पंडीत भास्करबुवांच्या रूपात अजून जिवंत आहे.

ओहोऽऽ! काय गाणे ! स्वर्गानेही दिवाणे होऊन खाली झुकावे. ताऱ्यांनीही यांचे पायपोस व्हावे.

आता याच्या बरोबरीचा ख्यालगायक हिंदू पंडीतांत अगर खाँसाहेब लोकांतही मिळणार नाही. चारही अंगांनी– अत्युत्तम ढंगांनी सजलेलं गाणं भास्करबुवांच्या कलेत दिसतं. खुदा त्यांना उत्तम तंदुरुस्ती व दीर्घायुष्य देवो."

हे एका मुसलमान गायकाचे धन्योद्‌गार ऐकून त्यांच्याच काही जातभाईंचे चेहरे काळवंडले. कारण काही तत्कालीन मुसलमान गायकांत असा दुराभिमान होता की–

'तपश्चर्येचे, मेहनतीचे आणि रंगतीचे गाणे फक्त मुसलमानच पेश करू शकतो. हिंदू गायक ताला-सुरांशी खेळणारे यंत्र असतो. तो संगीतशास्त्राचे नियम लिहू शकेल, पण गाऊ शकणार नाही.

उलट रागनियमांच्या बंधनात राहून बंधनातीत नशा चढवावी मुसलमान गायकांनीच. हे काम हिंदू गायकाचे नव्हेच !'

पण भास्करबुवांनी स्वतःच्या लोचदार– कसदार– रसदार– मधुर– भावूक गायकीने या वेडगळ समजुतीला सुरुंग लावला. आणि स्वतःचा गानरंग या बुजुर्गांनाही मानायला लावला. नव्हे, चार-चौघांत बोलून दाखवायला लावला.

म्हणूनच कोणाला न मानणारे रजनअल्लीखाँही भास्करबुवांचे गाणे ऐकून तृप्तीत न्हायचे आणि म्हणायचे–

"हिंदूयोंमे एकही गवय्या पैदा हुवा. जिसे हम सब मानते है। वो है हमारा भैय्या भास्करबुवा."

कधी कधी भास्करबुवांच्या मागे बसायची संधी मिळाली तरी अलादियां खाँचे चिरंजीव मजीखाँ आतून टरकलेले असत. आणि उघडपणे म्हणत–

"भास्कर गाण्याने वडील म्हणून आमचा वडील बंधूच आहे. तो केवळ आमच्या वडिलांचीच गायकी गात नाही. तर फैजमहमदखाँ, नथ्थनखाँ, आमचे अब्बाजान आणि इतर अनेकजण यांकडून घेतलेले कलेचे दिव्य रसायन त्यांनी केलं आहे. आणि स्वतंत्र भास्करशैली तयार केली आहे."

नदीच्या मोठेपणामागे अनेक प्रवाह असले तरी तिची स्वतःची अस्मिता आगळी वेगळी असते. अर्थात हे स्वरांचे लेणे भास्करबुवांच्या गळ्यावर एका दिवसात चढलेले नव्हते. बडोद्याचे राजगायक फैजमहमद– म्हैसूर दरबारचे नथ्थनखाँ आणि कोल्हापूर दरबारचे अलादियांखाँ या कसबी सुवर्णकारांचा हात लागल्या.

मुळेच भास्करबुवांच्या कंठात बावनकशी सुवर्णाचा जडावाचा हार येऊन बसला. आणि बुवा स्वतःच रसिकांचे कंठमणी झाले. त्यांना लोकांनी डोक्यावर तर घेतलेच, पण कंठातही धारण केले.

बुवांच्या समृद्ध आणि सर्वस्पर्शी गायकीने महाराष्ट्रातल्याच नव्हे तर ते जेथे जेथे गायले, तिथल्या तिथल्या भारतीय श्रोत्यांचे श्रवण चोखंदळ बनले. मूल्य-मापनाची डोळस नजर श्रोत्यांना आली. अमृतसरपासून म्हैसूरपर्यंत अभिजात संगीताला अनावर भरती आली.

पंडित विष्णु दिगंबर पलुस्कर, बाळकृष्णबुवा इचलकरंजीकर, अलादियाखाँ, रहिमतखाँ, अब्दुलकरीमखाँ, रामकृष्णबुवा वझे, मियाँजान, अनंत मनोहर, बरकतुल्ला सतारीय्ये, हे महाराष्ट्रात रहायचे. आणि संगीत स्वाऱ्यांना भारतभर फिरायचे. पण आसेतू हिमाचल विजयाचे झेंडे रोवले या गानभास्करानेच !

गमनखाँ नावाचे कराचीचे एक गवई होते. त्यांची तीनही मुले गायक. त्यात तरुण वय. रियाजाची सवय. मोठ्या जोशात गात. स्वतःला मोठे समजत. पण वडील नेहमी मुलांना सांगायचे—

"मुलांनो, तुम्ही चांगले तयार झालात. मैफलीचीही नजर आली आहे. पण तुम्ही एकदा पं. भास्करबुवांना ऐकाच. गाणं कसं गावं हे त्या पंडीताकडून शिकावं. नव्हे, गाणं कशाला म्हणतात हेही तुम्हाला त्यांच्याचकडून कळेल."

हे पित्याचे भाषण ऐकून मुलगा मुबारकअली याला भयंकर राग आला. त्याने गुपचूपपणे कराचीच्या संगीत चालकांना भेटून बुवांच्या आधी आपले गाणे ठरविले. मुलाने आक्रमक पद्धतीने गाऊन मैफील काबीज केली.

त्यानंतर आता हा ब्राह्मणगायक काय उजेड पाडणार असे त्या तिघा भावंडांना वाटू लागले. पण स्वतः मुबारकअलीच मैफलीनंतर उद्गारले—

"पं. भास्करबुवांची ती उंच तेजस्वी मूर्ती बैठकीत येऊन बसली आणि तंबोरे वाजू लागताच एक प्रकारचे तेज त्यांच्या मुखावर झळकू लागले. ते जवारदार तंबोरे वाजू लागले तसतसा त्यांचा चेहरा प्रफुल्लित होऊ लागला. प्रसन्न मुद्रेने त्यांनी श्रोत्यांवर नजर फिरविली तेव्हा आमच्यासह सर्व श्रोते एका अज्ञात जादूने भारून गेले.

मला तर असं वाटू लागलं की, त्यांच्या चेहऱ्याभोवती एक तेजोवलय फिरते आहे. तंबोऱ्याच्या सुरात बुवांनी खर्ज मिसळला आणि हमीररागाची अस्ताई सुरू झाली.

"गुरझारही...ऽ..."

या अस्ताईत आमच्या तिघांचीही बुवांबद्दलची वैरभावना विलीन झाली. त्या प्रसन्नतेने आमचे हेवेदावे उडवून लावले.

अहाहा ! अस्ताईचा मुखडा बांधून, निषाद धैवतावरून एक अत्यंत मधुर मिंड घेऊन ते अशा रीतीने आले की, आम्हा तिघाही भावंडांच्या तोंडातून नकळत 'सुभानअल्ला ! ओऽहोऽ '– असे सहजोद्गार उत्स्फूर्तपणे बाहेर पडले.

आम्ही आब्बाजानकडे पाहिले. त्यांचे डोळे आषाढमेघ झाले होते. त्यांची डोलती मान बुवांच्या घाटदार अस्ताईत विलीन झाली होती.

पंडीतजींची स्तुती अब्बाजान का करत होते ते आम्हाला आज कळले ! बस्स, ठरवून टाकले, उद्यापासून पंडीतजी इथे आहेत तोपर्यंत त्यांच्यामागे हिंडायचे आणि त्यांच्या डोक्याला तेल रगडण्यात भूषण मानायचे... तेवढाच त्यांच्या विद्वान मस्तकाला स्पर्श..."

*

## पंधरा

भास्करबुवा जालंदर, अमृतसर, शिकारपूर दौऱ्याहून परतले की, लाडकी लेक माई त्यांना मालीश करायला धावे. म्हणे–

"आईनी सांगितलंय– तुझे अण्णा खूपखूप लांबून, खूपखूप दमून आलेत. चांगले चोळूनमोळून न्हाऊ घाल त्यांना."

आणि खरंच, रांगोळी घालून– कुंकवाची चिरी ओढून– पाट मांडून पोरीने बुवांचे डोके ताब्यात घेतले. तेव्हा त्यांच्यासाठी बदामाचा शिरा करणाऱ्या ताईंनाही मनातून हसू आले.

तोच लेक ओरडली–

"अय्या, अण्णा ! तुमच्या डोक्याला कसलातरी सुंदर तेलाचा वास येतोय आणि केससुद्धा चरचरीत– भुरभुरीत नाहीत. चांगले मऊमऊ झालेत."

शिरा उतरवून लगबगीने पुढे येऊन डोळे मिचकावून ताईंनी विचारले–

"प्रवासात असून केसांचं दोरखंड न होता रेशीम झालेलं दिसतंय. कुणाचे भाग्यवान हात स्वारीच्या मस्तकापर्यंत पोहोचले ते कळू दे तरी. केस मऊ झालेत म्हणजे हातही मऊच असणार !"

भास्करबुवा त्यांच्या मिस्कील शैलीत म्हणाले–

"तो एक किस्साच झाला."

" आम्हाला नाही सांगणार ?"

–लेकीच्या हातचा तेलाचा ताबा घेऊन तिला खेळायला पाठवून ताईंनी विचारले,

" सांगणार तर. तुम्ही आमची खाजगी मालमत्ता. तेव्हा तुमचीच आमच्या खाजगीवर सत्ता.

अहो, तापलेल्या उकळत्या तेलाचा सुवासिक– शीतल तेल झाल्याचा किस्सा आहे हा. ऐका–

कराचीचे गमनखाँ आमच्या गायकीवर फिदा. पण त्यांचे तिन्ही चिरंजीव आमचा मत्सर करावयाचे आणि आमच्या व गमनखाँच्या मैत्रीत बिब्बा घालायला टपायचे."

" अगोबाई, मग मित्रामित्रात मुलांवरून वैर आले की काय ?"

" छे ! उलट गाण्यावरून आलेले वैर गाण्यानेच संपविले. कराचीला ती मुले माझ्याआधी गायली. खूप तयारीने गायली. खूप जमवून गायली. पण पोरवय असल्याने तानाबिनांवर भर जास्त.

त्यांच्यानंतर मी गायला बसलो. तेव्हा तिघेही रानरेड्यांसारखे माझ्याकडे रोखून पाहात होते. डोळे गरगर फिरवीत होते. शिंगांनी भोसकायचेच राहिले होते.

पण आमच्या स्वरांनी काय जादू केली कोण जाणे ! अस्ताई-अतरा मांडायचा अवकाश– ते त्रिकूट शांत होत गेले. शेवटी तर जसे गरीब गाय झाले."

" एकूण ज्ञानेश्वरांनी रेड्याचा उद्धार केला तसा आपणही केलात म्हणायचा."

" अहो, मैफल संपल्यावर ते इतके खूष झाले की, त्यांनी आमचे पाय धरले. आणि हो, नुसते पायच नव्हे तर डोकेही धरले."

" डोके धरले, की उठवले ?"

ताईंनी खमाखसा डोके चोळीत विचारले, तसे भास्करबुवा म्हणाले–

" तुम्हाला आम्ही हळू चोळा असे म्हणणार नाही. पण त्या भावंडांना मात्र तसे म्हणायची वेळ यायची. अहो, उंची अत्तरमिश्रित तेल घेऊन मैफलीच्या दुसरेच दिवशी पंच पंच उषःकाले आमच्या वसतिस्थानावर आले नि म्हणाले–

" आम्ही आपल्या मस्तकाला मालीश करू ?"

" आम्हाला सवय नाही. सेवा घेण्याचा संकोच वाटतो."

चोळता चोळता ताई थांबल्या, तसे बुवा हसून म्हणाले–

" हे वाक्य आम्ही गमनखाँच्या चिरंजिवांना उद्देशून बोललो होतो. माईच्या आईला उद्देशून नव्हे."

" असं होय ? मला वाटलं... बरं, पुढे सांगा "

तसे चिरंजीव म्हणाले–

" बुवा, तुम्ही होवयास ताप करून घेऊन इतकं उत्कृष्ट गाता. आता तो ताप कमी व्हावा म्हणून आम्हाला थोडं मालीश करू द्या."

" नको, नको."

" नको काय ? तुम्ही मराठी मंडळी मालीश करून घेत नाही. आराम अंगी लावून घेत नाही. पण गुरुसेवेबद्दल आमच्या ज्या कल्पना आहेत, त्यांचा मान तुम्ही राखलाच पाहिजे."

" आणि आम्ही तो सर्व मुक्कामभर राखला–" असं म्हणून भास्करबुवा उठायला लागले, तशी ताई त्यांना खाली बसवून म्हणाल्या–

" डोकं झालं, पाठ कुठे झाली ?"

" नको, नको. दमलीस. घामाघूम झालीस."

" होऊ दे. आमच्यासाठी स्वारीने एकटयाने काय म्हणून घाम गाळावा ? त्या गमनखाँच्या चिरंजिवांप्रमाणे मीही बजावून ठेवते की, पतीसेवेबद्दल आम्हा भारतीय नारींच्या ज्या कल्पना आहेत, त्यांचा मान तुम्ही राखलाच पाहिजे."

आणि त्या दिवशीचे स्नान अगदी दिवाळीच्या अभ्यंगस्नानाच्या थाटात पार पडले. वडिलांच्या ताटलीतला बदामाचा शिरा खाता खाता छोटी आक्का मिटक्या मारीत म्हणाली–

" अण्णा, तुम्ही लोज लोज जालंदलहून येत जा. म्हणजे आमाला लोज लोज बदामाचा शिला मिलेल."

" तुला बदाम आवडतात ना ? मग ते भिंतीजवळचे गाठोडे सोड. म्हणजे बदाम खाऊही देईल आणि न्हाऊही घालील."

माई आणि आक्का– दोन्ही लेकींनी मिळून गाठोडे सोडले. तो ओहो ! बदाम– पिस्ते– आक्रोड– चिलगोझा– मुलींना काय खाऊ नि किती खाऊ असे होऊन गेले.

तोच भास्करबुवांचे वडीलबंधुतुल्य मित्र शंकरबुवा आष्टेकर आले. बुवा त्यांना नमस्कार करीत, ताईंना म्हणाले–

" अहो, शंकरबुवांना शिरा आणा हो."

शंकरबुवा नजर बारीक करीत– मुलींचा खाऊवरील हल्ला पाहत म्हणाले–

" खाऊ मुठी भरभरून सपवलात तरी चालेल. पण तिकडून आणलेला पैसा मात्र मुठी भरभरून उधळायचा नाही बरं का. बँकेतबिकेत ठेवायचे."

खाणे संपवून भास्करबुवा उठले आणि खुंटीवरच्या कोटाच्या खिशातली थैली शंकरबुवांच्या समोर करून म्हणाले–

" आपणच माझी बँक."

" ही बँक बुडाली म्हणजे ?"

"दगडाची बँक बुडते. हाडामांसाची बुडत नाही. तुम्ही ते जवळ ठेवायचे. लागतील तसे द्यायचे. तुमचे नाव आष्टेकर. तुमच्याजवळ असले की आठपट होतील."

"पण त्यातली एकपटसुद्धा तुम्हाला नव्हे, ताईंना मिळतील. तेसुद्धा सगळे नव्हे. थोडंफार सोनं घेणार आहे."

"इश्श ! मला सारे साज–अगदी बिंदीपट्ट्यासह केलेत हो तुमच्या बंधूंनी."

"हो. पण पदरी मुली आहेत. त्यांच्याही सालंकृत कन्यादानाची सोय हवी."

अम्मळशाने शंकरबुवा बुवांची हालहवालीची चौकशी करून थैलीसकट गेले.

शंकरबुवा आष्टेकर आणि भास्करबुवा यांचा बऱ्याच वर्षांचा ऋणानुबंध होता. वयाने लहान असलेले लोक शिष्य झाले होते. वयाने बरोबरीचे असलेले मित्र झाले होते. पण वयाने वडील असलेले शंकरबुवा वडीलबंधूच झाले होते.

यांचे घराणे मूळचे आष्टयाचे... म्हणून कुलकर्ण्यांचे आष्टेकर झाले. या घराण्यांत ध्रुपद गायनाची परंपरा वंशपरंपरागत होती. शंकरबुवांचे आजोबा विठ्ठलबुवा व त्यांचे पुत्र सदाशिवबुवा हे दोघेही पट्टीचे ध्रुपद गायक होते.

शंकरबुवा हे सदाशिवबुवांचे पुत्र. अठराशे आडुसष्ट सालचा त्यांचा जन्म. पित्याचे गाण्याचे गोत्रही ते संभाळीत. त्यांची थोराड देहयष्टी आणि मोठा आवाज ध्रुपद गायकीला शोभून दिसे.

संस्थान पर्वतो व संस्थान बेलबाग येथे शंकरबुवा गायक होते. पुढे पुणे गायन समाजात संगीत शिक्षक झाले. संगीताच्या रेशीम धाग्यामुळे भास्करबुवांचा व शंकरबुवांचा अकृत्रिम–निरपेक्ष–जिव्हाळ्याचा स्नेह फुलला. या गुंत्यातून दोघेही बाहेर पडले नाहीत. उलट उत्तरोत्तर अधिकाधिक गुंतत गेले.

भास्करबुवांचा शंकरबुवांच्यावर कमालीचा विश्वास होता आणि पराकाष्ठेचा जीवही होता. आणि तो तसा असावा अशी शंकरबुवांची योग्यताच होती.

शंकरबुवांचे विशेष म्हणजे पर्वती आणि बेलबाग संभाळून ते भास्करबुवांचीही पुणे आणि मुंबई दोन्ही ठिकाणची देखभाल करीत. आश्चर्य म्हणजे शंकरबुवांच्या भिवईचा बाक भास्करबुवांना धाक दाखवी ! भास्करबुवांच्या मनात या मानलेल्या बंधूबद्दल आदरयुक्त भीती वास करत होती.

भास्करबुवांच्या भगिनी विधवा तान्हुबाई यांचा मुलगा गणपती मिळवता झाल्यावर आधार वाटावा म्हणून शंकरबुवांनी आपण राहात असलेल्या पुण्यातील फरशीवाले साठ्यांच्या वाड्यातच तान्हूताईंना जागा घेऊन दिली. आणि बुवांची काळजी वाचवली.

त्याचप्रमाणे पुण्याला आल्यावर हक्काने उतरता यावे म्हणून त्याच वाड्यात त्यांच्या नावावरही हॉलवजा जागा घेऊन टाकली.

भास्करबुवा म्हणजे उदारांचा राणा होता. इतर गवय्या-बजवय्यांना मदत करण्याचा त्यांचा बाणा होता. त्यामुळे उत्तरेला मिळणारी बहुमानाची जरीची वस्त्रे– रेशमी फेटे बिटे इतराच्याच डोक्यावर जाऊन बसत. इतके बुवांनी काहींना डोक्यावर घेतले होते.

त्यातून भास्करबुवा संसारी असले तरी पित्याची संन्यासी वृत्ती जशी त्यांची वडिलार्जित संपत्ती होती. पैसे किती येतात–कुठे जातात– कसे संपतात याचा त्यांना कित्येकदा पत्ताच नसे.

अनेकदा शिष्यांना शाब्दिक जोडे न देता स्वतःच्या पायातले जोडे बक्षीस देणारा हा अजब नमुना होता. शिष्यही त्या पादुकांचा योग्य तो बहुमान ठेवी.

पण या दानापायी कधी कधी दात्यालाच अनवस्था प्रसंग ओढवे ! त्या धास्तीने शंकरबुवा आष्टेकरांनी या दानावर अंकुश ठेवण्यास सुरुवात केली. या विदेही–विरक्त कलावंताची उधळपट्टी थांबावी म्हणून व्यवहारदक्ष शंकरबुवा आपण होऊन पुढे झाले. जसे बुवांचे अलिखित खाजगी चिटणीस झाले.

शंकरबुवा स्वतः त्यागी वृत्तीचे होते. भोगी नव्हते. पण हिशेबी होते. त्यामुळे एखाद्या सरकारी तिजोरीत राहावी तशी भास्करबुवांची मिळकत निःस्पृह शंकर-बुवांच्या घरी सुखरूप राहिली. त्यांनी बुवांचे पुण्याचे बिऱ्हाड आपल्याच वाड्यात मोठ्या दूरदर्शीपणे ठेवले. बुवा पुण्याच्या आणि सुहृदांच्या ओढीने लवकरच पुण्याला स्थाईक झाले. तरीही शास्त्रीहॉलमधली जागा ठेवण्यात आली.

बुवा पुण्याला आले की शंकरबुवा पर्वती पहाटे उरकीत आणि बुवांना घेऊनच बेलबागेत जात. बेलबागेचे मालक फडणीस आणि पुजारी जोगळेकर तसेच शंकरभैय्या तबलजी यांचा घरोबा याच काळातला.

भास्करबुवांच्या वर्तनावर शंकरबुवांची घारीची नजर असे. उगीच वारेमाप खरेदी न व्हावी– दानधर्म फाजील न व्हावा– भोळसटपणे कुणावर पैसा न उधळला जावा म्हणून डोळ्यांत तेल घालून काळजी घेत.

पण भास्करबुवारूपी दिग्गजाने हा अंकुश मानला होता. उलट हे असे वर्चस्व त्यांना सुखावहच वाटले होते. आणि तेही सारे मानधन या इमानी मित्राजवळ सुपूर्द करीत. शंकरबुवा तो पैसा सोन्यात अडकवीत. मात्र त्यांच्या पौष्टिक खाण्या-पिण्याबाबतही लक्ष ठेवून दक्ष राहात. जसा श्रीकृष्णाला हा बळरामच लाभला होता.

शंकरबुवा जसे साधे– निर्व्यसनी– संगीतप्रेमी. तसेच भास्करबुवा होते. म्हणूनच उभयतांच्या कुंडल्या जमल्या होत्या. दोघांना जवळ घेऊन आल्या होत्या.

कधी कधी परस्परांवर निरपेक्ष माया करणारी माणसं दिसली की वाटतं– हे संबंध या जन्मीचे असले तरी ऋणानुबंध मागील जन्मीचे तर नसतील ? हे साधे

पांच-पंचवीस वर्षांत जोडले असतील, पण लागेबांधे पूर्वजन्मीचे तर नसतील ?

नाहीतर शंकरबुवांनी भास्करबुवांची निरपेक्ष देखभाल का करावी ? आणि भास्करबुवांनी डोळे मिटून– विश्वास टाकून ती का करून घ्यावी ?

एकदा एका डिसेंबरमध्ये जालंदर–अमृतसर–शिकारपूरच्या संगीत स्वारीला भास्करबुवा निघाले. पण सर्दीपडशाने जेंजारले. बरोबर गणपत पुरोहित होते. मणेरीकर मास्तरही होते. पण त्या अनभिज्ञ शिष्यांवर मदार टाकून अंगात कण-कण असलेल्या बुवांना दूरदेशी धाडायला ताईंचे मन घेईना.

त्यांनी मुंबईहून पुण्यास माणूस पाठवला आणि शंकरबुवांना बोलावून घेतले.

शंकरबुवा हातातली कामे टाकून– बेलबाग-पर्वतीला बदली देऊन, शिकवण्या बंद ठेवून– राजाज्ञा मानावी तितक्या तातडीने दुसऱ्याच गाडीने मुंबईला आले. भास्करबुवांबरोबर उत्तरेला गेले, तेव्हा ताईंचा जीव भांड्यात पडला.

स्टेशनवर जाताना देवाला नमस्कार करायला भास्करबुवा स्वयंपाकघरात गेले तशी ताईंच्या कानाशी लागून म्हणाले–

"तुमचे आखाडसासरे बरोबर आहेत. आता या उस्तादाला आखाड्यात उतरायला राणीसाहेबांची परवानगी आहे ना ?"

"आपण आहात भिडस्त गृहस्थ. आजारी आहोत हे विसरून नेहमीप्रमाणे बादल्यावारी गार पाणी डोक्यावर घ्याल. तिकडच्या गारठ्यात हिंडाल. अलाणा भेटला कराल. आणि तब्बेत पुन्हा बिघडवून बसाल."

"म्हणून या हत्तीवर हा अंकुश काय ?"

गालातल्या गालात हसत ताईंनी बुवांच्या हातावर सायीचे दही ठेवले. ते चाटून पुसून फस्त करत भास्करबुवा म्हणाले–

"निरोपाच्या वेळी ही दिव्य औषधी गळ्याला लपेटल्यावर काय टाप आहे गळा काम देणार नाही ? एका माणसाचे हात मुलायम की सायीचे दही मुलायम."

"पुरे पुरे. मामंजी टांग्यात जाऊन बसले सुद्धा."

आणि बुवांची स्वारी उत्तरेला रवाना झाली.

जालंदरहून खणखणीत गायन उरकून ठणठणीत तब्बेत करून बुवा परतले. त्यांना ताईंच्या ताब्यात देऊन शंकरबुवा आष्टेकर जे नाहीसे झाले ते पुढे आठ दिवसांनीच उगवले.

त्यांना पाहाताच भास्करबुवा डोळे मिचकावून म्हणाले–

"हे काय येणे झाले ? खट्याळ बालक पालकाच्या स्वाधीन करून शिक्षक सुटला काय ?"

शंकरबुवा ताईंनी पुढे केलेले चांदीच्या पेल्यातले दूध पिऊन उपरण्याने भरघोस मिशांना लागलेली साय पुसीत म्हणाले–

" तुमच्या कमाईतली पाऊण कमाई घेऊन पळालो होतो. म्हणून पोलीस चौकीवर वर्दी नाही ना दिली कुणी ?"

ताई हसून म्हणाल्या–

" रक्कम घरी राहाती तर चोरापोरी गेली असती. त्यापेक्षा आप्टेकरांच्या पेढीवर ती आहे तेच बरं. तिथेच सुखरूप आहे."

तोच आक्का आई आणि माई शंकरबुवांचा आवाज ऐकून खेळ टाकून धावत आल्या.

" आजोबा, आम्हाला बेलबागेतला प्रासाद द्या ना."

म्हणून दोघींनी दोन्हीकडून शंकरबुवांना विळखे घातले. तशी हसून शंकरबुवा म्हणाले–

" आज मुठीत द्यायचा नव्हे तर दंडात घालायचा खाऊ घेऊन आलोय. हा पहा."

हे वाक्य कानी पडताच मुलींचेच नव्हे, तर मुलींच्या आईचेही कुतूहल जागे झाले. दुधाचा पेला घेऊन त्या तिथेच थांबल्या. तोच शंकरबुवांनी खिशातून नव्या-कोऱ्या सोन्याच्या वाक्या काढल्या. आणि दोन्ही मुलींच्या दोन्ही दंडांत अडकवून टाकल्या.

पोरी खूष होऊन खाऊ विसरून 'मैत्रिणींना दाखवून येतो' म्हणून पळू लागल्या. तशी ताई त्यांचे परकर ओढून म्हणाल्या–

" देवाला– आजोबांना आणि अण्णांना नमस्कार करायचा नि मग बाहेर जायचे."

तशी शंकरबुवा हसून खिशातून ताईच्या मापाचे शिंदेशाही तोडे काढून म्हणाले–

" आज मुलींनाच काय पण त्यांच्या आईलाही नमस्कार चुकणार नाही."

भास्करबुवा गहिवरून म्हणाले–

" माझ्या मुलींच्या लग्नाची तयारी माझा हा वडील भाऊ आत्तापासून करू लागल्याने केवळ कन्यादान करण्यापुरता वेळेवर मांडवात आलो तरी काळजी नाही."

*

# सोळा

'प्रिय मणेरीकर मास्तर यांना,

गणपत पुरोहितचा सप्रेम नमस्कार. वि. वि.

तुम्ही हरिवल्लभ समाधीसमोरच्या भास्करबुवांच्या पहिल्या मैफलीचे साक्षीदार. लाखोंच्या हृदयसिंहासनावर विराजमान झालेली गुरुमूर्ती पहाणार. पाठीमागे तंबोरा छेडणार. त्यामुळे गाण्या-नंतर गुरुजींवर झालेल्या फुलांच्या अविरत वृष्टीतील चार पाक-ळयाही अंगावर झेलणार.

त्यातच साथीचे भाई बसाव्वांचे हार्मोनियम वादन आणि झेंडेखानचे सारंगीवादन पूरक झाले असणार. ( बाकी बुवा लहानांना सुद्धा संभाळून घेणार. )

सारांश त्या पहिल्यावहिल्या यशाचे पवाडे येता-जाता आमच्यापुढे गाता नाही का ? आमचा तो हुस्सेनी चुकला– शंकर हुकला म्हणून टुकटुक करता नाही का ?

म्हटलं महाराज, यंदा मी बुवांची पाठ सोडलेली नाही. त्यामुळे उत्त-रेला गेल्यावर आपल्याला गिरगावच्या लहानग्या खोलीत शिकवणारा हा गुरू केवढ्या खोलीचा आहे याची कल्पना येत आहे.

गोरेगांवकर आणि शास्त्रीहॉलच्या चाळींनी– त्यांची उंची मोजणाऱ्या महाभागांनी हिमालयाच्या फुटपट्टीने त्यांची उंची मोजायला हवी– हे या दौऱ्यात त्यांची पाठशिवण केली तेव्हा समजले.

झलक म्हणून त्यातले थोडेफार किस्से लिहीत आहे.

ओहो ऽऽच ! अहो इकडे भास्करबुवांना फक्त गायक म्हणून पहात नाहीत तर नायक म्हणून पाहतात. का नाही पाहणार ? संस्कृत वाङमयातील नायकाचे उदात्त–उदार–धीर–वीर–रूपसंपन्न–विद्या-संपन्न अेवंगुणविशिष्ट आपले गुरुजो नाहीत काय ?

अहा, परवा विलक्षणच घडले. जालंदरच्या समाधीसमोरचे वार्षिक गायन झाले, आणि जादूची पुंगी ऐकून नाग भारावून जावा तसे श्रोत्यातले बोटेखाँ भारावले, सभेसमोर ताडकन् उभे राहिले, आणि उत्स्फूर्तपणे घोषणा करून गेले–

" आज ऐकलं तसं भास्करबुवांचं सर्वांगसुंदर गायन पुढच्या शंभर पिढ्यापर्यंत पुन्हा ऐकायला मिळणार नाही."

आणि पुढचं आक्रित ऐका–
अंगावर लिहितानाही रोमांच उठताहेत. मग तुमच्या अंगावर वाच-ताना का नाही उठणार ?
रागदारीत श्रोतृसमुदाय बुडाल्यावर भास्करबुवांनी मध्यरात्रीचा शांतीदरबाराचा सरदार मालकंस सभेत आणला.
' सा ऽऽऽऽऽ सुंदर बदन के मौदन दीपन. '–
यातला पहिला ' सा ' शब्द जमकाच्या झुल्यावर बसून आला मात्र, सारी सभाच जशी आपली जागा सोडून त्या झुल्यावर जाऊन बसली. जोड म्हणून एखादी बोजड चीज न म्हणता स्थलकाल जाणून गुरु-जींनी भजन काढले–

' प्रकट भयो भगवान प्रभुजी–
नंदाजी घर नौबत बाजे
ताल मृदुंग करताल प्रभुजी–१
सबही राजे मीलन आवे
छांड दिये अभिमान प्रभुजी–२
मीरा के प्रभू गिरीधर नागर
निसदिन धरीजे ध्यान प्रभुजी–३ '

हे भजन सुरू करताच साऱ्या सभास्थानाचेच मंदिर होऊन गेले... शब्दांचे रूप घेऊन वीणाधारिणी मीराच गाऊ लागली. नाचू लागली... अरे, मालकंस असा आभाळाला भिडला तेव्हा आभा-ळात पहाट आपला रंगाचा खजिना घेऊन हा रंग पहायला आली. तुमच्यागत चित्रकार असतो तर चित्रच चितारले असते. आता केवळ शब्दचित्र चितारतो. समाधान मानतो.
ते भजन संपताच काय घडले असेल ? कल्पना येतीय् ! नाहीच येणार !
अलियाफत्तु–मियाँजान–अलादियामेहेरमान–भाई मोती आणि तान-रसखाँच्या पुत्रांची वर्षानुवर्षे साथसंगत करणारे– आणि आजही साथीत बसलेले सारंगीनवाझ उस्ताद झेंडेखाँ ताडकन् उठले. अश्रू ढाळीत विनम्रपणे वाकले. आणि गुरुजींच्या चरणावर त्यांनी आपली सारंगी देवाच्या चरणावर पुष्प वहावे तशी वाहिली !
तरी गुरुजींनी विनयाने ती पुन्हा त्यांच्या हाती देऊन म्हटले–
" हा प्रणाम मला नसून स्वरांचे अवगुंठन घेऊन आलेल्या संत मिरा-बाईंना आहे. "

अहो, उस्ताद झेंडेखाँ. तसाच एक भाबडा काणा झेंडेखाँ पण आहे बरं का. तो बुवांवर इतका फिदा आहे की प्राण आदा करायचेच बाकी राहिले आहे.

त्याच्या गळ्यातही भिमपलास– मुलतानी–तोडी वगैरे राग आहेत हं. आणि विशेष म्हणजे त्या स्वरांच्या परडीतून तो रोज गुरुजींना एक काव्यगुच्छ घेऊन येतो. झलक द्यायची तर–

'भास्कर तू जगदा गुरू है ।
भास्कर गाणेदा जादू ।
फुलदा फलदा रवे ॥ '...

–असे काहीतरी गातगातच तो बुवांकडे येतो. पण बुवा पडले समतादर्शी ! छोटया मोठ्यांची सारखीच जपणूक करणारे. त्यामुळे एखाद्या खाँसाहेबाप्रमाणे या आशीर्वादाचीही बुवा कदर करतात. तो आला की बुवा हातचे काम सोडून बाहेर येतात. आणि स्वागत करतात–

" आईये झंडेखाँ. "

नाहीतर आम्ही ! कुणीतरी साधारण आले तर तिकडे काणाडोळा करणार. उलट गुरुजी साक्षात् काणा झंडेखाँ समोर आला, तरी वागण्यात संक्षेप नव्हे, साक्षेपच करणार!

अहो, गुरुजींच्या शिकवणीच्या वेळी उमगलेले अनेक गुण त्यांच्या संगतीला राहून समजले. बुवा हजरजबाबी आणि विनोदीही आहेत बरं का.

परवा सकाळच्या बैठकीत बुवांनी–

'म्हारे डेरे आवो, आवोजी महाराजा.'

ही चीज अप्रतीम रंगवली. एकदम अफलातून! ती धून हे लिहितानाही कानात रुंजी घालतेय. एकीकडे देसीतली ती चीज उमलत होती. आणि दुसरीकडे सकाळही उमलत होती. जसे दोन्ही भास्कर एकदमच उदयाद्रीवर आले.

गाणे संपल्यावर आम्ही आमच्या उतरण्याच्या बंगल्याकड निघालो तशी एका पंजाबी रसिकाने हात जोडून विचारले–

" पंडितजी. मारे डेरे कब आओगे ?"

तो रसिक प्रश्न ऐकून बुवांनी मार्मिक उत्तर दिले–

" मैं जिस वक्त आउंगा, वो नदी नाव संयोग समझो !"

आमचा मुक्काम रामतलाईच्या बाजूच्या खोलीत आहे. व्यवस्था चोख आहे. शेजारी विहीर आहे. विहिरीला मोट चालू असते. बुवा पहाटे

मुखमार्जन उरकून मोठेच्या पाण्याखालीच थंड पाण्याने मनमोक्त स्नान करतात. पूजा-पाठ नित्य करतात.

आम्ही रात्रीच्या जागरणाने उबदार दुलयांत लोळत असतो. न्याहारीला आलेल्या मिठाईच्या आणि आटीव दुधाच्या वासानेच जागे होतो. बुवांचे गाणे ऐकून आमच्या गाण्यात वजन येण्याऐवजी बुवांचे खाणे खाऊन आमच्या शरीरात वजन येत चालले आहे.

सावधान ! तुमच्या घरी येऊ तेव्हा तमाच वजनदार नाश्ता आम्हाला मिळाला पाहिजे. उगीच हलका-फुलका नव्हे.

इथला संगीत मेळावा पौष शुद्ध द्वादशीपासून पुनवेपर्यंत. त्यामुळे थंडी कडक आहे. तरीही जाणवत नाही. कारण भोवती वीस अग्निकुंडे रात्रंदिवस प्रज्वलित असतात. बैठकीखालीही कोरडे गवत पसरलेले असते. उसाची वाळकी चोयही असते. (एखाद्या गायकास जात्या गोडवा नसल्यास उसन्या गोडव्याचीही सोय असावी.)आवाज तापाय-लाही हाताहातावर शेगड्या असतात त्या वेगळ्याच.

पण भोवतालच्या या ज्वलंत वेढ्यातही बुवा कधी तापलेले पाहिले नाहीत. लौकिकवान गायक आणि सिद्ध गायक यांतला फरक इथेच उमगला. 'कानामागून आला नि तिखट झाला.' असे वाटून की काय कुणी नावाजलेला बुवांच्या अनुपस्थितीत त्यांच्या विरुद्ध काही तरी बोलला. बुवांच्या हे कानी आले. पण ते कानाबाहेर टाकून त्यांनी चीज सुरू केली–

"विद्याधर गुणीयन सो कां करीये !
गुणीयके चरणन धरीये ॥"

हे ऐकून श्रोतेच त्या बुवांवर जळणाऱ्या कलावंताला म्हणाले–

"अरे ए, ऐकलेस का ? जा बुवांच्या पाया पड."

आपण बुवांजवळ विद्या शिकतो. कोण पुढे जातो म्हणून एकमेकांत मनोमन स्पर्धाही लावतो. पण बुवांच्या चोवीस तासांच्या सहवासात त्यांची शालीनता– त्यांची सहनशीलता आणि स्पर्धाहीनता प्रत्ययाला आली आणि थक्क झालो.

गंमत अशी की बुवांना स्पर्धा माहीत नसली तरी आपल्यापुढे या संगीसम्राटाचे गाणे व्हावे म्हणून अनेक राजा-महाराजांत चुरस लागलेली असते बरं का.

काश्मीरचे कौल घराण्याचे राजे– आणि मंडी संस्थानची निमंत्रणे आली आहेत. पतीयाळाचे महाराजांनी तर एका गाण्यासाठी बोलावून

ओळीनी दहा गाणी केली. दशहरा उत्सवच जमा. कोटीचे महाराज बुवांना काय म्हणतात माहीत आहे ?

" गायन सीमा....

गायन क्षितिज... "

किती सार्थ बिरुद आहे नाही ? आपल्या बुवांच्या गाण्याला सीमा माहीत नाहीत. म्हणूनच लोक त्यांच्यावर नि:सीम भक्ती करीत असतील काय ? आणि क्षितिज नावही किती सार्थ ? कारण शिष्यांना हे क्षितिज जवळ आले असले तरी प्रत्यक्षात अनेक योजने दूरच असते. बुवांचे गाणे ऐकता ऐकता त्यांचे किस्सेही ऐकण्यासारखे असतात. जम्मू-कश्मीरचे राजगुरू पंडीत परवा बुवांचे गाणे ऐकून म्हणाले—

" भास्करबुवांच्या गाण्यांत मंदाकिनी वहातेय, त्यांचे गायन ऐकताना वाटते की आपण जणू सौंदर्याच्या नदीत विहार करीत आहोत. अशा पुरुषोत्तम– कलोत्तमांच्या आश्रयानेच कला जीवन जगते. कला जिवंत रहाते."

केवढा जाडा अभिप्राय हो. एखादा काश्मीरी पंडीतच देऊ जाणे. अशा विभुतीच्या प्रभावळीत आपण आहोत हे केवढं भाग्य. असं पदोपदी जाणवत आहे.

सर्व दोस्तांना हे पत्र दाखवावे. प्रत्येकाला वेगळे लिहून माझ्या वेळेची खराबी करत नाही.

ते बघ— गुरुजींचे जोडे वाजू लागले, तयार नसलो तर जोडा मिळायची भीती नसली तरी आपली आपल्याला लाज आहेच की.

तुझा,

गणपत पुरोहित. '

पुढील वर्षी मणेरीकर मास्तरांना जायची संधी मिळाली तेव्हा गतवर्षीच्या लंब्याचवडचा पत्राला तेवढेच उत्तर लिहून गणपत पुरोहितचा बरोबर वचपा काढला—

' श्री. गणपत पुरोहित यांस,

मणेरीकर मास्तरचे दंडवत.

म्हटलं महाराज, काही दिवस सासूचे नि काही दिवस सुनेचे हे विसरू नका. म्हटलं, गतवर्षी जालंदरहून लांबरुंद पत्र लिहून आमचं तोंड बंद केलंत काय ? ठीक आहे. जालंदर आहे तोवर बुवा रहाणार. आणि बुवा आहेत तोवर दमदार किस्सेही असणार. म्हटलं, आमच्याही पडशीत काही उत्तम चिजा आहेत. (गळचांत नसल्यातरी.)

अरे परवा एक दिवस बुवा गायला बसले तर नेहमीचे सारंगीनवाझ झेंडेखाँ नव्हते. म्हणून मंगुखाँना बोलावण्यात आले. तो माणूस शिष्ट. गायकापेक्षा स्वत:ला मोठा समजतो. बुवा तब्बेतीने ' सुंदर सुरजन मतवाला. ' ही मुलतानीतली चीज गाऊ लागले तर हा साथीने मैफल रंगवण्याऐवजी बिघडवू लागला. मनचेच काहीच्याबाही वाजवू लागला.

साथ पूरक न होता मारक होत चाललेली पाहून तबलानवाझ उस्ताद मलंगखाँ म्हणाले, "तू आपलंच वाजवतो आहेस. साथ म्हणजे तुझा सोलो नाही. एखादो महाराजांचीही हरकत दाखव ना."

या बोलण्याला मंगुखाँनी लांबलचक तान वाजवून उत्तर दिले.

" बघ, मला तबलजीशीही मुकाबला करता येतो."

तबलजीचा सारंगीवाल्याने भर मैफलीत अपमान केलेला पाहून बुवा पेटून उठले. या भास्कराने मध्यान्हीच्या चंडांशुचा अवतार धारण केला. अन् अडीच पटीतली तान घेऊन फर्मावले–

" मंगुखाँ, वाजवा हा पलटा."

कसली तान वाजवतोय ! कप्पाळ ! मान खाली घालून तो नि त्याची सारंगी दोन्ही गप्प झाले.

अरे एकदिवस आम्हालाही कानपिचक्या मिळाल्या. मी नि दुसरा तंबोरेवाला गाणे ऐकण्याच्या नादात जोरात तंबोरे वाजवू लागलो. तशी म्हणाले–

" मुलांनो, आज मला माझीच आठवण झाली. एकदा हा भास्कर बीनकार बंदेअलींच्या मागे जोरजोरात तंबोरा छेडू लागला. तशी गुरूंनी सुनावले–

" लोक बीन ऐकायला आलेत. तंबोरा नव्हे, "

लेकी बोले सुने लागे. आमचा हात चट सुरावर आला.

बाबा रे– श्रोत्यांनी परवा एक दिवस धमालच केली. पंडीत तुळारामजी इथले उत्सवप्रमुख. नेहमी लौकर येणारे. व्यवस्थापक या नात्याने सभेची देखभाल करणारे, पण त्यांना यायला उशीर झाला.

सभेचा अदमास घेत मागेच गाणे ऐकत राहिले. तोच बुवांचा हात-खंडा– हुकमी ' अडाणा ' सुरू झाला. ' मुंदरी मोरी काही को छीन लयी '– ही चीज रंग भरू लागली. श्रोते गानसमाधीत चूर झाले. मग तुळारामजींनाही राहवेना. ते दाटीवाटीतून वाट काढीत रंगमंचाकडे येऊ लागले.

त्यांना न ओळखणाऱ्या नवीन श्रोत्यांना ऐन रंगात हा भंग आलेला आवडला नाही. ते तुलारामजींना मारपीट करू लागले. कसली गड-बड आहे हे लक्षात येताच बुवांनी गाणे थांबवले. ते जागेवरून उठले. बडे रेशमी पागोटे– लोकरीचा लांब सदरा– घोटयापर्यंत धोतर– अंगावर शाल– होशियारपुरी चढाव आणि किंचित कुबड असलेली ही मूर्ती बुवांनी हाताला धरून जवळ आणून बसवली. आणि परत दुप्पट उत्साहात अडाण्याचीच सुरवात केली– 'मुंदरी मोरी काही को' आणि अप्रतिम रंगवली.

गाणे संपल्यावर तुलारामजी तृप्तीचे ढेकर देऊन म्हणाले–

"आजचा अडाणा अद्‌भुत ! नितांत सुंदर... आनंददायी... उत्साह-दायी."

बुवा हसत म्हणाले–

"पण त्यासाठी आपणास थपडा खाव्या लागल्या."

तुलारामजी पटकन उत्तरले–

"न सुखं दुःखैर्विना लभ्यते। चालायचेच..."

हळवे बुवा चुकचुकले–

"चालायचंच काय ? माझ्यामुळे एका थोर माणसाला थपडा बसल्या. ठीक न गाऊन चालेलच कसं ? तो मार मलाच लागत होता ना."

अरे संगीत हे धर्माचे नव्हे तर आत्म्याचे असते. बंधनातीत असते. 'सत्यं– शिवम्– सुंदरम्–' या त्रिमूर्तीच्या आविष्कारासाठी जन्माला आलेले असते याचा विलक्षण प्रत्यय बुवा–

'हजरत ख्वाजा संग खेलिये धुमार'

–हे भजन सुरू करतात तेव्हा इस्लामधर्मीयांना येतो.

'डोलत मांडे घर आमीवे'

–ही पंजाबी भाषेतली धून शीखधर्मीयांना मान डोलायला लावते. मग पाहुण्यांच्या सरबराईत राहून गेलेले घरचेच हिंदू अपेक्षेने पाहू लागतात तोच– 'भज रघुवीर श्याम युगुल चरण–'

हे भजन सुरू होते आणि रघुनाथाऐवजी रघुनाथपुत्राचेच चरण धरायला लोक धावतात.

भजनाची सात्त्विक धुंदी इतकी चढली की काल फुलांबरोबर सुवर्ण-मुद्रांचीही वृष्टी करण्यात आली. आम्ही हावरटासारखे पाहत राहिलो. जागेवरच चुळबुळत राहिलो.

पण गानयोगी बुवांनी नाण्याला स्पर्श केला नाही. उलट म्हणाले–

" रसिकांनीच माझे गाणे फुलवले. म्हणून त्यांचाच या दृष्टीवर अधिकार !"

कलेच्या संपत्तीपुढे ऐहिक संपत्तीबद्दल केवढी ही उदासीनता ! मनाची उदात्तता !! अरे या मनाच्या उंचीची परिसीमा नुकतीच पाहिली आणि माझ्या मनातली गुरूची प्रतिमा विश्वातल्या कुणाचाही हात न पोहोचावा इतकी उंचावली.

हल्ली हरिवल्लभ मेळाव्यात सर्वोत्तम कलावंताला बहुमोल बनारसी पटका आणि सुवर्णपदक देण्यात येते. हा मान गेली अनेक वर्षे भास्करबुवा मिळवत आहेत. पण या चोवीस डिसेंबरला स्वतःसाठी आणलेले पदक तुलारामांकडून घेऊन ते पं. विष्णू दिगंबर पलुस्करांच्या कोटावर लटकावू लागले व विनयाने म्हणाले–

" हा बहुमान आपल्यालाच शोभतो. कारण आपल्या गुणग्राहकतेमुळेच पंजाब मला जोडला गेला."

अखेर दोघेही ऐकेनात. तेव्हा बुवांनी ते पदक निक्का सुवर्णकारांना अर्पण करून टाकले.

बाकी मागची सुवर्णपदकेही त्यांनी अर्पणच तर केली आहेत.

तुला आठवतं ? मागच्या सुवर्णपदकांची कोटावर पालखी न मिरवता आपल्या सर्व शिष्यांना अंगठ्या वळी वगैरे करून बुवांनी या सोन्याची खैरातच केली आहे. दूरच्या आप्तेष्टांपर्यंत हा प्रसाद पोहोचला आहे. मी याबद्दल छेडले. तशी म्हणाले–

" मणेरीकर– सर्व धनांत कलाधन श्रेष्ठ आहे. कारण ते आत्मा परमात्म्यांची– जिवाशिवांची भेट घडवून आणते.

" सुवर्णपदक धारण करून आत्मगौरव करून घेताना आत्मवंचनाही होण्याचा संभव असतो."

" तो कसा काय ?"

" अरे बावन्नकशी सोन्याचे पदक छातीवर लावूनही प्रत्येक बैठक सोन्याच्या कसाला उतरेलच असे कुठलाही कलाकार छातीठोकपणे सांगू शकेल काय ?

उलट त्याचे गाणे पडले तर त्याच्या त्या सुवर्णपदकाची विटंबना मात्र होईल ! नावात गंधर्व आणि गाण्यात गर्दभ असा प्रकार म्हणजे संगीताचे विडंबनच !

खरं सांगू, माझ्या अस्मितेला माझी जमलेली बैठकच अलंकार वाटते.

देवी शारदेने मला बहाल केलेला..."

गणपत, अशा या दैवी स्वर्गीय कलेचा आस्वाद आबालवृद्ध घेऊ शकतात; पण एक हळवा रसिकवर्ग मात्र यात डावलला गेला आहे. इथे स्त्री जातीला गाण्याला बंदी आहे. रस्त्यानेही गोषा आहे. पडदा आहे.

मग त्यापेक्षा महाराष्ट्र किती पुढारलेला. किती भाग्यवान. गोमंतकीय शिष्या नुसत्या मैफलीत येऊन आस्वाद घेत नाहीत; तर ताराबाई शिरोडकर– अंजनीबाई मालपेकर अगर बापुतारा यासारख्या गायिका स्वतःच्या घरी मफली घडवून आणतात.

पण एका बाजूने पाणी रोखले तर दुसऱ्या बाजूने उसळते. आपली आपण वाट काढते. पंजाबी ढंगाचे काही गायक ख्यालाची ठुमरी करून टाकतात. पण मी इथे ठुमरीचा ख्याल झालेला ऐकला आणि विस्मयचकित झालो.

काल सराईतल्या मुक्कामी पख्वाजी मलंगखाँ यांची बिबी दसोबा मुद्दाम बुवांना फळे घेऊन आली. आणि पाया पडून डोळ्यांत आनंदाश्रू आणून म्हणाली,

"बुवासाहेब, आपले गायन मानवी नाही. दैवी आहे. आपल्या गाण्याची प्रत्येक मैफल मी न चुकता ऐकते."

"आऽऽ! ती कशी काय? इथे तर उत्सवात स्त्रियांना यायला मज्जाव आहे!"

–बुवांनी आश्चर्य केले! तशी दसोबा अभिमानाने म्हणाली–

"बुवासाहेब, औरतोंका कान फक्त झुबे घालण्यासाठी जन्माला आलेला असतो काय? त्याने आपले ईश्वरी गान ऐकून नये काय? असा बंडखोर विचार करून मी माझ्याच विचाराच्या चार स्त्रिया तयार केल्यात. केशसंभार फेटयात लपवून स्वतःला पुरुषी वेषात लपेटून घेतो. आणि मंडपाच्या मागच्या बाजूस अंधाऱ्या जागी बैठक मारतो. मैफील संपायच्या आत गुप्त होतो."

बुवा हसून म्हणाले–

"एकूण ठुमरीचा ख्याल होतो तर!"

"आपली कृपा."

बुवांनी या मायबहिणीचाही सुवर्णमुद्रिका आणि उंची वस्त्रे देऊन सन्मान केला. आणि ते भरून आलेल्या गळ्याने म्हणाले–

"वीणाधारिणी सरस्वती ही जर संगीताची देवता आहे– एकतारी

घेणारी साध्वी मीरा ही जर भजनांची उद्गाती आहे, तर अखिल स्त्रीजातीला संगीत श्रवणाचा जन्मजात अधिकार आहेच आहे.
मानवनिर्मित भेदाभेदांना दूर सारते आणि सर्वांना एकंकार करते तीच खरी कला. कलाकार असो, अगर आस्वादकार असो- धर्म- जाती- लिंग- वय- पैसा- प्रतिष्ठा इत्यादी विसरून कलानंदात बुडवणे हीच कलेची इतिकर्तव्यता."
दोस्त, त्या ठुमरीमुळे आपलेही कान धन्य झाले; सारे मनाच्या शिले-वर कोरले गेले. म्हणून तुझ्यापर्यंत पोहोचवले.
आता भैरवीवर येतो. या मुक्कामात मी बुवांची भैरवीची जुगलबंदी ऐकली. शहाण्याबरोबरची नव्हे. वेड्याबरोबरची.
'साई' म्हणून एक वृद्ध गायक- (सिद्ध की पागल? त्याचा तोच जाणे!) चिंध्या पांघरून- राख फासून- लंबाडी दाढी वाढवून- हातापायांच्या काड्या घेऊन जाणारा हा अवतार बुवांनी शोधून सराईत आणला.
ध्यान थंडीने कुडकुडत होते. तशी बुवांनी स्वतःच्या उंची लोकरी शालीने त्याला झट्दिशी लपेटून टाकले. ऊब येताच खूष होऊन साई करीम मोहक शैलीत गाऊ लागले-
"हरदम मेरे सामने रहता है."
-काय सांगू दोस्त. बुवांनी त्या वेड्याला स्फूर्ती यावी म्हणून आपलाही सूर त्या भैरवीत मिसळला. त्या उत्तेजनाने आपल्या कलेची पूर्ती हा रसिक करील असे वाटून त्यानेही भैरवीत विलक्षण रंग भरला. बुवा गातच राहिले.
साईची गाण्याची मुद्रा प्रेक्षणीय होती. नजर जमिनीवर खिळवून, लकेरी गळ्यापासून निघून जमिनीवरून वाहात आहेत असा आवि-र्भाव डावी तर्जनी करीत होती. आणि उजवा हात पैशासाठी पुढे झाला होता. त्या दिवशी बुवा कारुण्याने विचलित होऊन रडत होते, आणि एकीकडे गातही होते. बुवांनी त्या हातावर इतके बंदे ठेवले, की तो कलेचा बंदा फुलांनी गौर सजावी तसा न्हाऊन निघाला! अखेर भैरवी संपली. 'गुरू, गुरू' म्हणत साई निघून गेला. पोचली ना भैरवी?
गणपत-
ता वेडा आणि त्याच्या गाण्याने वेडावलेले भास्करबुवा पाहून माझीही अवस्था समर्थ शिष्य केशवस्वामी यांचेगत झाली-

" वेडियांचे गांवा गेलो
आम्ही वेडे होऊनि आलो ॥ ध्रु ॥
आता बोलू नका काही
आम्हा माणूसपण नाही !
कर्मवसन टाकून माचे
जगी उघडे होउन नाचे !
'केशव' म्हणे जवळी याल
तरी तुम्हीच वेडे व्हाल !!!"

राग फार लांबले तरी हे वेडगाणे संपवून समेवर येतो.

तुझा,
मणेरीकर."

*

# सतरा

चांगला गुरू मिळायला भाग्य लागतं तसंच चांगला शिष्य मिळायलाही भाग्य लागतं.

फैजमहम्मदखाँ, वंदेअलीखाँ, नथ्थनखाँ, अलादियाखाँ आदी गुरूंना भास्कर-बुवांनी स्वतःच्या शिष्यत्वाने धन्य केले होते.

त्यांचाच धडा घेऊन भास्करबुवा अनेक शिष्यांना संथा देत होते. अग्नी-होत्र्याच्या घरात जसा अखंड अग्नी असतो, तशी भास्करबुवांच्या घरात संगीताची ज्योत अखंड प्रज्वलित असे.

हा नंदादीप कधी गात तरी असे– शिकवत तरी असे, नाहीतर संगीताचे किस्सेतरी सांगत असे. प्रत्येक क्षणाच्या वाती संगीताच्या स्नेहात भिजून येत असत. भास्करबुवांच्या प्रतिभेने तेवत असत.

शिष्य भेटला नाही असा दिवस गेला, तर बुवाच सैरभैर होत असत. अशा-वेळी ताईंना कुणाचासा अभंग आठवायचा–

" चकोर भेटेना चंद्रमा वाळला ।
जीवीचा जिव्हाळा तोची जाणे ।
चंद्रमा भेटेना सिंधू ओहोटला
हृदीचा उमाळा तोची जाणे !

सागर भेटेना वहाळ आटला
अंतरीचा लळा तोची जाणे ।
वहाळ भेटेना मत्स्य तळमळला
मनीचा कळवळा तोची जाण !
भाविक भेटेना भाव हिरमुसला
भक्तीचा सोहळा तोची जाणे !
भाव तो भेटेना देव खंतावला
भरून ये गळा तोची जाणे !"

एका भल्या सकाळी बुवा शिष्यांची वाट पहात, तंबोरे काढून बसले होते. तोच परममित्र शंकरबुवांची स्वारी एका किशोरवयाच्या मुलाला आणि एका तरुण मुलाला घेऊन खोलीत शिरली. शंकरबुवांनी ओळख करून दिली–

"हे दत्तोबा फुलंब्रीकर आणि हा त्यांचा धाकटा भाऊ किशा फुलंब्रीकर. आणि हे–"

दत्तोबा एकदम हात जोडून म्हणाले–

"सूर्याची ओळख करून द्यावी लागत नाही."

"बरोबर. त्यांची स्वयमेव मृगेन्द्रताच आहे. बरं मी चलतो. बेलबागेत जायची वेळ झाली.

मुलगा होतकरू दिसतोय. न लाजता गोष्टी होऊ द्यात. माझा अंतरपाट मध्ये नको."

आणि शंकरबुवा पगडी नीट करीत– उपरणे सावरीत– पायातला जोडा चटचट वाजवीत निघूनही गेले.

दत्तोबा बुवांच्या पायावर पडले आणि पाठोपाठ ते भित्रे कोकरूही पाया पडले.

"बसा; बसा. निःसंकोचपणे बसा. काय काम काढलंत ?"

बुवांच्यां शब्दांनीच आधार येऊन दत्तोबा म्हणाले–

"हा माझा गानवेडा भाऊ किशा उर्फ कृष्णा."

"नाव कृष्णा आहे तेव्हा संगीताचं वेड बारशालाच सिद्ध झालंय."

हे ऐकून किशा खुद्कन् हसला. लाजून तोंडावर ओंजळ ठेवून बसला. दत्तोपंत पुढे म्हणाले–

"पोराला गाण्यापुढे शाळाही सुचेना. बाकी विषयांत टंगळमंगळ. कवितेच्या तासाला चंगळ. गुरुजींना विचारतो..."...

किशाच एकदम बोलून गेला–

"कविता म्हणण्यात पहिला नंबर देता आणि अभ्यासात नापास करता

काय ?"

"हरकत नाही. गाण्यात सुद्धा कविता असते. त्यात पहिला नंबर मार."

"त्यासाठीच आपल्याकडे आणलंय."

कृष्णाकडे निरखून पहात भास्करबुवा म्हणाले–

"मला वाटतं, या मुलाला मी कुठेतरी पाहिलंय. आठवलं. 'संत सखू'तला विठोबा ना हा ? आणि सखू मला वाटतं रामभाऊ कुंदगोळकर."

"अगदी बरोबर. विठोबाचं पद आपल्याला आवडलं होतं. म्हणून प्रयोग संपल्यावर आपल्या पायावर घातला होता. तेव्हा आपण म्हणाला होता–

"हा मुलगा गाणं शिकेल तर उत्तम गवई होईल."

किशाचा रुसवा पुढे आला–

"आम्ही कसले गवई होणार ? खरं म्हणजे गाण्यासाठीच नाट्यकला प्रवर्तक मंडळीत आईने आणि दत्तुदादाने चिकटवले."

"मग ती मंडळी सुरीली आहेत. कुंदगोळकरांचे गुरुजी अब्दुल करीमखां यांचा आवाज तर लाखांत एक आहे. कुठलीही रागिणी त्यांच्या गळ्यांतून येताना कारुण्याची विराणी शिंपत येते. त्यांच्याकडेच या मुलाचे अध्ययन का सुरू केलं नाही ?"

"खरं म्हणजे खाँसाहेबांनी काढलेल्या आर्य संगीत विद्यालयात मी जात येत असतो. अब्दुल करीम शिकवायलाही तयार आहेत, पण करार मदार करून."

किशाने मध्येच नाक खुपसले–

"आम्हाला नाही त्यांच्या क्लासात जायचं. नऊ वर्षांचा बाँड काय ! तयार झाल्यावर गुरुदक्षिणा काय ! नंतर तिथेच पाच वर्षे शिकवायचं काय. आम्हाला नाही शिक्षक व्हायचं. आम्हाला भास्करबुवांसारखं गायक व्हायचंय."

"अरे मग नाटकात काम करता करता कुंदगोळकरांकडे शीक."

"त्यांना शिकवायला वेळ कुठाय ? नुसते कबूल करतात आणि एकटेच गात बसतात."

"अहो, हे पोर मोठं धोरणी आहे. गुरूची तालीम ऐकायला मिळावी म्हणून त्यांच्या वाड्यातल्या वेलावर चढून वेल काढायचे नाटक करायचा."

"वाऽ ! म्हणजे नाट्य आणि संगीत दोन्हीत गती चालणार पुढे !"

"मग वाड्याच्या मालकांच्या– रानड्यांच्या हे लक्षात आलं आणि त्यांनी रामभाऊंना समज दिली. पण नाटकांच्या दौऱ्यामुळे जमेना हो."

"बरं बरं. आम्ही अटीशिवाय शिकवू. दौऱ्यात बरोबर येऊन शिकवू. घरी ठेवून घेऊन शिकवू. मग तर खूष ? फक्त मेहनत करायची. आणि सिद्ध करायचे की, शिक्षक नव्हे, तर गायक होण्यासाठी मी जन्माला आलो आहे."

असते.

कृष्णाचा ताल आरंभी कच्चा असे. त्यामुळे बुवा तबला बाजूला ठेवून शिकवताना हाताची बोटे या मात्रा कल्पून भास्करबुवा त्या हिशेबाने चीज व पलटे बसवून घेत. कृष्णाने कंटाळा केला तर रागावून त्याच्याच मांडीवर तालाच्या चापटया देत. बिचाऱ्याची मांडी हुळहुळी होई. पण त्याच वेळी ताल डोक्यात भिनत राही.

कृष्णा चलाख होता, बुद्धिमान होता, असे बुवांना लवकरच कळून चुकले. तो बुवांची सर्वांगपूर्ण गायकी उचलायचा प्रयत्न करे. पण अशक्त तब्बेतीमुळे गमक हा प्रकार झेपायला त्रास पडे. अशा वेळी बुवा प्रेमाने म्हणत–

" कृष्णा, जरा बेतानं, काही दिवसांनी ताकद वाढल्यावर तुला गमक झेपेल. कृष्णा, तू हुशार आहेस. पण तुझी छाती एक इंच व माझे गाणे एक फूट. जे तुला कसे झेपेल याची मला काळजी वाटते !"

आणि मग भिंतीवरल्या दत्ताच्या तसबिरीला नमस्कार करून बुवा म्हणत–

" गुरुराया, या लेकराला माझे गाणे पेलण्याची लवकरांत लवकर ताकद द्या."

गुरूसाठी प्रार्थना करणारे शिष्य अनेक असतील, पण शिष्यासाठी प्रार्थना करणारा असा गुरू विरळाच !

मोठ्या गुरूकडे शिकायला लागल्यावर मुलगा लवकर लवकर मोठा व्हावा, असे आईला नि भावाला वाटे. त्या दृष्टीने साठेवाडयात दत्तोबा हजर झाले. आणि विचारायला लागले–

" याचे राग किती झाले ? मैफल कधी मारणार ?"

बुवांनी ताडकन् समज दिली–

" ज्ञानाच्या रुंदीपेक्षा खोलीला महत्त्व असते. मग ते गायन असो, नाहीतर विज्ञान असो.

शालेय शिक्षणात अकरा अकरा वर्षं घालवता मग गाण्याला निदान तप तर द्या. तपश्चर्येविना कलेची देवता प्रसन्न होत नाही.

तुम्हाला त्याची काळजी वाटणं साहजिक आहे. पण तो तुमचा भाऊ असेल तर माझा मुलगाच आहे यात काय ते समजा.

इथून पुढे तो सावलीसारखा माझ्याबरोबर राहील. आणखी काही प्रश्न ?"

दत्तोबा वरमले. खाली मान घालून निघून गेले.

भास्करबुवा शब्दाला जागले. त्यांचे लक्ष इतर शिष्यांपेक्षा या मुलावरच केंद्रित झाले.

कृष्णा अशक्त वाटायचा. दमेकरी वाटायचा. म्हणून बुवांनी त्याला डॉ. कीर्तने यांचेकडे नेले व सांगितले–

" कितीही फी पडली तरी चालेल. या आमच्या कृष्णाला उभा आडवा

तपासा. अगदी कसून तसून तसू तपासा."

तपासून डॉ. किर्तने म्हणाले–

" औषध नाममात्र देतो. टॉनिक चालू करतो. पण गाण्याची मेहनत टॉनिक आहे. आणि औषधही आहे. कारण त्यात प्राणायामही आहे, आणि जीवनाला आवश्यक असलेला आनंदही आहे."

कृष्णाचे गाणे आणि तब्बेत बरोबरच सुधारत गेली. पौष्टिक खाणे व दूध पिणे बुवांच्याबरोबर चाले. भास्करबुवा कृष्णाला केव्हाही विद्या देत असत.

टांग्यात बसले असले तर घोड्यांच्या टापांचा ताल पुरे होई. स्नानाला निघाले असले तर बादलीत सोडलेली धार सूर होई, पूजेला बसले असले तर घंटेचा ध्वनी लय देई.

'अहो, येता जाता, उठता, बसता, घास गिळता–' विद्येचे घास देऊ लागले. आणि ते हुशार पोर चवीने जेवू लागले. ग्रहण करू लागले.

हळूहळू गुरूप्रमाणेच प्रतिभावंत असलेल्या या चेल्याने अवघड रागही ग्रहण करायला सुरवात केली. या मुलाचा सभाधीटपणा आणि झेप पाहून बुवा मैफलीत त्याला मागे घेऊन बसू लागले. इतकेच नव्हे तर त्याला मैफलीची नजर यावी आणि एकीकडे विद्याही व्हावी, म्हणून लांबच्याही दौऱ्यावर नेऊ लागले.

असाच दक्षिणेचा दौरा चालू असताना बुवा कृष्णाला घेऊन बेळगावला गेले होते. योगायोगाने किर्लोस्कर मंडळीचा मुक्काम तिथेच होता; बुवांच्या सांगण्यावरून तिथे कौतुकाने कृष्णाचे गाणे ठेवले गेले. मैफलीची नजर आल्याने ते जमले, खूप रंगले. पोरवय असल्याने डोक्यात चढले. कृष्णा अर्ध्या हळकुंडाने पिवळा झाला ! गर्वाने फुगला !!

तोच कुणीसे शाबासकी देऊन म्हटले–

" कृष्णा, जमून गायलास, भास्करबुवांची तालीम आता सोडू नकोस."

दुसराही म्हणाला–

" अहो बुवांनी पोरावर घेतलेली मेहनत जागोजागी दिसत होती. सारी गुरुकृपा बरं ही."

यावर कृष्णा विजयोन्मादात उद्गारला–

" गुरू नाही न् बिरू नाही, बुवा बिवा कुछ नाही, मी माझ्या बुद्धीने गातो.'

बुवांच्या कानावर ते उद्धट उद्गार येताच, बुवांनी कृष्णाला वठणीवर आणायचे ठरवले. तो शिकवणीला येताच त्याच्या भवितव्याचा विचार करून, एक चपराक हाणली गेली. आणि सुनावले गेले–

" बेताल होणाऱ्याला समेवर आणलेच पाहिजे. मला विसरू लागलेला दिसतोस. असं असेल तर यापुढे मी शिकवणार नाही. तू तुझ्या बुद्धीने गात जा.

राग मांडत जा, उद्यापासून इथून निघून जा. हातचं न राखता शिकवलं म्हणून हात दाखवलास काय ? चल चालता हो. तुझं माझं नातं संपलं !"

हे तारसप्तक कृष्णाच्या जिव्हारी झोंबले. गालावरच्या चपराकीपेक्षा कानावरची चपराक जन्मभर लक्षात राहण्याइतकी भयंकर वाटली ! त्याचे डोळे डबडबले... काळीज गलबलले– शब्द हरवले...

गुरूचे पाय धरून त्यावर आसवांचा अभिषेक करीत तो कसा बसा म्हणाला,

" मी... मी... मला... क्षमा...!"

पुढचे शब्द अश्रूंत वाहून गेले. तरी ते बुवांच्या पित्याच्या काळजाला समजले. हळव्या हृदयाचे बुवा विरघळले. कृष्णाला पोटाशी धरून म्हणाले,

" एकवार क्षमा केलीय. पुन्हा अक्कल पाजळू नका. कान भरणारे लाख मिळतील. पण स्वर भरणारा एकच असेल हे लक्षात ठेवा."

नंतर कृष्णा मनापासून शिकू लागला. बुवांच्या मागे गाऊही लागला. आणि थोड्याच दिवसांत बुवांचा पट्टशिष्य म्हणून त्याचा बोलबाला होऊ लागला. तो बुवांची गायकी तितक्या भरदार व दमदारपणे गात नसेलही. पण तो त्यांचा प्रमाद नव्हता. प्रत्येकाचे व्यक्तिमत्त्व वेगळे असते. तसाच आवाजाचा गुणधर्मही वेगळा असतो.

घनगंभीर आषाढघनाचा मल्हार श्रावणमेघाला पेलला नाही, तरी ऊनपावसाचा नाजूक ' हिंडोल ' त्याने मोहकपणे झुलवला यात शंकाच नाही.

कृष्णाच्या आवाजाची जातच आगळी. मुलायम. त्यातच दम्याच्या विकाराने अपुरा श्वास. पण त्यांनीही गुरूच्या बरोबरीने महाराष्ट्र रंगवला. गुंगवला.

गुरूची नक्कल करून साच्यातले गणपती न होता स्वतंत्र प्रतिभेने तेच गाणे मांडणारा शिष्य मिळाला म्हणून भास्करबुवा खूष झाले.

पण या खुषीची नाखुषी व्हावी असा प्रसंग लौकरच आला. कारण कृष्णा बुद्धीने तल्लख होता. तसाच चंचलही होता. त्यामुळे बुवांना न कळवता त्याने गोविंदराव टेंबे यांचेकडे गुप्तपणे संधान बांधले. त्यांच्या नाटकात काम करण्याचे कबूल केले.

पण भास्करबुवांना हे काहीच माहीत नसल्याने ते या छात्राला घेऊन काश्मीरला गेले. भास्करबुवांच्या बिन्हाडी चौकशीला आल्यावर गोविंदरावांना हे समजले. नाटक तोंडावर आलेले आणि कृष्णा नाहीसा झालेला. त्यामुळे त्यांच्या तोंडचे पाणीच पळाले. तरीही काहीबाही थापा मारून कार्यक्रमाचे निमित्त सांगून त्यांनी ताईकडून काश्मीरचा पत्ता मिळवला आणि कृष्णाला एक्सप्रेस तार केली–

" नाटक खोळंबले आहे, ताबडतोब निघावे."

तार पोहोचली तेव्हा मास्तर स्नानाला नदीवर गेले होते. त्यामुळे तार

नेमकी भास्करबुवांच्या हातात पडली.

तार वाचून बुवा सर्दही झाले नि क्रुद्धही झाले ! निष्ठेने विद्या देत असताना लाडका विद्यार्थी विचलित झालेला पाहून भास्करबुवांची तळपायाची आग मस्तका-पर्यंत पोहोचली. ते रागाने येरझारा घालू लागले.

आंघोळीला गेलेला कृष्णा मित्रांबरोबर हसत-खिदळत परतलेला वाडीवरच्या खिडकीमधून दिसला मात्र–

बुवांनी वरच्या मजल्यावरून त्याची ट्रंक व वळकटी भिरकावून दिली. आणि ते तार सप्तकात ओरडले–

" कृष्णा, खालीच थांब. तुला वर आणण्याची लायकी नाही."

आणि शंभराची नोट त्याच्या अंगावर फेकून ते चित्कारले–

" हे शंभर रुपये घे. आणि मुंबईला तोंड काळं कर. गोविंदराव टेंबे शालू घेऊन तुझी वाट पाहतोय. नाटकात काम देण्यासाठी.

देवाच्या आळंदीला जन्म घेऊन चोराच्या आळंदीसारखं पळून जायचं होतं काय ? चल नीघ. बाकीचे वर या."

इतर शिष्य वर आले. कृष्णा थरथरत खालीच उभा राहिला. बुवांनी अंगा-वर भिरकावलेली ती नोट नसून निखाराच आहे असा त्याला भास झाला !

अम्मळशाने भोजनार्थ पाचारण करण्यासाठी ' रघुनाथजी की मंडी 'चे सेवक आले. पण बुवा जेवायला उठेनात. चेहऱ्यावरचे नेहमीचे चांदणे मावळून भास्कराने आज चंडांशुचे रुद्र रूप धारण केले. डोळे लालटलेले...शिरा ताठरलेल्या...ओठ आवळलेले...

जवळ कृष्णा नाही तेव्हा तो बाहेर गेला असेल असे समजून व्यवस्थापकांनी विचारले–

" साब, खाना तैय्यार है। चलिये, आपका लडका वो कृष्णकन्हैय्या कहा है ?"

" तो यमुनेत बुडाला !"

भास्करबुवांनी तिरशिंगी उत्तर दिले. तेव्हा इतर शिष्यांनीच एकीकडे नेऊन तारेचा कागद दाखवला तेव्हा सारा उलगडा झाला.

तेवढ्यात इतरही मंडळी जमली. आणि सर्वांनी मिळून विनंती केली, " लडका है. एक दफा माफ करना।"

कुणीसे जाऊन कृष्णाला वर आणले. बुवांच्या पायावर घातले. ते प्रकरण त्या दिवशी तेवढ्यावरच संपले.

पण महाराष्ट्रात आल्यावर शिष्याचा कल ओळखून– त्याने पुन्हा पळून जाऊ नये म्हणून बुवांनीच त्याची रवानगी नुकत्याच भारत गायन समाजात स्थापन

झालेल्या 'गंधर्व कंपनी 'त केली. आणि सुनावले—

" आता संगीत नाटकात नाव कर. माझी पदे शीक. गाणे जमेल तेवढे कर. पण पोरा, हा नाटकातल्या शालूचा मोह खरा नाही. तो भल्याभल्यांना चळायला लावतो. कलावंताचा पाणउताराही करतो, पण तुला त्याचे आकर्षण वाटते आहे, ठीक आहे !

दुसऱ्याच्या ठेचेने सगळीच शहाणी होत नसतात. स्वत: दरड चढतात. धड-पडतात. पडतात. जखमी होतात. मग शहाणे होतात. नाटक कंपनीत जायचं तर जा, पण चांगल्या कंपनीत जा, जिथे तुझे गाणे रुजेल, फुलेल, अशा ठिकाणी जा. शेणच खायचं तर बैलाचं खाण्यापेक्षा गाईचं खा !"

*

# अठरा

संगीतावर विचार करणारे आणि संगीताचा प्रचार करणारे प्रज्ञावंत भारताच्या सर्व भागांत होते.

कलकत्त्याला राजा सुरेंद्रमोहन टागोर यांनी अठराशे एकाहत्तरमध्ये 'बेंगाल स्कूल ऑफ म्युझिक' ही संस्था स्थापन केली. मुंबईत 'गायनोत्तेजक मंडळी' नावाची संस्था होती, या संस्थेस पारशी समाजाचे प्रोत्साहन होते. ही गोष्ट लक्षणीय असून संगीत धर्मातीत असते हे सिद्ध करणारी होती.

अठराशे चौऱ्याहत्तरात सरदार नातूंच्या वाड्यात 'पुणे गायन समाज' उच्चभ्रू लोकांनी स्थापन केला. उद्देश प्रकट करताना—

'टू रिव्हाइव्ह दि टेस्ट फॉर अवर म्युझिकल सायन्स' इत्यादी प्रकटन होते.

तत्कालिन युरोपियनांचा भारतीय संगीताकडे पाहण्याचा दृष्टिकोन दूषित होता. कारण काय तर भारतीय संगीताला स्वरलिपी नाही. पण वी. ना. मंडलिकांनी अठराशे चौसष्ट साली गीतलिपी पुस्तक तयार करवून आणि नंतर बडोद्याच्या मौलाबक्षांनी युरोपियन बँडवर भारतीय गीते बसवून या आक्षेपास चोख उत्तर दिले.

'पुणे गायन समाजा 'ची 'ज्युबिली गायन समाज' या नावाने मद्रासलाही शाखा निघाली होती. एकोणीसशे दहात अब्दुलकरीमखाँसाहेब यांनी बेळगावला

'आर्य संगीत विद्यालय' स्थापन केले. पण एकोणीसशे बारात त्याचे स्थलांतर पुण्यात झाले.

एकोणीसशे नऊत अनंत मनोहर जोशी यांनी 'श्री गुरु समर्थ गायन वादन विद्यालय' काढले. पं. विष्णू दिगंबर पलुसकर यांच्या गांधर्व महाविद्यालयाच्या शाखाही शहरोशहरी निघू लागल्या.

संगीतकला अशी वाटचाल करीत असताना 'भारत गायन समाजा'चा जन्म झाला. संगीताच्या सखोल शिक्षणासाठी 'समाज' स्थापन करावयाचे ठरले. तेव्हा गोविंदराव टेंबे म्हणाले–

"थोड्या लोकांना पुष्कळ संगीतविद्या येण्यापेक्षा पुष्कळांना थोडी विद्या यावी हा समाज स्थापनेतला हेतू नाही. तर संगीत कलेचे संगोपन– संवर्धन आणि संशोधन यासाठी अशा संस्थेची आवश्यकता असते.

छात्राने संगीतशाळेत केवळ तासभर वेळ काढला आणि 'आ ऽ उ ऽ' केले म्हणजे कलेला हातभार लागत नसतो. कलेच्या पायावर सर्वस्व झोकून देणारे निष्ठावंत अशा विद्यालयाने दिले तरच काही उपयोग."

आणि हे खरेच होते. कलाकाराची जाती जन्मून उपयोगी नसते. वृत्ती जन्मावी लागते. माळावर उदंड गवत आले तरी विद्यापतीच्या मस्तकावर चढणारी दूर्वा शोधून काढावी लागते.

संगीत हेच ध्येय समजून जीवन समर्पण केल्याशिवाय गंधर्व जन्माला येत नसतात.

संगीत संस्थेचा जन्म परीक्षा देणारे आणि स्वरलिपी लिहिणारे साच्यातले गणपती तयार करण्याकरिता नसतो, तर अशा विद्यालयातून एखादा तरी स्वयंभू गणपती तयार व्हावा, स्वतंत्र प्रतिभेचे व स्वतंत्र प्रज्ञेचे कलावंत साकारावेत म्हणून हा सारा आटापिटा होता.

भास्करबुवांनी भगीरथ प्रयत्नांनी संगीताची गंगा उत्तरेहून दक्षिणेला आणली होती. तो प्रवाह न आटावा– न घटावा, उलट अखंड वहात रहावा, नवीन निर्झरांनी समृद्ध व्हावा, म्हणूनच समाजाची वास्तू निर्माण करण्यात आली होती.

'भारत गायन समाज' ही संस्था भाद्रपद शुद्ध आठ शके अठराशे तेहेतीस. म्हणजेच एक सप्टेंबर एकोणीसशे अकरा रोजी संगीताचार्य भास्करबुवा बखले यांनी पुणे येथील सुप्रसिद्ध किर्लोस्कर थिएटरमध्ये मागील इमारतीत सुरू केली.

ही संस्था किर्लोस्कर मंडळीशी संलग्न असल्यामुळेच आणि त्यांचेच आर्थिक पाठबळ मिळण्याची शक्यता असल्याने, या संस्थेस 'किर्लोस्कर भारत गायन समाज' असे नाव दिले गेले.

संस्थेच्या हितचिंतकांत लोकमान्य टिळक, साहित्य सम्राट न. चिं. केळकर

आदींचा समावेश होता.

समाजाच्या कार्यक्षेत्रात भारतीय संगीताला नाहक चिकटवलेल्या त्याज्य गोष्टी दूर सारून ( गायकांचा लहरीपणा, व्यसनीपणा इ. ) तिच्या स्वरूपाला उजळा देणे व कलेचा अभ्युदय करणे हा मुख्य हेतू होता.

गायनाबरोबरच वीणा-सतार-पेटी-फिडिल्-पखवाज-तबला इत्यादी वाद्यां-चेही शास्त्रोक्त शिक्षण देणे हाही एक हेतू होता.

विद्यार्थ्यांची अभिरुची संपन्न व्हावी आणि कलेची उंची वाढावी म्हणून तज्ज्ञांची गाणी व जलसे तसेच परप्रांतीय कलाकारांचे सत्कार आयोजित करणे हाही एक भाग होता.

रागांचे बारकावे आणि संगीतकलेचा इतिहास यांचे ज्ञान व्हावे म्हणून संगीतकलेच्या अभिवृद्धीस पोषक अशा ग्रंथांचे प्रकाशनही तपशीलात अंतर्भूत होते.

संस्थेचे आश्रयदाते हेच आधारस्तंभ मानून सधनांकडे आणि रसिकांकडे मदतीचे आवाहनही करण्यांत आले होते. एकंदर सहा वर्षांचा म्हणजे कमीतकमी अर्ध्या तपाचा अभ्यासक्रमही तपशीलवार आखण्यात आला होता.

शिक्षणाची वेळ- सकाळी साडेसात ते साडेनऊ व सायंकाळी सहा ते साडे-आठ अशी होती. त्याचप्रमाणे एखाद्या विशेष होतकरू विद्यार्थ्यांची स्वतंत्र शिक्ष-णाची सोय होती.

सुरवातीचे कार्यकारिणी मंडळ मोठे वजनदार होते.

प्रिन्सिपॉल- पं भास्करबुवा बखले.

चिटणीस-श्री. गोविंदराव टेंबे.

अध्यापक वर्ग-

१) श्री. शंकरबुवा अष्टेकर (गायन)
२) श्री. गपणतबुवा पुरोहित (गायन)
३) श्री. गुंडोपंत वालावलकर (पेटी)
४) श्री. रहिमतखाँ (सतार)
५) श्री. शंकरभय्या वाघोलीकर (पखवाज व तबला)
६) श्री. वामनराव, कोचीन (फिडिल्)
७) श्री. एकनाथ पंडित (जलतरंग)

या शिवाय व्यवस्थापक श्री. कृ. स. हर्डीकर.

समाजाची हाक लोकांच्या कानी येताच सत्तरपर्यंत विद्यार्थी गायन-वादन शिक्षण घेऊ लागले. पण वाद्यखरेदी व शिक्षकाचे मानधन विद्यार्थीशुल्कातून भागणे शक्य नसल्याने तूट भरून वाढण्यासाठी बुवा गावोगाव जलसे करू लागले.

समाजाच्या स्थापनेत सिंहाचा वाटा असणारे श्री. नानासाहेब जोगळेकर यांचे किर्लोस्कर मंडळीशी असलेले जिव्हाळ्याचे संबंध लक्षात घेऊनच 'किर्लोस्कर भारत गायन समाज' हे नामनिधान झाले होते. व जागाही किर्लोस्कर नाट्यगृहाचे मागील बाजूस घेतली होती.

पण पंधरा नोव्हेंबर रोजी समाजाची प्रेरकशक्ती श्री. नानासाहेब जोगळेकर स्वर्गवासी झाले. त्यानंतर किर्लोस्कर मंडळीचे व समाजाचे संबंध दुरावले. आणि समाजाचे स्थलांतर शुक्रवार पेठेतील भूतकरांच्या वाड्यात होऊन नावातील 'किर्लोस्कर' गळाले. 'भारत गायन समाज' हेच नाव एकोणीसशे बारापासून चालू झाले.

समाजाचे काम सुरू झाल्यावर कृष्णाची स्वतंत्र प्रतिभा आणि गती ओळखून भास्करबुवा त्याला रसिकांसमोर आणण्याचा पद्धतशीर प्रयत्न करू लागले. त्याच-बरोबर मरहूम नथ्थनखाँ यांचे चिरंजीव अब्दुलखाँ यांच्या पित्यांना अंत:समयी दिलेल्या शब्दानुसार त्या बंधूंचे गायनही जलशात करू लागले. आणि उत्पन्न व्हावे म्हणून शेवटी स्वत: गाऊ लागले.

एकोणीसशे बारा सालचे एक पत्रक त्या दृष्टीने मोठे बोलके आहे.

'भारत गायन समाजाकरिता दोन जलसे'

जागा– प्रामजी कावसजी हॉल, धोबीतलाव मुंबई.

शनिवार ता. दहा ऑगस्ट एकोणीसशे बारा. रात्रौ नऊ वाजता.

रविवार ता. अकरा ऑगस्ट एकोणीसशे बारा. दिवसा चार वाजता.

प्रिन्सिपॉल भास्करबुवा बखले, खाँसाहेब अब्दुल्लाखाँ (गायन)

हार्मोनियमपटु वसीरखाँ यांचे पेटीवादन, समाजातील बालविद्यार्थी मास्टर कृष्णा याचे मनोहर गायन.

–कार्यक्रम–

'आमर वर नमीत'– सामुदायिक ईशस्तुतीपर पद. भूप.

मास्टर कृष्णाचे गायन.

| | | |
|---|---|---|
| 'इसरे जीवन सदा'– | भूप | त्रिवट |
| 'नयने लाजवीत'– | यमन | झपताल |

प्रो. अब्दुल्ला यांचे गायन

| | | |
|---|---|---|
| 'अरी येरी आली पियाबिन'– | यमनकल्याण | त्रिवट |
| 'हरीये या मानस सो' | बिहाग | तिलवाडा |
| 'कन्हैया तेरो कारो | पिलू (भजन) | केरवा |

प्रो. वसीरखाँ यांचे हार्मोनियम वादन. (दहा मिनिटे विश्रांती.)

पंडित भास्करबुवा बखले यांचे गायन.

| | | |
|---|---|---|
| ' कोन गत भइ ली ' | बागेसरी | त्रिवट |
| ' सा सुंदर बदन ' | मालकंस | झपताल |
| ' सुनीये बालम मोरा ' | मांड (गर्बा) | दीपचंदी |

रविवार अकरा ऑगस्ट एकोणीसशे बारा. दिवसा ४ वाजता.

सामुदायिक ईश स्तुती

मास्टर कृष्णाचे गायन

| | | |
|---|---|---|
| ' गोकूल गावको ' | मुलतानी | अेकताल |
| ' पुष्पपराग ' | पद | दीपचंदी |

प्रो. अब्दुल्ला यांचे गायन

| | | |
|---|---|---|
| ' नाद समुद्र को ' | भिमपलास | धीमा त्रिताल |
| ' झकोरान ये पानी नु ' | जयत | तिलवाडा |
| ' नादिरदानी तन देरे ना ' | (तराणा) पूर्वी | अेकताल |

प्रो. वसीरखाँ यांचे हार्मोनियम वादन (दहा मिनीटे विश्रांती.)

प्रि. भास्करबुवा बखले यांचे गायन

| | | |
|---|---|---|
| ' येरी हूं तो ' | श्री | त्रिवट |
| ' सुरंग चुनरीया दे ' | गौडमल्हार | त्रिवट |
| ' गोपाला मेरी करुणा ' | ठुमरी | पंजाबी |

वरील पत्रकावरून शास्त्रोक्त संगीताबरोबरच सुगम संगीत ऐकवून अभिजात संगीताची अभिरुची बहुजन समाजापर्यंत पोहोचवण्याचा भास्करबुवांचा मानस स्पष्ट होतो. सुज्ञांना शहाणे करता करता अज्ञांना सुज्ञ करणे हेही फार मोलाचे असते.

संगीत विद्यालयाचे मदतीकरिता जलसे करण्याची पद्धत गांधर्व महाविद्यालयाचे पं. विष्णू दिगंबर पलुस्कर आणि आर्य संगीत विद्यालयाचे खाँसाहेब अब्दुलकरीमखाँ यांनी यापूर्वीच रुढ केली होती.

भारत गायन समाजासाठी भास्करबुवांनी तीच अवलंबिली. त्यामुळे जुन्या कलावंतांची कदर केली गेली. आणि नव्यांना व्यासपीठ मिळाले. अनेक नवे कलावंत पुढे आले.

काही वर्षांनी ' भारत गायन समाजाच्या दिवाणखान्यातच किर्लोस्कर नाटक मंडळीतून फुटलेल्या गंधर्व नाटक मंडळीचा मुहूर्त झाला. आणि बुवा ' गंधर्व कंपनी '-कडे ओढले गेले. नट म्हणून नव्हे, तर संगीतकार म्हणून. बुवांचे दोन नामवंत शिष्य मास्टर कृष्णराव आणि नारायण राजहंस तसेच श्री. पंढरपूरकर व अधूनमधून बापूराव केनकर ' गंधर्व कंपनी ' गाजवू लागले. पदांची तालीम पुष्कळदा समाजा-

तच होऊ लागली.

कृतज्ञतेपोटी गुरुशिष्य संबंध लक्षात घेऊन एकूण अठराशे रुपये गंधर्व कंपनीने भारत गायन समाजास मदतीदाखल दिले अशी नोंद सापडते.

शिक्षकवर्गही नंतर वाढत गेला. दिवटे, बागलकोटकर आदी संगीत-शिक्षक; दि. गो. दातार, वा. वि. आठल्ये. इत्यादी हार्मोनियम-शिक्षक व नाईक आणि लक्ष्मण गुरव इ. तबला-शिक्षकांची भर पडली.

या नोंदीप्रमाणेच मास्टर कृष्णाला तो नादार असल्यामुळे समाजाकडूनच धोतर, कोट, ओव्हरकोट, इत्यादी केल्याच्या नोंदी आहेत. तसेच वझेबुवा, अलादियाखाँ, मुरादखाँ यांचीही गाणी झाली.

एका गुरुपौर्णिमेला श्री. नानासाहेब फडणीस बेलबागकर यांनी भास्करबुवांना नवरत्नांची अंगठी अठरा जुलै एकोणीसशे तेरा रोजी दिली. त्यावरून सरदार-दरकदारही बुवांचे शिष्य झाले होते हे सिद्ध होते.

समाज भूतकरांच्या वाड्यात असताना नाट्याचार्य कृ. प्र. खाडीलकर दोन वर्षे बुवांकडे गाणे शिकण्यास येत असत. संगीत नाटककारास लेखनाचा हातच असून भागत नाही, गाण्याचा कानही असावा लागतो. नसल्यास तयार करावा लागतो. तरच गायनातले बारकावे लिहिले जाणार. गद्यालाही लय गवसणार.

एकोणीसशे चौदात भूतकरांच्या वाड्यातून समाज देवळालीकरांच्या वाड्यात आला. तो बावीसपर्यंत तेथेच होता. मग हल्लीच्या स्वतःच्या वास्तूत आला.

भास्करबुवांना स्वरलेखन पद्धतीच्या अपूर्णतेची पूर्ण जाणीव असूनही त्या पद्धतीचा व्यावहारिक उपयोग त्यांना मान्य होता. बुवांचा पिंड चार भिंतींच्या संस्थाचालकाचा नव्हता. स्वतंत्रपणे उड्डाण करणाऱ्या वैनतेयाचा होता. ते कर्मयोगी कलावंत होते. तरीही संगीतप्रेमी मुलांना विद्यादान करणे ते स्वतःचे कर्तव्य समजत. आणि समाजाच्या माध्यमाचा विद्यादानासाठी उपयोग करीत.

समाजात शुल्क देणाऱ्यांबरोबर नादार मुलेही होती. पण स्वतः भास्करबुवांनी आपदा सोसून कला संपादन केल्याने सर्वांबद्दल सहानुभूतीचा दृष्टिकोन असे. नादारात मा. कृष्णराव, दातार व हरिभाऊ आठल्ये ही हुशार मुले होती. दातारांचे पुढचे भवितव्य तयार व्हावे म्हणून वालावलकरांकडून त्यांना पेटीवादनातही तयार करण्यात आले.

नियमितपणाबद्दल भास्करबुवा प्रसिद्ध होते. कलाकार असून लहरी नव्हते. कारण लहरी गुरूंची मर्जी संभाळताना कोणते अनवस्था प्रसंग ओढवतात याचा त्यांना कटू अनुभव होता. समाजाचे वेळापत्रक स्वतः त्यांनीच आखले होते—

विद्यार्थ्यांचे वेळापत्रक असे—

सायंकाळी चार वाजता— दातार, पाच ते सहा— काकासाहेब खाडिलकर, सहा ते सात— मुरुडकर; नारसातकर आणि जगन्नाथ पंढरपूरकर. रात्री आठ ते दहा— मा. कृष्णराव; बागलकोटकर; ठाकूरदास.

या अशा शिकवण्या स्वतःची गाणी नसतील तेव्हा बुवा चालूच ठेवीत. आणि हे वरच्या थरातले विद्यार्थी तयार व्हावेत म्हणून अविश्रांत श्रम घेत. समाजासाठी बुवांनी अपरिमित खस्ता खाल्या ! एखाद्याचे जीवनच खस्ता खाण्यासाठीच असते की काय कोण जाणे ! कारण मनात आणते तर बुवा आराम खाऊ शकले असते.

या काळात पुण्यावर दर वर्षी प्लेगची स्वारी होऊ लागली आणि समाज जीवन विस्कळित करू लागली. प्लेगचा उंदीर सारे शहरच उद्ध्वस्त करत असताना शंभराच्या वर गेलेली छात्रसंख्या उद्ध्वस्त केल्या गेल्याशिवाय कशी राहणार. एकोणीसशे सोळा साली प्लेगमध्ये बुवा मुंबईस गेले.

स्वस्थपणे विद्यादान करता न आल्यामुळे मनोमन अस्वस्थ झाले. जाताना समाजाची सर्व सूत्रे व्हाइस प्रि. अष्टेकरबुवा व पेटीवादक दातार मास्तर यांचे हाती सुपूर्त करून केले.

त्यानंतर पुण्यात बुवा येऊन-जाऊन असत. समाजाच्या प्रगतीवर लक्ष ठेवीत, पण प्राथमिक अवस्थेतील विद्यार्थ्यांना शिकवण्यात त्यांना रस वाटेना. त्यातच मुंबईतही त्यांचे शिष्यगण वाढले.

ताराबाई शिरोडकर, अंजनीबाई कलगुटकर, मुक्ताबाई कलगुटकर, चंद्राबाई कारवारकर, दिलीपचंद्र बेदी, बापुराव केतकर, इत्यादी शिष्यसंप्रदाय मुंबईस मिळाला— अर्थात गायनवर्गाची पाटी न लावता.

पट्टीच्या शिक्षकाला पाटीची आवश्यकताच नसते. हाडाच्या गायकाला लाकडाच्या पाटीची तमा नसते...

या तयार शिष्यांतही काही खट होते. शिकायचे बुवांकडे आणि नाव सांगायचे दुसऱ्याच गुरूचे. म्हणजे कष्टाला बुवा आणि मलिद्याला सोम्या-गोम्या !

एका तयार गायिकेने असे केले, ते बुवांना फार झोंबले. गुरुपौर्णिमेच्या दिवशी ती शिष्या यायच्या वेळेला बुवा घरातून निघून गेले. घरात सांगून गेले—

" ती शिष्या येईल. काही आहेरही करून जाईल. ठेवून घ्यायचा नाही. तिला म्हणावं—

' ज्या गुरूचं नाव सांगतेस त्यालाच ते पोहोचव. आणि त्याचीच गायकी पचव—"

अशा अनेक जखमा बुवांच्या जिव्हारी लागत. पण कलावंताचा बाणा असल्याने हसतमुखाने पचवाव्या लागत.

शिष्येची ही तऱ्हा, तर काही शिष्यांची वेगळीच बेइमानी ! त्यांनी अभ्यास-क्रम पदरात पाडून घेतल्यावर स्वतःच्या नावामागे प्रो. लावून वेगळे संसार थाटले.

लौकरच संगीतविद्येच्या प्रसारार्थ काढलेल्या संगीतशाळा उच्च दर्जाचा विचार करता तोकड्या पडतात असा बुवांना अनुभव आला. नामांकित शिष्यांच्या नामा-वळीत बसण्याच्या लायकीचा एखाद्दुसराच अपवादात्मक शिष्य हजारोंच्या शिष्या-वळीत तयार होतो. ही अशा वर्गाची दारुण शोकांतिका होय !

मग होतकरू शिष्याला खाजगीरीत्या हाताशी धरून त्याच्यावर मेहेनत घेतली तर तीन-चार तासांची मैफल मारणारा बहाद्दर शिष्य तयार होतो हेही बुवांनी जाणले.

अर्थात तरीही त्यांनी 'भारत गायन समाज' बंद केला नाही, कारण काहीच न करण्यापेक्षा या संगीत शाळा संगीतासाठी काहीतरी हालचाल करीत होत्या हेही नगण्य नव्हते.

यशापयश दूर ठेवले तरी या आस्थेवाईक प्रयत्नांची बूज राखावयालाच हवी होती. मात्र इतर ज्ञानांप्रमाणे विद्यार्थ्यांना समजही द्यायला हवी होती की—

'लिटिल नॉलेज इज ए डेंजरस थिंग.
ड्रिंक डीप ऑर टेस्ट नॉट.'

*

# एकोणीस

आज माई आणि आक्का खूष होत्या. कारण बुवांना उत्तरेच्या एका बड्या रईसाकडचे लग्नातल्या गाण्याचे निमंत्रण आले होते. बिदागीचा आकडाही लठ्ठ-मुठ्ठ होता. भाडेपोटी विसार धाडण्याचाही प्रस्ताव केला गेला होता. त्यामुळे गाणे नाकारले जाण्याचा संभवच नव्हता.

या गाण्याला आईसकट आपण जायचे. आणि चांगल्या चांगल्या जरतारी कपड्यांत मिरवून यायचे— मिठाई-बिठाई खाऊन यायचे असे त्या बालजीवांचे स्वप्नरंजन चालले होते.

त्यांचेच कशाला— गणपत पुरोहित आणि मणेरीकर मास्तर आदी शिष्यही काही कमी हुरळले नव्हते. एकमेकांना म्हणत होते—

"गुरुजी तुला नेणार. मला कसले नेतात ? मग आम्ही दुधाची तहान

बुवा कमालीचे हर्षित होऊन म्हणाले–

" घरातून असे पाठबळ आहे म्हणूनच आम्ही मैफलीत बळ संपादतो."

ताई मान वेळावून म्हणाल्या–

" हे मात्र उगीचच. काहीतरीच हं. स्वारीचं नाव सूर्याचं आहे. मग पूर्व दिशा सूर्याला उजळते, की सूर्य पूर्वेला ?"

भास्करबुवा खूष होऊन समाधानाने म्हणाले–

" कुठे तुम्ही आणि कुठे आमच्या क्ष मित्राची पत्नी ! बिचारा चपला पायांतून काढायच्या आत बायको चपळतेने येते आणि नवऱ्याचा खिसा कातरून नेते."

" घसा कातरून नेत नाही ना ? पुष्कळ झालं."

बुवा हसून म्हणाले– " आज आम्हाला सपाटून भूक लागलीय. तुमच्या हातचा रस्सा हवाय."

" इश्श ! मग करते ना पाच मिनिटांत. कांदे आहेत, बटाटे आहेत, गरम मसाला आहे."

" आणि हे नरम, प्रेमळ हातही आहेत."

बुवा ताईंचे हात गोंजारत म्हणाले. तशी ताई स्वतःला सोडवीत म्हणाल्या–

" मुले पटकन् घरात येतील ना ? सोडावेत हात हं. म्हटलं, माई आता नहाती-धुती झालं हं. लहान नाही."

" ते आमच्याही लक्षात आलंय. म्हणून शंकरबुवांना स्थळे बघायला सांगितली आहेत."

बुवा आंतरिक समाधानात पत्र लिहायला बसले आणि ठरल्याप्रमाणे लग्नाला न जाता जालंदरलाच गेले.

जालंदरहून बुवा सिंधप्रांतातील शिकारपूरला गेले. शिकारपूर हे व्यापाराचे गाव होते. त्यांचे लग्नसमारंभ थाटामाटाने साजरे होत. कलावंतांची गाणीबजावणी होत. ज्या कलावंतावर फिदा होत, त्याच्यावर हजारो रुपये आदा करीत.

एके वर्षी बजाजशेठच्या घरी बुवांना निमंत्रण गेले. शिकारपूरचे पंडीत रावळदास हे संगीत-गायन समाज चालवीत. त्यांच्याच सांगीवरून आणि शिफारशीवरून बुवांना आमंत्रण गेले. कारण बजाजशेठच्या घरी केवळ उत्तम गोष्टी चालण्यासारख्या नव्हत्या. तेथे सारे सर्वोत्तमच हवे होते.

बजाजशेठचे आमंत्रण स्वीकारून बुवा शिकारपूरला आले. सिकंदरबद्दल म्हटले जाते–

' ही केम, ही सॉ, अॅंड ही कॉंकर्ड."

बुवा येथेही नशिबाचे सिकंदर ठरले आणि मग बुवा शिकारपूरला येतच राहिले. बुवांच्या गाण्याच्या रूपाने एक लावण्याने मुसमुसलेले आनंदाचे भांडारच सिंधी समाजाच्या हाती आले.

जालंदरला जोडून शिकारपूरचा होळीकोत्सवही दणक्यात होऊ लागला. या दौऱ्यात ख्यालांबरोबर टप्पे– ठुमरी– भजने आदींचा वापरही ते भरपूर करीत. बुवांचे रसिले आणि रंगिले गाणे ऐकता ऐकता सिंधप्रांतातही त्यांचे भक्त निर्माण झाले.

शिकारपूरला एक दिवस एक अगदी नवीन तबलजी बुवांच्या साथीला बसला. बुवांनी त्याला सांभाळून घेतले. त्याचे नवीनपण उघडकीला आणून आणि आपली विद्वता दाखवून त्याच्या कलेचा पाणउतारा केला नाही.

मैफल संपली. तशी त्याला उत्तेजन देण्यासाठी त्याला शाबासकी देत बुवा म्हणाले–

"आपण खूष झालो हं, तुझ्या साथीवर. बोल, काय बक्षिसी देऊ ?"

"मी अजून शंभराची नोट पाहिलेली नाही."

असे तो म्हणताच या कर्णाने खाड्कन शंभराची नोट काढून दिली.

प्रद्युम्नकुमाराच्या विवाहाचे निमंत्रण जालंदरच्या व शिकारपूरच्या शब्दाला जागणाऱ्या रघुनाथपुत्राला स्वीकारता आले नाही. तरी नंतर महोत्सवाहून परतताना काश्मीरच्या महाराजांच्या मंत्र्यांनी त्यांना पकडले आणि थेट काश्मीरच्या राजांकडे चालवले.

आधीच थंडीचा कडाका ! त्यात वेड्यावाकड्या सडका !! आडमुठे चढ-उतार आणि जीवघेण्या भयंकर दऱ्या !!! सृष्टीचे ते रुद्ररूप पाहून बुवा टरकले. एक लाकडी साकव पार करायचे नाकारून काश्मीरच्या मंत्र्यांना म्हणाले–

"मंत्रीमहाशय, आपल्या खास आग्रहास्तव मी प्रवासास सिद्ध झालो खरा. पण माफ करा. मी सडाफटिंग नाही. संसारी माणूस आहे. दोन मुलींचा बाप आहे. माझ्यावर पत्नीची आणि लेकीची जबाबदारी आहे.

त्यातून सर्वस्वी माझ्यावरच अवलंबून असलेली ही जिवाभावाची मंडळी हजारो मैल दूर आहेत. काय सांगावं ? या सांसारिक पार्श्वभूमीमुळे मला अपघातात मरायचंसुद्धा स्वातंत्र्य नाही ! कारण कुटुंब ज्याच्यावर सोपवावं असं जवळच्या नात्याचंही कुण्णी कुण्णी नाही.

सारांश, मला जगलंच पाहिजे आणि बायका-मुलांना पोसलं पाहिजे. मी आपला परत जातो कसा."

"छे ! छे ! हे कसं शक्य आहे ? देव वेशीवर आला आणि दर्शन न देता गेला तर संगीतभक्त किती नाराज होतील आपणच सांगा.

या भक्तीची मनस्वी जाती आपण जाणताच. त्यासाठी होणारी पैशाची आरती आपण अनुभवताच. त्यापेक्षा तुम्हाला स्वतःच्या खांद्यावरून पुलावरून पली-

कडे नेतो. काळजी करू नका.''

भास्करबुवा संकोचून म्हणाले–

'' भलतेच ! मंत्रीमहोदय– ज्याने राष्ट्राची धुरा खांद्यावर घ्यायची त्याने काय मजगत सामान्य गायकाला खांद्यावर घ्यायचे ? आणि त्यासाठी स्वतःचे अमूल्य प्राण धोक्यात घालायचे ?

छे ! छे ! सर्वथैव अशक्य !''

महामंत्री वशिल्याने उच्चपदस्थ झालेले नव्हते. तर बुद्धीने उच्चपदावर पोहोचले होते. ते ताडकन् उत्तरले–

'' भास्करबुवा– एका राज्याचा महामंत्री अपघातात मेला तर त्याची जागा पटकावयाला दहा लोक टपलेले असतील.

यदाकदाचित मी अपघातात मेलोच तर आमच्या काश्मीर राज्याला माझ्यापेक्षाही अधिक हुशार आणि हितकारक महामंत्री मिळेल. पण पं. भास्करबुवा बखले या दिगंत कीर्तीच्या देवगंधर्वास अपघात झाला तर त्याची जागा भरून काढणारा दुसरा त्याच्याच तोलामोलाचा अष्टपैलू गायक कधीच मिळायचा नाही.

आणि मी कशाला, देवी सरस्वतीच आपल्या या लाडक्या लालाला सांभाळून नेईल. ''

आणि मग या महान सारस्वताने हसत हसत पूल पार केला. एवढेच नव्हे तर स्वरांच्या फुलाने काश्मीर महाराष्ट्राला कायमचे जोडून टाकले.

आजवर भारतातल्या गोमंतकाचे सौन्दर्य बुवांच्या संगीतावर चढले होते. आता काश्मीरचे अपूर्व निसर्गसौन्दर्य आणि लोकसंगीत हेही बुवांच्या गळ्यावर येऊन बसले.

'गोरी दाचित्त लग्गा चंबेगी अंधरा'

–ही पहाडी धून बुवांच्या हृदयात इतकी ठसली की बरोबर नेलेल्या मास्तर कृष्णानेही ती हां हां म्हणता कंठगत गेली, तिथल्या तिथे सर्वांना ऐकवली. आणि खूष केले.

पुढे महाराष्ट्रात आल्यावर पदांच्या रूपात ही धून अनेकांपर्यंत पोहोचवली.

बुवा काश्मीरहून परतले तेव्हा काश्मीरी रंगीबेरंगी कशिद्याची खुद्द महाराजांनी दिलेली उंची शाल त्यांच्या गळ्याभोवती लपेटून बसली होतीच; पण शिवाय अनेक होऱ्या– कजऱ्या– ठुमऱ्या– पहाडी गीते यांचे कशिदेही या गळ्याला लपेटून गेले होते.

हा असा कशिदा उचलताना बुवा तर-तम भाव करीत नसत. पोरापासून थोरांपर्यंत मिळेल त्याच्याकडून स्वरांचा रेशीमधागा उचलत असत.

एकदा असाच एक रेशीमधागा बुवांना रस्त्यात सापडला.

मोठ्यांचे मोठेपण दिसते. पण हे मोठेपण आभाळातून पडत नसते. सकाळी

उठून कुणी मुलगा दार उघडून अंगणात येतो आणि प्राजक्ताच्या सड्याप्रमाणे मोठेपण त्याचे अंगण भरून सामोरे येते, असे कधीच होत नसते.

मधुमक्षिकेप्रमाणे जागृत असावे लागते. या त्या फुलांवरून हिंडावे लागते. मधुबिंदू गोळा करून आणावे लागतात. मगच मोठेपणाचे मधुर पोळे हातास लागते.

गुरूकडून लय शिकता शिकता— मयुराकडून— बलाकमालातून आणि मृगां-कडूनही लय उचलावी लागते. तंबोऱ्यातून सूर उचलताना घनगर्जितातून आणि सागर भरतीतूनही त्याचा भरणा करावा लागतो.

या विचारांनी भारलेले भास्करबुवा त्या दिवशी काश्मीरातल्या एका खेड्या-तून कृष्णा फुलंब्रीकरला बरोबर घेऊन पायीच फेरफटका मारीत होते.

भर उन्हाची वेळ होती. आभाळात सूर्याने बारा डोळे उघडले होते. सारे आसमंत तापले होते. पाखरे वृक्षांच्या आसऱ्याला गेली होती. माणसे घराच्या आसऱ्याला गेली होती. रस्ता पेंगुळला होता. गरम निःश्वास टाकत होता.

गुरूबरोबर त्या रणरणत्या उन्हातून पदयात्रा करताना बारा-चौदा वर्षांचा कृष्णाही रंजीस आला होता. तोच ऊन कापत— उन्हाचे चांदणे करीत—बुलंद-मधुर सूर आले— गाण्याचे नव्हे, कुण्या भिकाऱ्याच्या आर्त आळवणीचे—

‘ जय राधे ऽऽऽ श्याम
जय सीता ऽऽऽ राम ’

ती आळवणी नव्हती. स्वरबद्ध विनवणी होती. भावस्पर्शी...हृदयस्पर्शी...

भास्करबुवा एकदम थबकले. जलाशय पाहून तृषार्त थबकावा तसे त्यांनी कान टवकारले. पुन्हा तेच सूर वाऱ्याच्या वारुवर आले.

‘ जय राधे ऽऽ श्याम
जय सीता ऽऽ राम ’

बुवा लगबगीने झाडाखाली बसलेल्या आंधळ्याकडे गेले. आणि त्यांनी स्वतःच्या लांब काळ्या कोटातला एक ढब्बू पैसा— म्हणजे आत्ताचे दोन पैसे दिले. आंधळ्याने पुन्हा सुरिल्या शब्दात पुकार केला—

‘ जय राधे ऽऽ श्याम
जय सीता ऽऽ राम ’

बुवा पुन्हा परतले. त्यांनी पुन्हा ढब्बू पैसा दिला. असे पंचवीस वेळा झाले. छोटा कृष्णा कंटाळला, वैतागला, उताविळीने म्हणाला,

“ बुवासाहेब, आपल्याला जेवायला उशीर होतोय्. ”

“ खरंच की ! चल चल. ”

असे म्हणून त्या अंधाचा ‘ राधे ऽऽ श्याम ’ हृदयात साठवीत बुवा चालू लागले तशी न राहवून कृष्णाने गुरूला छेडले—

" बुवासाहेब, एक विचारू ?"

" विचार की. अगदी दुपारची चीज विचारलीस तरी सांगतो."

" तसं नाही, दुसरंच विचारायचंय्."

" तरी हरकत नाही. काय शंका आहे ?"

" एकेक ढब्बू करून पंचवीस वेळा दान केलेत. मग एकाच वेळी अधेली देऊन मोकळे का नाही झालात !"

कृष्णाच्या या प्रश्नावर बुवा हसले आणि म्हणाले—

" खरं सांगू ? तू मला जेवणाच्या समेवर आणलं नसतंस तर मी अजूनही पंचवीस वेळा ढब्बू पैसा देत राहिलो असतो."

" पण एकदम रुपाया दिला नसता. असंच ना ?"

" अगदी तसंच ! कारण वेडचा. मी त्याला पैसे देत नव्हतो, तोच मला काहीतरी देत होता. प्रत्येक 'राधे'वर तो एक सुंदर मुरकी घेत होता आणि 'सीता'वर न्यास करून मींड घेत होता. ती मी ऐकत होतो. कानात भरून घेत होतो. मनात साठवून घेत होतो. पंचवीस वेळा म्हणायला लावून पक्की करून घेत होतो."

काश्मीरमधल्या दरबारातल्या एका मैफलीची गोष्ट.

त्या दिवशी बुवांचा भूप अप्रतिम जमला होता, षडज्– ऋषभ-गंधार-पंचम आणि धैवत या पाच स्वरांत पाचामुखी परमेश्वर यांना तशी गानदेवता आरूढ झाली होती. ते दिव्य गान ऐकून श्रोते भान विसरले होते. मान मोडेपर्यंत वहाव्वा देत होते.

पण मान ताठ करून गाणे ऐकणाऱ्या ऐका राजगायक खाँसाहेबांना – दक्षिणेच्या आणि विशेषत: बम्मन गायकाने उत्तरेवर व मुसलमान गायकावर केलेली ही कुरघोडी आवडली नाही. खोडी काढण्यासाठी भूपाची तान ऐन रंगात आली असताना तो बुद्धिपुर:सर ओरडला—

" वाहव्वा ऽ क्या मध्यम लगाया. बहोत अच्छा. सुभानअल्ला !"

भूपात मध्यम ?

भूपात मध्यम !

बुवा एकदम भानावर आले. त्यांचे रक्त एकदम सळसळले— तापले. त्यांनी एकदम तंबोऱ्यावर हात ठेवला नि दुसरा हात तबल्यावर ठेवला. वाद्यांची तोंडे अशी बंद केल्यावर त्या खाँसाहेबाला सुनवून त्याचेही तोंड बंद करण्यासाठी बुवा म्हणाले—

" आपण गायक आहात. सा रे ग प ध सां! सां ग प ध सा हा भूपाचा आरोह अवरोह जाणत आहात. तरीही मी मूर्खपणे भूपात मध्यम लावला असेन तर इथून

पुढे गाणे बंद करीन.

मंडळी, कान देऊन ऐका, मी पुन्हा ताना ऐकवतो. भूपात मध्यम लावायची आदत गळ्याला पडली असेल तर तो पुन्हा ती चूक केल्याविना रहाणार नाही.

असा वर्ज मध्यम आलाच तर कान पकडा, या भास्करला सदरेवरून खाली ओढा. त्याच्या झिज्या पकडा. त्याला उठाबशा काढायला भाग पाडा. तसे झाले तर आजच नव्हे, जन्मभरासाठी तंबोरा खाली ठेवीन!"

आणि नंतर भूपाचे असे सट्टे लगावले की ते सारे रट्टे त्या टीकाकारालाच लागले, खाली मान घालून मैफल सोडून तो निघून गेला.

त्या उथळ माणसाचे राजगायक पदही त्याचक्षणी छिनावून घेतले गेले. डिवचल्यावर नागसुद्धा फणा काढतो. मग डिवचल्यावर भास्कराने किरण का प्रखर करू नयेत ? असेच सर्वांना वाटले.

पण ज्ञानासाठी कठोर झालेले भास्करबुवा कलेसाठी लगेच कोमल झाले. त्यांनी त्या राजगायकाला परत त्याचे स्थान मिळवून दिले. तेव्हा त्यांचे समाधान झाले.

या दरबारात बुवांच्या गाण्याचे स्थान त्या दिवशी ठरले. तसेच बसावयाचे मानाचे स्थानही अशाच एका मैफलीत सिद्ध झाले. बुवांच्या अंतरीच्या औदार्यानेच आणि कलादृष्टीनेच ते मिळवून दिले.

त्या दिवशी बुवांचे गाणे नव्हते. एका वृद्ध बुजुर्ग गायकाचे गाणे होते. बुवा आस्थेने– आदराने ते ऐकायला आले होते. वृद्ध गायकाच्या शिष्याने तानपुरा मिळवला. तबला सुरांत लावला गेला. गायकाने षड्ज् लावला.

पण हाय ! आज स्वरातला कंप काही केल्या जाईना. वय झाकू देईना. गायकाला पुढे जाऊ देईना. अशी दहा-पंधरा मिनिटे गेली. तशी कुणीसे बुवांच्या कानी लागून म्हणाले–

"खाँसाहेब जमतीलसे दिसत नाही, आपण बदली बसता का ?"

बुवा ताडकन उत्तरले–

"एकाच्या बदली दुसरा गाऊ शकत नाही. आणि एकाची बरोबरी दुसरा करूही शकत नाही. ज्यांच्या मागे मी तंबोरा धरावा, अशा उंचीचे हे महान गायक आहेत. आजका जलसा खाँसाहेबका है. मैं उनको चचा जैसा मानता हूँ.

अहो पंधरा मिनिटांनी नव्हे. अगदी तासाने सूर लागेल आणि मग मात्र तो इतका घट्ट असेल की खाँसाहेबांना हाताने धरून गदागदा हालवलेत तरी तो श्रुती-भरही– सूतभरही चळणार नाही. ढळणार नाही. म्हणूनच त्यांचे स्थान माझे स्थान होऊच शकणार नाही."

सुमारे अर्ध्या तासाने खाँसाहेबांचा सूर लागला. आणि श्रोत्यांचा नूरही. मात्र

त्या दिवशीच्या बुवांच्या उद्‌गारामुळे दरबारला बुवांच्या गाण्याबरोबरच त्यांच्या मनाची उंचीही समजून चुकली.

जो इतरांना मानतो तो मानला जातो. जो सर्वांना पूजतो तो पूजनीय होतो. वंदनीय ठरतो. बुवांचे नेमके हेच झाले.

दरबारने तेव्हापासून भास्करबुवांना वेगळे मानाचे स्थान व आसन बहाल केले.

मान-सन्मान विनंत्या-अर्ज करून मिळवायचे ते दिवस नव्हते. गुणसिद्ध, स्वयंसिद्ध असे ते मान होते. आपण होऊन पायाशी लोळण घेत येत होते. फुललेला पारिजात स्वतःची जाहिरात करीत नसतो. पहाटवारा त्याला प्रदक्षिणा घालायला आपण होऊन येतो.

मात्र बुवा त्यागी वृत्तीचे गायक होते. भोगी वृत्तीचे गायक नव्हते. त्यांना उच्च आसनाची आसक्ती नव्हती, तशीच उंची वसनाचीही आसक्ती नव्हती. त्यांच्या श्रद्धाळू मनात सेवाभाव तारेला षड्‌ज बिलगावा तसा बिलगलेला होता.

त्याची प्रचीती आळंदीच्या गाण्याच्या वेळी आली. या गाण्याचे मानधन बुवांनी घेतले नव्हते. कारण ही सेवा होती.

तरीही गायन संपल्यावर अलंकापुरीच्या व्यवस्थापकांनी त्यांना मानाचे उपरणे आणि श्रीफळ दिलेच.

बुवांनी नमस्कार करून फक्त नारळ उचलला व म्हणाले—

"श्रींच्या सेवेचे फळ म्हणून श्रीफळ पुरे, उपरणे नको, त्यांच्याच आशीर्वादाने हिंदुस्थानभर फेटे आणि दुपट्टे मिळवीत असतो. घालून मिरवीतही असतो."

असा हा रागी...आणि विरागी !

*

# वीस

आज सकाळपासून ताईंचे पोट दुखत होते. कुणा शिष्याला पत्ता सांगून बुवांनी सुईणीला बोलावून घेतले होते. शेजारीणबाई मदतीला होती. वडील बहीण तान्हुताई आलेली होतीच.

बुवांची बाहेर शिकवणी चालूच होती. पण आत कान आणि मन झेपावत होते. एवढे सावधचित्त बुवाही काहीसे विचलित झाले होते. शिकवतानाही येरझारा

घालीत होते.

माजघराच्या बंद दाराकडे कुंद मनाने पाहत होते. थोड्याच वेळात ' टॅहँऽऽ टॅहँ ' असा टीपेचा स्वर आला. बुवांनी शिष्यांना रजा दिली, आणि ते झटकन् उठले. त्यांच्या मनात आले–

" काय जगन्नियंता तरी ! इतर कुठलेही रूदन रडणाऱ्यालाच नव्हे, तर ऐकणाऱ्यालाही क्लेशकारक असते. पण नवजात बालकाचे रूदन त्याला कसेही वाटत असो. ऐकणाऱ्याला मात्र आनंददायीच असते."

भास्करबुवांनी या खेपेला ताई जरा अशक्त वाटल्या म्हणून त्यांच्या खाण्या-पिण्याची जातीने काळजी घेतली होती. त्यातच वडील बहीणही आली होती. तीही अडले-पडले पाहत होती. नववा लागल्यापासून तीच स्वयंपाक करीत होती.

मात्र अलीकडे तान्हुताई बडोद्याच्या राहिल्या नव्हत्या. नवरा गेल्यावर सोवळ्या झाल्या होत्या. त्यामुळे कडक सोवळे-ओवळे भडकपणे संभाळत होत्या. त्यापायी घरात थोडी किरकिर होत होती. पण अनेक रंगांची गाणी पचवणारे भास्करबुवा हे संसारातील वक्रसूरही पचवण्याचे प्रयत्न करीत होते.

नवजात अर्भकाचा रूदनस्वर घरभर पसरला. आगमनाची शुभ वार्ता सांगून गेला. पण अजून कुतुहल जागृत होते. मुलगा की मुलगी हे कळायचे होते.

तेवढ्यात माजघराचे दार किंचित किलकिले करून तान्हुताई गरजल्या,

" भास्करा, याही खेपेला मुलगीच झाली हो."

तान्हुताईच्या शब्दातील अधिक्षेप आपल्यापेक्षाही बाळंतिणीच्या जिवाला जहरी जखम करून जाईल हे जाणून भास्करबुवा म्हणाले–

" मुलगी तर मुलगी. जे ते आपल्या नशिबाने येते. तुझी वहिनी हातीपायी सुखरूप सुटली, त्याला महत्त्व."

" वेळ लिहून ठेव. पत्रिका करायला लागेल ना ?"

भास्करबुवा लगबगीने उठले. त्यांनी कपाटातली लंबाडी चिजांची वही काढली. आणि नोंद केली–

" आज भास्कर बखलेला नवी चीज विधात्याने बहाल केली. अवतार समय–"

आणि पुढे सारा तपशील लिहिला. मग भास्करबुवांनी खुषीने तंबोरा काढला आणि गायला सुरुवात केली. कोमल आसावरीतली ती यशोदेच्या घरची– श्रीकृष्ण जन्माची चीज.

' बदैय्या लावो रे लावो.<br>
आज सुघड घड पळन ।।धृ।।

रतन जटीत सुजटीत हिंडोलना
झुला झुले जसुमती ललना ॥१॥

तिसरी मुलगीच झाल्याने तान्हुताई नाराजल्या. त्यामुळं ताईंच्या मनाविरुद्ध या मुलीचे बारसे घरातल्या घरात देवापुढे करण्यात आले. वडील नणंद सासूच्या ठिकाणी असते. त्यामुळे ताईंनी त्यांचा मान राखला. मुलीचे नाव शांता ठेवण्यात आले.

शांता अतिशय चुणचुणीत होती. नाकी-डोळी देखणी होती. स्वभावाने लागट होती. धिटुकली होती. मुटुकली असल्यापासून गानलुब्ध होती. गाणे ऐकल्याविना झोपत नव्हती. गाणे सुरू झाल्याविना उठत नव्हती.

बेलबागेतल्या शिवरामशास्त्री जोगळेकरांचे चिरंजीव अप्पाशास्त्री जोगळेकर यांची मुलगी चंपा अशीच गानलुब्धा होती. बुवांकडे एक दिवस सहज जोगळेकर चंपाला घेऊन आले. तर खाऊ घेण्याआधी ही मुलगी तंबोरा घ्यायला धावली.

वैद्य अप्पासाहेब जोगळेकरांना लेकीचा हा अगाऊपणा मुळीच आवडला नाही. पण भास्करबुवांनी न रागवता चंपाला तंबोऱ्याला हात लावू दिला. तिला मांडीवर घेतले. आणि तिला तसे घेऊनच त्या दिवशीच्या साऱ्या शिकवण्या झाल्या.

वैद्य अप्पाशास्त्री जोगळेकर उत्तम वैद्यक जाणणारे होते. तसेच उत्तम पेटीवादकही होते. ते बुवांच्या गाण्याच्या लोभाने क्वचित सोलापुरी तर मुंबापुरीही जाऊन येत होते. कोल्हापूरलाही देवीच्या दर्शनापेक्षा संगीतकारांच्या दर्शनाच्या लोभामुळेच अप्पाशास्त्री जात.

एकदा ते असेच भास्करबुवांच्या गाण्यासाठी मुंबईला गेले. तर बुवा आजारी होते. अंगात तापजाळ नव्हता. पण आठवडाभर उचकीच लागली होती. ती गाऊही देत नव्हती. आणि कुणाच्या औषधाने जाऊही म्हणत नव्हती. त्यामुळे बुवा चांगलेच अस्वस्थ झाले होते. पण आप्पाशास्त्र्यांनी नाडी पाहून अचूक औषध दिले. आणि चुटकीसरशी उचकी थांबली.

तशी भास्करबुवा खूष होऊन हसून म्हणाले–

"आम्हाला उचकी लागली की माझी कुणी आठवण करण्यापेक्षा मीच तुमची आठवण काढत जाईन."

शांताच्या हातात खाऊ देऊन अप्पासाहेब गेले.

एक दिवस ताईंनी विचारले–

"मी आपल्याला मुलगा देण्याऐवजी तिसरी मुलगीच दिली याबद्दल स्वारीला वाईट नाही ना वाटत ?"

झोपलेल्या शांताचा हलकेच पापा घेऊन बुवा म्हणाले–

"बिलकूल नाही. उलट या पोरीच्या पायगुणाने एका संस्थानचा पहिला

कार्यक्रम आला. म्हणून ती आम्हाला अधिकच प्रिय झाली आहे."

" मध्ये स्वारीला उचकी लागली होती ना? तेव्हा तान्हुवन्स शांतीवरच चालवत होत्या."

" हॅट ! तान्हुताई केव्हा केव्हा काहीबाहीच बोलते. माझा राजा तो–"

असे म्हणून त्यांनी झोपलेल्या लेकीवर पाप्यांचा वर्षाव केला. तशी ताई म्हणाल्या–

" काय हे. झोपलेल्या मुलाचा पापा घेऊ नाही."

तानुताई स्वयंपाकघरात नाहीसे पाहून बुवा हलकेच म्हणाले–

" काय करणार, जागी माणसे सोवळ्यात असतात ना ? त्यामुळे–"

" पुरे हं. वन्सं पुराणाहून यायची वेळ झालीय."

आणि ताई लाजून निघून गेल्या.

अलीकडे तानुताई चमत्कारिक स्वभावाच्या झाल्या होत्या. करकर काम करत होत्या. आणि मग उस्मरत होत्या. जिभेने उच्चारले तर पाप जळून जाते, तसेच पुण्यही जळून जाते, असे भास्करबुवा नेहमी सांगत असत. पण तानुताईला ते पटत नसे. उपकार उगाळायची तिला सवयच असे. मग थेट शेंबड्या भास्करला– हडकुळ्या भास्करला– कसे खाऊपिऊ घातले, त्याचा आल्यागेल्याजवळ पाढा वाचत होती. नवऱ्याला पोवाडा ऐकण्याची सवय झालेल्या ताईंना अलीकडे हा पाढा नकोसा वाटे.

सारांश या सर्व पार्श्वभूमीमुळे बहीण-भावंडांत विशेष घसट नव्हती. जवळीक नव्हती. जिव्हाळा नव्हता. मुलगी झाली असून भास्करबुवांनी आपल्या या आईच्या ठिकाणी असलेल्या ताईला जरीचे भारी आलवण घेतले आणि देवाला जाता-येताना पांघरायला यावी म्हणून पोक्त रंगाची भारी शालही घेतली.

ती साडी नेसून आणि शाल पांघरून तानुताई शंकरशेठच्या देवाला जाऊन आल्या, तेव्हा शेजारणी-पाजारणी टकमक पाहतच राहिल्या. पुष्कळशा बायकांचे लक्ष स्वतःच्या कपड्यांपेक्षा शेजारणीच्या कपड्यांकडे असते. स्वतःच्या घरापेक्षा शेजारच्या घराकडे असते.

त्यादिवशी तानुताईंचा चटपटीत पोषाख पाहून ताईंची शेजारीण कौतुकली–

" अगोबाई ऽ ! भावाने तानुताईंना साडीबरोबर शालही घेतलेली दिसतेय बारशाची."

सहसा कुणाला सहजासहजी चांगुलपणा द्यायचा तानुताईंचा स्वभाव नव्हता. त्या पटकन फिसकारल्या–

" काही नवल नाही. घेतलीन तर. बहिणीला साडी नेसवलीन तर. हक्काने बायकोचे बाळंतपण करून घेतलेन ना ? वरकामाची बाई– स्वयंपाकाची बाई–

मुले सांभाळणारी दाई– साऱ्या भूमिका करते मी या नाटकात.

या खेपांपायी अजून किती सेवा घालाव्या लागतील देव जाणे !"

बुवांनी शास्त्रीहॉलच्या गल्लीत शिरता शिरता बहिणीचे हे प्रलाप ऐकले, आणि त्या एकपाठ्या माणसाच्या डोक्यापर्यंत तो राग चढला ! ते तरातरा घरात शिरले ! ! आणि बाळंतिणीच्या खोलीतील ताईंजवळ जाऊन म्हणाले–

"हे पहा मी शिकवणीला जातोय."

"हे काय, आत्ता आलात नि लगेच निघालात ?"

"आमचं येणं-जाणं असंच असतं हे माहीत आहे ना ?"

"चुकले !"

बुवांचा गाण्यातला ताल जात नसे तसाच घरातलाही जाऊ नये, म्हणून ताईंनी सपशेल माघार घेतली. तोच भास्करबुवांनी आठ्या घालून विचारले–

"आज स्वयंपाक कोण करणारय् ?"

"वन्स बाळंतपण करायला आल्यात. अजून तीन महिने व्हायचे आहेत. म्हणून रोज त्याच करतात स्वयंपाक."

"रोज करू देत. इथून पुढे करायचा नाही."

"पण का ? आपल्याला तर त्यांच्या हातांची चव माझ्याहून आवडते."

"इथून पुढे नाही आवडणार. इथून पुढे तुम्हीच स्वयंपाक करायचा."

"भलताच काय हट्ट ? मी ओली बाळंतीण."

"ठीक. मग माईला– तुमच्या मोठ्या लेकीला सांगा."

"ती मिऱ्याएवढी पोर. धूर पाहिला की दूर पळतीय. ती काय चुलीशी लागणार ?"

"हांय ना ? मग तुम्ही करा. सांगून ठेवतोय. आज माझ्या बहिणीने स्वयंपाक केलेला असला तर मी जेवणार नाही."

आणि चट्चट् जोडा वाजवीत तानुताई घरात यायच्या आत बुवा पट्कन रस्त्याला लागले.

बाहेर ऊन कडकायला लागले होते. पण त्यांना छत्री घेऊन जा म्हणण्याचेही ताईंना भान राहिले नाही. बाकी त्यांना तसे भान राहिले असते तरी रागाने बेभान झालेल्या भास्करबुवांनी ते ऐकलेच असते असे मुळीच नाही.

रागाचं ऊन चढलं की मध्यान्हीचे ऊनही कोवळे होते !

भास्करबुवांचा आवाज जेवढा पिळदार होता तेवढा स्वभावही पिळदार होता हे ताई ओळखून होत्या. बरे तानुताई वक्रगतीत चालणाऱ्या. या कात्रीत काय करावे हे ताईंना समजेना. तोच शान्ताने पाळण्यातून सूर लावला. डोक्यावरचा ढळलेला पदर नीट करीत त्या पाळण्याकडे धावल्या. कलावंताच्या पत्नीला सगळेच

सूर सांभाळावे लागतात; कुठलेच वर्ज्य नसतात.

सुमारे दोन तासांनी शिकवण्या उरकून भास्करबुवा परतले. तानुताईंना कसलासा उपास होता, म्हणून त्या फराळ करून दारासमोरच्या व्हरांड्यातच लवंडल्या होत्या. त्यांचा नुकताच डोळा लागला होता. शान्ता पाळण्यात गाढ झोपली होती. माई आणि आक्का शाळेत गेल्या होत्या.

ताईच धडपडत उठल्या. ओट्याशी आल्या. त्यांनी स्वत:साठी ठेवलेले शेगडीवरचे गरम पाणी उतरवले. निखाऱ्यावर चार कोळसे घातले. आणि आमटी गरम करत ठेवली.

तोच कपडे बदलून न्हाणीघरात हात-पाय धुवायला निघालेल्या बुवांनी सांगितले—

"वाढा, वाढा. हा आलोच."

ताई सुखावल्या. त्यांनी झटकन् पान वाढले. बाळंतिणीच्या साजूक तुपातल्या शिऱ्याचा घास पतीराजांसाठी राखला होता तो त्यांनी मिठाच्या बाजूला सत्य-नारायणाच्या प्रसादागत वाढला.

भास्करबुवा पानावर येऊन बसले. ताईंनी गुपचूप पान वाढले. भास्कर-बुवांनी आपोष्णी घेण्यापूर्वी विचारले—

"स्वयंपाक कुणी केला ? माईने ?"

"अहं. आज तिची परीक्षा आहे."

"मग तुम्ही ?"

"मी दहादा करायला धावले. पण वन्संनी करू दिला नाही."

"म्हणजे तिनेच केला ?"

खालच्या मानेने खालच्या स्वरात उत्तर आले—

"अं ऽ ऽ अं– होय."

"मग आम्हाला जेवायचं नाही !"

बुवांचे एकदम तारसप्तक लागून गेले. काही दिवसांपूर्वीच काश्मीरच्या थंड हवेतून आलेले बुवा असे एकदम राजस्थानच्या वाळवंटात शिरले.

ताई कळवळून म्हणाल्या.

"अन्नब्रह्माचा असा अपमान करू नये."

"वाऽ ! खासा न्याय ! मी अन्नब्रह्माचा अपमान करीत नसून– सांगून-सवरून नको त्या माणसाच्या हातचं जेवायला लावून तुम्हीच आमचा अपमान करत आहात! "

"चुकले ! हे पहा अधणाचं पाणी आहेच. झटकन पिठलं-भात करते. मग

तर झालं ?"

तेव्हा नव्हते आत्तासारखे आज्ञा पाळणारे– शिट्टीत भाताची भट्टी शिजवणारे कुकर, नव्हते काडी लावली की हात जोडून स्वयंपाकाची नाडी संभाळणारे गॅस. तरीही त्या पतिव्रतेने न कुरकुरता– कपाळाला आठी न घालता चूल-वैल सर-सावली आणि पिठलं-भात केला. मग भास्करबुवा जेवले !

जेवताना म्हणाले–

" कलावंत आणि शीघ्रकोपी पतीला कसं जपावं याचा रियाज करायला सर्व गवयांच्या बायकांनी इथे यायला हवं." –मघाच्या तारसप्तकाचे एकदम मंद्रसप्तक होऊन गेले.

" इश्श !"

म्हणून त्या रसरशीत बाळंतिणीने असा काही मुरका मारला की भास्करबुवांच्या हातातला पिठल्याचा भुरका हातातच राहिला.

बुवा म्हणाले ते काही खोटे नव्हते. ते त्यांचे स्वानुभवाचे बोल होते. त्यात बिलकूल अतिशयोक्ती नव्हती. नंतरच्याच आठवड्यात सोबत पाहून भास्करबुवांनी तानुताईस पुण्यास पोहोचवले.

ताईंनी मग स्वतःच्या हातांनी सालंमिस्त्री, सफेदमिस्त्री, बदाम, खसखस, खोबरे, जायफळ, साखर, साजूक तूप घालून वड्या केल्या.

ते पाहून बुवा म्हणाले–

" डिंकाचे लाडू दुसऱ्याच्या हातचे म्हणून आम्ही उष्टावणार नाही. पण या साक्षेपाने केलेल्या वड्यांचा मात्र नैवेद्य दाखवणार बरं का."

ताई हसून म्हणाल्या–

" एकच नव्हे, साऱ्याच वड्यांचा दाखवायला हवा."

आणि त्यांनी ताटच बुवांपुढे ठेवले.

भास्करबुवा म्हणाले–

" काही देशस्थांकडे– वैष्णवांकडे सबंध स्वयंपाकाचा नैवेद्य देवाला दाखवतात हे मी दौऱ्यात पाहिले आहे. पण आपल्या कऱ्हाड्यांकडे तशी रीत नाही."

असे म्हणून भास्करबुवांनी एकच वडी घेतली. आणि चांदीच्या वाटीत ठेवून तिचा नैवेद्य दाखवला. एका घासात ती संपवून ते म्हणाले–

" वाऽऽ ! भारीच आरवाळ झालीय. एखाद्या रागात सगळे सूर एकजीव व्हावेत तसे सगळे पदार्थ एकजीव झालेत."

आणखी दोन वड्या पुढे करीत ताई म्हणाल्या–

" म्हटलं, उद्यापासून मी डिंकाचा लाडू खाईन तेव्हा स्वारीने चार वड्या खाल्ल्याच पाहिजेत."

" छान. बाळंतपणातून तू उठलीस म्हणून तुझं वजन वाढायला हवं ठीक. पण आमचं कशाबद्दल ?"

" वजनदार गाणाऱ्यानं वजनदार खाल्लंच पाहिजे. एरवी त्याची नि त्याच्या गाण्याची तब्बेत नीट राहणार कशी."

भास्करबुवा प्रेमभराने पत्नीला न्याहाळीत म्हणाले–

" इतकं सुंदर बोलाय्-वागायला तुम्हाला शिकवलं कुणी ?"

" सुंदर गाणाऱ्यांनी आणि सुंदर दिसणाऱ्यांनी."

...बुवांकडे तिरपा कटाक्ष टाकून ताई शांताकडे पळाल्या.

शांता बुवांची इतकी लाडकी होती की तिचा तिसऱ्या वर्षाचा वाढदिवस बुवांनी पक्का लक्षात ठेवला. एरवी जालंदरला मिळालेले कापडचोपड घरी येण्यापूर्वीच शिष्यांना वाटून टाकणारे भास्करबुवा या खेपेला किरमिजी रंगाचे रेशमी अंग असलेला, आणि वर जरीची चौकट असलेला फेटा थेटी घरी घेऊन आले. तशी आश्चर्य करीत ताईंनी विचारले–

" या वेळेचा फेटा स्वारीला फार आवडला ?"

" तुम्हाला नाही आवडला ?"

" आपली आणि माझी आवड एकच नाही का ? स्वारीच्या गोऱ्या रंगाला हा शिरपेच फारच मोहक दिसेल."

" बाईमाणसाला त्याहून चांगला दिसेल."

" याचा दुपट्टा करायला मी काय पंजाबीण आहे ? सांगावं ना कुणासाठी आणलाय् तो ?"

तोच अंगणात हुदडायला गेलेली शांता नाचत नाचत आली. फार दिवसांनी वडील आलेले पाहून ओरडली–

" आण्णा,ऽऽ आण्णा,ऽऽ"

भास्करबुवांनी अंगभर माती माखलेल्या उघड्या लेकीला थेट कडेवर घेतले. तशी ताई ओशाळून म्हणाल्या–

" घाणेरडी कुठली ! वडिलांचे टेसदार कपडे घाण केलेस ना ?"

" करू दे. मुलापेक्षा कपडे जास्त नसतात."

" हो, पण हा स्वारीचा स्पेशल प्रवासाचा पोषाख–"

" या चालत्या-बोलत्या मैफलीपेक्षा किमती नाही."

आणि मग तिच्या उघड्या अंगाभोवती तो फेटा लपेटून भास्करबुवा म्हणाले–

" तिच्या तिसऱ्या वाढदिवसाला परकर-पोलकं शिवायचं या फेटयाचं."

ताईंच्या मनाला आनंदाचं उधाण आलं. संगीतामुळे घरापासून दूर असणाऱ्या

या कलाप्रेमी पित्याला या बालिकेची ओढ आहे— आठवण आहे या जाणिवेने त्या विलक्षण सुखावल्या !

हा रेशीमधागा जपण्यासाठी की काय त्या माऊलीने त्या दिवशीच परकर-पोलके घेतले. रातोरात बसून शिवून टाकले. बुवा कुठेसे गाण्याला गेले होते. ते परत आले तरी कंदिलाच्या उजेडात ताईंचे काजं— बटण चालूच होते.

भास्करबुवांनी आश्चर्याने विचारले—

" शिंप्याला नाही टाकलंत शिवायला ?"

" नाही. उद्याच वाढदिवसाची घाई ना ? सोनार शिंपी कुलकर्णी आप्पा, यांची संगत नको रे बप्पा—"

आणि मग परकर-पोलके हृदयाशी धरून म्हणाल्या—

" शिंपी तो शिंपी. आई ती आई."

" खरंच. शिंपी फार तर रेशमाने शिवेल, पण आई आतडयाचे रेशीम लावून शिवणार. "

आणि ताईंच्या हातून ते परकर-पोलके ओढून घेत ते म्हणाले—

" काय देखणं शिवलंत हो. आत्ता घालून बघू या का ?"

" झोपेतल्या माणसाला उठवायचं नसतं. "

"आलं. लक्षात आलं."

गालातल्या गालात हसत भास्करबुवा कपडे बदलायला गेले.

दुसऱ्या दिवशी शान्ताचा वाढदिवस झोकात झाला. सर्व शिष्यगणांनी मिळून तिला पायांतल्या घुंगराच्या तोरडया केल्या. शंकरबुवांनी लाल लोलकाची कर्ण-भूषणे घेतली.

ते किरमिजी रंगाचे परकर-पोलके घालून—पायांत रुणुझुणु करणाऱ्या तोरडया घालून—कानांत डुलुडुलु हलणारे डूल घालून शान्ता नाचत नाचत बैठकीच्या खोलीत आली. तशी शिकवायची चीज बाजूला ठेवून बुवांनी बाल रामचंद्राचे वर्णन सुरू केले,—पुरिया रागात—

> ' ठुमके पग पायल बाजीवे ...झनन ।। धृ ।।
> जेहारे लेहारे अनुहट बिछुवे
> घुंगरूवा मोरा बाजे झनन ।।१।।

ताई ही चीज चालू असतानाच गुपचूप दारात आल्या आणि त्यांनी लेकीचे संगीतात वर्णन करणाऱ्या पित्याची आणि ते नाचत-ठुमकत ऐकणाऱ्या लेकीची फुलांनी हळूच दृष्ट काढून टाकली.

*

# एकवीस

लोकमान्य टिळक हे एकांगी विचार करणारे नेते नव्हते. राष्ट्रीयत्वाच्या दिशेने चालणाऱ्या अनेक देशी गोष्टींचा आदर करणारे होते. त्यामुळे परदेशीय सर्कसला शह देणाऱ्या प्रो. छत्र्यांच्या सर्कसला ते राष्ट्रीय सर्कस मानीत. त्याचप्रमाणे साहित्य आणि संगीताचीही मनापासून कदर करीत. त्यांना समाजात मानाचे स्थान मिळवून देण्यासाठी धडपड करीत. संधी मिळाल्यास कलाकाराचा सत्कार करीत.

नारायण राजहंसचे दिव्य गायन ऐकून कोल्हापूरास लोकमान्यांनीच या मुलाला तेरा साली 'बालगंधर्व' ही पदवी दिली. आणि त्यांनी ती सार्थ केली.

या बालगंधर्वांचा गुरू देवगंधर्व म्हणून अधिक गौरविला गेला होता. त्या देवगंधर्वाचा–भास्करबुवा बखले यांचा सत्कारही एकोणीसशे पंधरा साली स्वत: लोकमान्यांनी गायकवाड वाड्यातील गणेश उत्सवात केला. तेव्हा लोकमान्य म्हणाले–

"पं. भास्करबुवा हे आत्म्याचे संगीत गाणारे थोर गायक आहेत. पण त्यांनी स्वत:बरोबर श्रोत्यांचा आणि शिष्यांचाही आत्मा जागवला आहे.

विशेषत: मास्तर कृष्णराव आणि बालगंधर्व नारायणराव या उभयतांना लहान वयातच त्यांचा आत्म्याचा शोध घ्यायला लावला आहे. त्यांच्या गळ्यातले नादब्रह्म जागवले आहे.

या रत्नांना पैलू पाडणारा–अभिजात संगीत व नाट्यसंगीत यांचा दुवा सांधणारा– बहुजन समाजापर्यंत संगीत पोहोचवणारा 'या युगाचा ज्ञानेश्वर' म्हणूनच भास्करबुवांचा गौरव करायला हवा."

सत्कारानंतर दिले गेलेले जरीचे उपरणे बुवांनी जन्मभर प्रसाद म्हणून जपले.

बालगंधर्व आणि बालगंगाधर ही तत्कालोन महाराष्ट्राची दोन आराध्य दैवते झाली. पैकी नारायणला जनमानस मंदिरात स्थापण्याचे काम भास्करबुवांनी केले.

नारायण राजहंस हा शिष्य मिळाला तेव्हा या राजहंसालाही संगीत ग्रहण करताना नीरक्षीरविवेक करायला शिकवले पाहिजे हे भास्करबुवांच्या लक्षात आले.

उपजत गोड गळ्याची देणगी आणि सौन्दर्यदृष्टी असलेले हार्मोनियमपटु भाचुभाई यांचेप्रमाणे नारायणलाही याच दोन देणग्या जन्मजात होत्या. एकाच्या अंगुलीतून आणि दुसऱ्याच्या गळ्यातून जे उमटायचे ते मधुरच लागायचे. उसाला

गोडवा कुणी बहाल केलेला नसतो. तो कांडोऱ्या कांडोऱ्यातून थबथबलेलाच असतो. तसाच नारायणचा गळा होता.

त्याचा तो गोडवा नष्ट करता योग्य संस्कार करून–शास्त्रीय विस्तारही आटोपशीर करून–भास्करबुवांनी नारायणच्या गळयावर असे रसायन चढवले की त्यांचे मर्यादित आणि पुनरावृत्त संगीतही श्रोत्यांचे काळीज जिंकून गेले. त्यांना स्वरसम्राट करून बसले.

यापूर्वी श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांच्या नाटकातून उर्दू चाली आल्या होत्या. पण त्या उडत्या चालींना चिरंजीवीत्व नव्हते. त्या अल्पजीवी होत्या. तात्पुरत्या लोकप्रिय व्हायच्या, आणि मग विसरायच्या.

पण भास्करबुवांनी नारायणला हाताशी धरून शास्त्रोक्तवर आधारित, धीर-गंभीर, ठामलयीतल्याही चाली काढल्या.

उदा.– स्वयंवरातील 'नाथ हा माझा' आणि 'अनृतची गोपाळा' या अनुक्रमे यमन आणि सूरमल्हार रागातील चाली, मराठीच अंगडे-टोपडे घातले तरी मुळात त्या त्या ख्यालावर बेतलेल्या होत्या.

अभिजात संगीत आणि नाटयसंगीत या दोन्ही शाखांमधील बुवांच्या कर्तृत्वाची फलश्रुती हीच की बुवांनी या दोन्हीतले अंतर कमी करून त्यांना जवळ आणले. स्वतःच्या भारदस्त पण लाडिक चालींनी समाजाच्या सर्व थरापर्यंत ते पोहोचवले. आणि नाटयसंगीताला अभिजाततेच्या पायरीवर आणून बसवले.

तपस्येने विश्वामित्र राजाचा विश्वामित्र ऋषी झाला. ही प्रतिष्ठा इतक्या उंचीपर्यंत जाऊन पोहोचली की कोणत्याही बुजुर्ग गायकाची मैफलही नाटकातील एखाददुसरे पद म्हटल्याशिवाय पूर्ण होईनाशी झाली.

अशा तऱ्हेने नाटयसंगीताला ख्यालीसंगीताच्या बैठकीत आणण्याचे श्रेय पं. भास्करबुवांचेच. अर्थात या प्रकाराला योग्य अशा गळयाचा मास्तर कृष्णा आणि त्याच्या पाठोपाठ नारायण राजहंस असे दोन दैदिप्यमान शिष्य लाभले म्हणूनच हे काम सुकर झाले.

नारायण राजहंसाचे प्राथमिक शिक्षण बालवयात मेहबूब खाँ यांचेकडे झाले. आवाजात मधाचे माधुर्य होते. बुद्धीत अनुकरणाचे चातुर्य होते. या नव्या शिकवणीत भास्करबुवांचा संयम आणि योजनाबद्ध अभ्यासक्रम जसे पणास लागले.

या मुलाच्या दैवी गळयाला बिघडवून न टाकेल इतपतच तालीम बुवांनी दिली. यमन–बिहाग–भीमपलास–सारंग–भैरवी आदी सोपे राग नारायणाच्या गळयावर चढवले.

कधी कधी कंपनीत नारायणच्या समोर मास्तर कृष्णाचीही शिकवणी होई. त्या बुद्धिमान मुलाला एखादा अनवट रागाचीही तालीम दिली जाई.

एक दिवस अशीच कृष्णाची तालीम संपवून भास्करबुवा नाटक मंडळीचा जिना उतरू लागले. खालच्या पायरीवर जातात तो नारायण राजहंसाने स्वतःची पायरी सोडून कृष्णाचा पलटा घोटायला सुरुवात केली.

अशा तऱ्हेने नारायणने जीभ उचललेली पाहून बुवांना वाईट वाटले. ते उतरलेला जिना पुन्हा चढले. नारायणाच्या खोलीत डोकावून आवाज चढवून म्हणाले—

" नारायण, कृष्णाचे गाणे तुला पेलायचे नाही. आणि ते तू गायचेही नाहीस. कोकिळेने कोकिळेसारखे गायचे असते, आणि बुलबुलाने बुलबुलासारखेच गायचे असते. उभयतांचे कंठधर्म भिन्न असल्याने गायकीचे प्रकारही भिन्न असतात. समजलास ?

खबरदार चुकीचा रियाज केलास आणि गळयाचा गोडवा खलास केलास तर !"

वागण्यातच नव्हे तर गाण्यातही संयम हवा हा धडा नारायणाला त्या दिवशी मिळाला आणि तो जन्मभर पुरला. अर्थात ख्याल गाण्याच्या चिजा नारायणालाही मिळाल्या, पण त्या त्या पदाच्या अनुषंगाने.

मैफल मारणारा कृष्णा आणि रंगभूमी तारणारा नारायण एकाच गुरूने घडवले.

नव्याने स्थापलेल्या 'गंधर्व नाटक मंडळी'त संगीत दिग्दर्शक झाल्यावर जुन्या नाटकांतील सौभद्र–शारदा–मृच्छकटिक इत्यादींतील पदेही भास्करबुवांनी सुधारून घेतली. जुन्याची डागडुजी करून नव्याने बाजी मारणे सोपे काम नव्हते. हे करताना जशी त्यांच्यात मातेची ममताच संचारली.

अर्थात मूळ चालीच्या पायाला त्यांनी धक्का लावला नाही. तरीही बाल-गंधर्वांच्या लडिवाळ आग्रहासाठी भास्करबुवांनी सौभद्रातील शेवटची भैरवी दिली. आधीच्या साक्या दिंडयांत जिचे वेगळेपण अजूनही सिद्ध होते, ती सौभद्रातील बुवांची भैरवी म्हणजेच—

'बहुत छळियले नाथा......'

स्वतःचे विद्वत्तापूर्ण— स्वयंपूर्ण गायन विसरून ते सुगम, सोपे करणे म्हणजे आईने मोठाले घास लहान करून— कुस्करून— मऊ करून लडिवाळपणे लाडक्या तान्हुल्यांना भरवण्यासारखेच होते. आणि हे करतानाच नवे आश्चर्य घडले !

एक नवे— अति मनोहर— लडिवाळ— गोंडस— लोभस गाणे जन्माला आले. बालगंधर्वांच्या कंठातून जगाच्या पुढे आले. अवघ्या विश्वाला थक्क करून गेले !

बालगंधर्व करुण रस गाऊ लागले आणि यशवंतांसारखा कवी म्हणून गेला—

'शब्द न ते अश्रुहार देत गुंफुनी......"

लयीचे इतके अनंत डौल भास्करबुवांनी बालगंधर्वांच्या गळ्यात बसवले होते की जसे श्रावणातल्या सायंतनीचे घडी घडी बदलणारे रंगच तिथे विराजमान झाले होते.

स्वयंवर नाटकातील भास्करबुवांच्या चालींनी नटराजाला नवीन आभूषणे घडविली. रागदारीच्या बावन्नकशी सुवर्णाची काळाचा राकट हात फिरूनही न काळवंडणारी... न किटणारी... न विटणारी राजस आभूषणे ! पिढ्यान् पिढ्या ही गळ्यात घालून मिरवावीत अशी आभूषणे !!

स्वयंवराला चाली लावताना तर भास्करबुवा स्वयंवरमयच होऊन गेले होते.

'अहो येता जाता शयनी निजता ग्रास गिळीता'—
हरिभक्ताला हरिनाम आठवावे तसे भास्करबुवांना स्वयंवरच आठवू लागले.

तासन् तास ते कंपनीच्या बिऱ्हाडी असत. नारायणाच्या आरसपानी गळ्यावर नव्या चालीचा साज तरी चढवत असत अगर स्वयंवराचे नाटककार काकासाहेब खाडीलकर यांच्याशी चाल आणि शब्द यांच्याबाबत संगीत चर्चा तरी करीत असत.

त्यातल्या त्यात एक बरे होते की कंपनीचा मुक्काम शास्त्रीहॉलच्या जवळील नाना शंकरशेटच्या मंदिरालगतच्या धर्मशाळेत होता. त्यामुळे कितीही चकरा झाल्या तरी चक्कर येण्याइतके अंतर नव्हते.

बाकी तसे ते असते तरी बुवांनी पदांसाठी ती पदयात्रा हसतमुखाने केली असती.

संगीताच्या उपासनेत ज्याने गुरूला आपले हाड उगाळून लावण्याचेच बाकी ठेवले होते, त्याने चाली लावताना— संगीताच्या सेवेचाच तोही भाग समजताना हाडाची काडे केली तर नवल नव्हते !

त्या दिवशी ताईंनी मुद्दाम ओला नारळ आणि मिरची-कोथींबीर लावून तिन्ही मुलींचा वखेडा संभाळून जेवताना मटाराची उसळ केली होती.

भास्करबुवा पानावर आले. आणि चित्राहुती घालून वास घेत म्हणाले,

"वा ऽऽ उसळीचा वास मैलावरून येतोय् !"

आणि त्यांनी भाताआधी उसळीचाच घास घेतला. शेरा मारला—

"अहाहा ऽऽ ! बहोत अच्छा, ही जमलेली उसळ नसून जमलेली ठुमरीच आहे !"

ताई सुखावल्या. आज कितीतरी दिवसांनी स्वारी मनापासून जेवतेय् असे वाटून आणखी वाढणार तो जेमतेम पहिला भात जेवलेले बुवा मनाशीच गुणगुणू लागले——

'एकला नयनाला विषय तो ऽऽऽऽ जा ऽऽ हला'

आणि– आणि–

दुसऱ्याच क्षणी– पानाला नमस्कार करून ताटावरून उठून म्हणाले–

" जरा स्वयंवरातल्या रुक्मिणीच्या पदाची चाल सुचलीय– नारायणाला सांगून येतो."

" जेवल्यावर गेलात तर नाही का चालणार ?"

" नाही. जेवण मग जेवता येईल, पण चाल मग लावता येणार नाही."

आणि 'एकला नयनाला' घोळवीतच भास्करबुवा शंकरशेटच्या रस्त्याला लागले.

एवढी आर्तआवडीने केलेली उसळ अर्धवट खाऊनच पतिराज गेले म्हणून ताईंचे डोळे पाणावले. पण मग त्यांच्या लक्षात आले की त्यांच्या नयनाचा विषय एकले भास्करबुवा असले तरी भास्करबुवांच्या नयनाचा विषय एकले गाणे हाच होता.

आणि मग ताईंना आठवले–

हरिश्चंद्र-तारामतीचा अध्याय ऐकता ऐकता ते असेच भारावल्यागत उठले होते– तंबोरा घेऊन गुणगुणू लागले होते–

'करिन यदुमनी सदना
रुचिर सदन पतिमन सतींना...'

ती 'सती' ऐकताना ताईंच्या हातची पोथी तशीच राहिली होती आणि चाल जमल्याची पावती भास्करबुवांना घरातूनच मिळाली होती.

भास्करबुवा राजेरजवाड्यात जाऊन आले होते. राहून आले होते. तिथला राणीवस पाहून आले होते. ती सारी गर्भश्रीमंती– ती सारी शालीनता– ती सारी सात्विकता– ताईंनी त्या त्या ठिकाणी न जाता स्वयंवरातल्या भैरवीत अनुभवली–

नृपकन्या तव जाया
सुखविलासी सोडि ना विनया ।। धृ. ।।
वस्त्राच्छादना विरल कराया
भिजवता का मम काया
भार्या– सोडि ना विनया...

ताईंना वाटले– राजघराण्याची चाल माहीत म्हणून चाल चांगली झाली. राजमान्यता आणि लोकमान्यता मिळवून गेली.

गंधर्वांच्या रूपात सुरेलपणाचा व लयीचा एक नवा हवाहवासा– मधुरसा– आदर्श भास्करबुवांनी जनतेपुढे ठेवला. अखंड चारपाच वर्षे ही तालीम दिली गेली.

विशेष म्हणजे या पदांना लोकमान्यता लाभलीच, पण विद्वन्मान्यताही लाभली. अलादियाखाँ भास्करबुवांच्यावर पुत्रवत् प्रेम करीत याचे काही गवय्यांना

वैषम्य वाटे. हेवा वाटे. आणि ते संधी मिळेल तेव्हा खाँसाहेबांचे कान फुंकीत रहात कावळ्यासारखे चोची मारत राहत.

"तो भास्कर तुमची विद्या उपटतो आणि तिसऱ्यांचेच गातो."

"अहो, विचार करा. म्हणूनच गंडा बांधून घेत नाही. गंडा बांधून घेणार कुठला ? गुरूला गंडा घालणारा बम्मन आहे हा."

दोघांची कोल्हेकुई होते तोच तिसऱ्याने डोई मध्ये घातली.

"अहो, आपण एवढे अनवट, कूट राग शिकवूनही पालथ्या घड्यावर पाणी पडले ! तो वेगळ्या वळणाने गातो. हलकेफुलके गातो. टप्प्या-ठुमऱ्या काय, अष्टपद्या काय नि नाटकातली पदे काय. शीऽऽ शीऽऽ ! तुमच्या स्वरगंगेची याने गटारगंगा करून टाकली !"

आणि या खोट्यानाट्या कागाळ्यांवर कळस म्हणून एकाने अखेरची तक्रार गुदरली—

"भास्करभैय्या आपकी किंमती चीजे नाटकवालोंको सिखाते है। और आपकी अजीब कुसर सिर्फ गटरमे जा पडती है।"

ताव मारून खाँसाहेबांवर भाव खाण्यासाठी चाललेली ही खटपट या ना त्या रूपात रोजच चाले. स्वत: वर जाता आले नाही की वर चढणाऱ्याचे पाय ओढायची जगाची रीतच असते. सिंहाचे स्वयंसिद्ध वनराजपण काढून घेता आले नाही, हिसकावता आले नाही की अशीच कोल्हेकुई होत असते.

त्या दिवशी खाँसाहेबांच्या गुहेत अशीच कोल्हेकुई चालू असताना अचानक भास्करबुवा प्रकट झाले आणि सारे समजूनही न उमजल्यागत दाखवून त्यांनी नेहमीच्या अदबीने पाहुण्यांची चौकशी केली.

पण आजचा रंग काही न्यारा होता. ते भास्करबुवांवर जळणारे पाहुणे खाँसाहेबांना सांगत होते—

"आज नामी संधी आली आहे. चोर अनायसा समोर आला आहे. तरी सर्व दुर्वर्तनाची कारणे भास्करला विचारा. चांगला फैलावर घ्या."

बाकीच्यांनी कोरस केला—

"हो. हो. होऊन जाऊदेत फैसला."

अलीकडे हवा बिघडली आहे हे बुवाही ओळखून होते. कारण शिकवणेही अंग चोरून होत होते. सेवा करूनही अलादियांखाँ या गुणी कीर्तीमान शिष्याला नीट शिकवत नाहीत याची लाज वाटून त्यांचे बंधू हैदरखाँ— अलादियांना चोरून स्वतःला येणाऱ्या अनेक चिजा भास्करभैय्याला देत होते. इतकेच नव्हे तर घरात चाललेल्या बुवांच्या विरुद्धच्या मसलती आणि शिजणारे कटही कानावर घालीत होते.

आजचे पाहुणे हे त्या कटाचे साथीदार आहेत, हे चार स्वरांवरून राग ओळखणाऱ्या भास्करबुवांनी त्यांच्या चार शब्दांवरून ओळखले !

रोजच्याप्रमाणे भास्करबुवा तंबोऱ्याला हात घालणार तो अल्लादियांनी त्यांच्या काळजालाच हात घातला...

रोजच्यागत राग न छेडता त्यांनी रागाने छेडले–

" भैय्या– तुमने किस नाटकवालोंको अपनी चीजे सिखाई ?

आम्ही तुम्हाला आमच्या जामदारखान्यातील चिजांच्या मोहरा मोठ्या कौतुकाने बहाल केल्या– त्या तुम्ही खुर्दा म्हणून कुणा चंगीभंगी लोकांवरून उधळल्या काय ? गाण्याची नजर असून तुम्ही आमची ही कदर केलीत काय ! अरेरे ! तोबा तोबा !! दिवाणखान्यात घालायच्या काश्मिरी गालिच्याचे अखेर तुम्ही पायपुसणे केलेत ! तुम्ही आमचा विश्वासघात केलात ! तुम्ही जातीवर गेलात !"

थोर गुरू म्हणून एवढा वेळ सारा शाब्दिक मार मुकाट्याने सहन करणाऱ्या बुवांना आता मात्र अगदी राहवेना. कारण अवतीभवती जमलेले ते टोळभैरवही विजयाच्या उन्मादात–

'कशी जिरली एकाची ?' –असा भाव थोबाडावर आणून–

'बोलो– बोलो–' म्हणून गर्जना करू लागले. तेव्हा एक क्षणभर बुवांना कौरवांच्या वेढ्यात सापडणाऱ्या द्रौपदीची आठवण झाली. पण बुवांची मान खाली झुकून अपमान सहन करणारी नव्हती. त्यातच गुरूकडून स्वतःचा अपमान झाला असता तर एकवेळ त्यांनी सहन केला असता, पण संगीत विद्येचा अपमान त्यांना सहन झाला नाही.

ज्या विद्येच्या गालीच्याला त्यांनी नटराजाच्या दरबारात पदन्यासासाठी अंथरले त्याची ही विटंबना त्यांना सहन झाली नाही. तो नाट्यप्रेमी ताडकन् उद्गारला–

" असा आडून वार कशाला ? होऊन जाऊ द्या आमनेसामने. हा सूर्य आणि हा जयद्रथ ! मी म्हणतो हातच्या काकणाला आरसा कशाला ?

मी ज्या नाटकवाल्यांना गाणं शिकवलं– त्यांचं नाटकच आपण पाहा आणि मग मी कुणा माकडाच्या गळ्यात रत्न बांधलं, की राजबिंड्याच्या गळ्यात बांधलं ते तुमचं तुम्हीच ठरवा.

मी कुणा अयोग्य माणसाला गाणं शिकवलं असेल तर चारचौघात माझ्या श्रीमुखात द्या. हा बंदा डाव्या गालावर द्याल तर उजवा पुढे करील आणि तंबोरा जन्मभरासाठी खाली ठेवील !"

करारी भास्करबुवांचे हे तीव्र उद्गार ऐकताच खाँसाहेबही वरमले. हो-नाही

करता करता बऱ्याच काथ्याकूटानंतर त्यांनी नाटक बघायला यायचे कबूल केले.

योगायोगाने लगेचच्या रविवारी स्वयंवराचा प्रयोग होता. तो हाऊसफुल्ल गेला होता. पण या बड्या मेहमानांना खास पुढे मखमली खुर्ची टाकून जागा करून देण्यात आली.

नाटक सुरू झाले आणि बालगंधर्वांची चढ्या रंगतीची पदे ऐकून अलादिया खाँही रंगून गेले. त्यांच्या मनातला काक केव्हाच उडून गेला. ते चकोर होऊन संगीताचे चांदणे पिऊ लागले. मयूर होऊन मनोमन नर्तन करू लागले. रागाचा थयथयाट केव्हाच संपून गेला. कारण पदांचा सुरीला थाट– लयीचा घाट आणि साथीचा थाटमाट दृष्ट लावण्याजोगा होता.

यमन– भूप– बिहाग, रेशीमलड्या होऊन बालगंधर्वांच्या आरसपानी गळ्यातून उलगडत गेले...

आणि मग– मग आला तिलककामोद. मूर्तिमंत आमोद !

'मम सुखाची ठेव देवा...' रूपकमधले हे पद तर खाँसाहेबांनीच शिकवलेल्या, इतकेच नव्हे तर त्यांनीच बांधलेल्या चिजेवर आधारित होते. चिज होती–

'सूरसंगत राऽऽग विद्या...'

ते पद येताच भास्करबुवा नाट्यगृहाच्या बाहेर गेले आणि दरवाजातून छातीवर हाताचे स्वस्तिक करून उभे राहिले. धडधडत्या अंतःकरणाने तिथूनच खाँसाहेबांच्या चेहऱ्यावरची प्रतिक्रिया अजमावू लागले. त्यांच्या चेहऱ्यावरील चढ-उतार निरखू लागले. रंगभूमीवरील नारायणाकडे पहायचे सोडून एकटक त्या संगीत नारायणाकडेच पाहू लागले.

आता कुठली ठेवणीतली शिवी अगर भयंकर शाप हा संगीतमहर्षी देणार नाही ना ? या चिंतेने बुवांना ग्रासले. भास्करबुवांची नेहमीची प्रसन्न मुद्रा पाहता पाहता म्लान झाली !! त्या महर्षीचे तेज असह्य होऊन त्यांनी गप्पकन डोळेच मिटले !!!

तोच गाणे संपले. खाँसाहेबांचा चढा बुलन्द आवाज आला– "जीते रहो."

भान हरपून, आपण नाट्यगृहात आहोत– आणि समोर स्वयंवर चालले आहे हे विसरून खाँसाहेब आपले दोन्ही हात वर करून एकदम उभेच राहिले... आनंदाश्रूंना उधाण येऊन गदगदून हुंदके देऊ लागले. तोच पदाला 'वन्समोअर' मिळाला.

ती संधी साधून भास्करबुवा गुरूजवळ आले आणि पायाला हात लावून 'माफ कीजिये–' म्हणाले, तोच त्यांना उठवून कडकडून मिठी मारून अलादियाखाँ मनमोकळेपणे म्हणाले–

"माफी किसलिए ? हमारी तो दिलसाफी हो गयी. भास्करभैय्या, तू ज्या

डौलाने आणि वैभवाने मी दिलेली चीज मराठी मुखड्यात लोकांपुढे मांडलीस तशी ती कुणाच्याच गळ्यातून इतक्या शोभिवंतपणे उच्चारली जाणार नाही.

हे देवगंधर्वा– तुझा शागिर्द बालगंधर्व हा भूलोकीचा खरा गंधर्वच आहे. अरे, नारायणाच्या भरजरी गळ्यासाठी आज तू सोनेरी स्वरांचे महावस्त्र विणले आहेस. माझा तुला आशीर्वाद आहे की, ते युगे-युगे गेली तरी विटणार नाही. विरणार नाही. फाटणार नाही. आटणार नाही. काळपुरुषाच्या वादळातही अमरत्वाचा झेंडा फडकावीत राहील. ''

बुवांच्या डोळ्यांतही पाणी आले. गुरूच्या डोळ्यांतल्या राजापुरी गंगेला भेटायला ही भागीरथी धावली.

खाँसाहेबांच्या या अभिप्रायाप्रमाणेच एका ताज्या दमाच्या युवकलेखकाचा पत्ररूपी अभिप्रायही तत्कालीन तरुण पिढीचा प्रातिनिधिक ठरावा असाच होता–

'स्वयंवरा 'ने भारावलेल्या या तरुणाने लिहिले होते–

'' पं. भास्करबुवा बखले यांस–

बालके प्रल्हाद केशव अत्रेचा,

शि. सा. न. वि. वि.

आपण रंगभूमीवरच्या दोन चमत्कारांना जन्म दिला आहे. एक आपला चेला मास्टर कृष्णा आणि दुसरा आपलाच चेला बालगंधर्व. हे दोन जातिवंत गहिरे हिरे जन्माला घालणारे आपण साक्षात हिऱ्याची खनीच आहात.

खरोखर चतकोर कागदावर आपल्या अलौकिक कर्तृत्वाचे वर्णन करणे म्हणजे बचकेत महासागर पकडण्यासारखे आहे. कारण आपल्यागत स्वरसम्राट शतकातून एकदाच जन्माला येतो.

आपणास माहीत नसेल पण मी मूळचा सासवडचा प्रल्हाद केशव अत्रे. शिक्षणासाठी आमच्या सासवडच्याच सरदार पुरंदरे यांच्या पुण्याच्या वाड्यात राहतो. अक्कल नसून आपल्या मैफली वारंवार ऐकतो आणि 'आनंदाचे डोही आनंद तरंग–' अशा आनंदमेळी बुडून जातो.

हे पत्र म्हणजे आपण– आणि आपले उभयता शिष्य यांनी दिलेल्या आनंदाची कृतज्ञतापूर्ण दिलेली पावतीच होय.

जगात ज्ञानवंत पुष्कळ आहेत. पण आपल्यागत प्रतिभावंत विरळाच. निसर्गदत्त गायकीचा पुरुषही आगळाच.

नारदमुनी पाताळ, भूमंडळी आणि स्वर्गलोक अशा त्रैलोक्यात संचारत. तशीच आपली गरुड भरारी तिन्ही सप्तकांतून जात असते.

आजवर आम्ही नायक गाताना ऐकलेच नाहीत. विदूषकच ऐकले. पण

आपले दिव्य गायन ऐकले आणि ' आलाप तान मारीन तर श्रोत्यांच्या डोळ्यांतून पाणी काढीन–' अशी नवी म्हण मनात अवतरली. आपली सुष्ट गायकी दुष्ट भाव जसे खाऊन टाकते. स्वयंवरात आपण चाल दिलेल्या पदात रुक्मिणी म्हणते–

' रूप बली तो नरशार्दुल साचा
झणी विनाशी रिपूभाव मनिचा ।।धृ।।
खळा देखी मग भूल फेकी
नयन भाषण मनासी जिंकी
झणी विनाशीत स्वभाव रिपूचा ।।१।। '

हे वर्णन आपणास आणि आपल्या शिष्योत्तमास लागू पडते. नारायण राजहंस नावाप्रमाणेच राजहंस आहे. राजबिंडा आहे. देह-सौंदर्य आणि कंठमाधुर्य यांचा असा संगम ब्रह्मदेव एखाद्याच वेळी करू शकतो. इथून पुढे रसिकांना ' एकला नयनाला, विषय तो जाहला–' असे होऊन जाईल. ' यदुमनी सदना ' म्हणताना ' करीन रसिकमनी सदना ' असाच तुमचा शिष्य म्हणतो आणि महाराष्ट्राला जिंकतो. कारण बालगंधर्व फक्त ओठांनी गात नसतात. डोळ्यांनी गात असतात. सर्वांगांनी गात असतात... हृदयानी गात असतात. त्यांची गाणी म्हणजे अमृताची कारंजीच. काय बिशाद मनाची मरगळ जाणार नाही ?...

मास्तर कृष्णांचे लहान लहान आलापांच्या लालड्यांनी युक्तपदही खूप आवडले, हा कृष्णही पुढे रथीमहारथी होणार असे सांगून गेले. बहोत काय लिहावे ? प्रसन्न मुद्रा आणि उल्हसित वृत्ती या ऋद्धी, सिद्धी दारी म्हणूनच अमाप यश पदरी. बाजारी, व्यवहारी आणि कर्कश जमान्यात आपले चार सूर हाच आम्हाला आधार. तो जन्मभर पुरावा.

आपला बालक
प्र. के. अत्रे. "

*

# बावीस

शिष्यांना समज देण्याची बुवांची एक विलक्षण धाटणी असे. वाचणीही असे.

एकच एक पलटा घोटून गळा तयार करण्यावर बुवांचा कटाक्ष असे. तर शिष्य मंडळींना या गोष्टीचा नेमका कंटाळा असे. झटपट रंगारीवृत्ती किशोर वयात अधिक प्रबळ असते. पण कुठल्याही रागाच्या मुळापर्यंत पोहोचले तरच जवळ जवळच्या रागांच्या सरहद्दी संभाळता येतात असा बुवांचा विश्वास होता.

या बाबतीत बुवांचा शब्दांपेक्षा कृतीवर भरवसा होता. म्हणून एक दिवस पहाटे ते शिष्यवृंदाला घेऊन शास्त्रीहॉलमधून निघाले. भेंडीबाजारमध्ये खाँसाहेब बडेगुलाम अलीखाँ यांचे चुलते काळेखाँ रहात. त्यांच्या दाराशी बुवा मुलांना घेऊन गुपचूप उभे राहिले.

रियाज चालू होता. कोमल ऋषभ आसावरीचा एक पलटा कालेखाँ काळजी-पूर्वक म्हणत होते. ते सूर पहाट आणखी कोमल करत होते.

एकदा– दोनदा– दहादा. मुलांच्या कानात तो पलटा पुरेपूर भरल्यावर भास्करबुवा विद्यार्थ्यांना घेऊन– काळेखाँची गानसमाधी भंग न करता चौपाटीवर निघून गेले. नंतर दोन तास सागराची लय आणि मर्मर संगीत ऐकवले. आणि पुन्हा विद्यार्थ्यांचा जथा घेऊन भेंडीबाजारातल्या काळेखाँच्या दाराशी आले.

तंबोरे चालूच होते. काय आश्चर्य ! दोन तीन तास लोटले तरी कोमल ऋषभ आसावरीचा तोच पलटा त्या घरात ठाण मांडून बसला होता. दोन तास घासल्याने त्यावर नवी लकाकी आली होती. नवी तकाकी चढली होती.

कंटाळवाणेपणे– आळसटपणे नव्हे तर पहिल्याच उमेदीने हिरीरीने रियाज चालू होता. स्वर अन् स्वर दाणेदार होता. अचूक आपापल्या जागेवर चिकटत होता. मोड बिकट असून सहजजात वाटत होती. काठीण्य पुन्हा पुन्हा हाताळले की असेच कोमल होऊन जाते.

रियाज थांबल्यावर बुवा शिष्यांसह आत गेले. कालेखाँ हसून बुवांना उत्थापन देऊन म्हणाले, " वहाव्वा ऽऽ भैय्या भास्करच्या आगमनाने आमची सकाळ सुनहरी होऊन गेली. "

" पण आमची प्रभात आपणच यापूर्वीच कोमल केली आहे.

सफाईसाठी आणि हुकमीपणासाठी मेहनत किती व कशी करावी हे आपण माझ्या शिष्यांना शिकवलंत. "

मुले लाजली. कालेखाँच्या पाया पडून आपापल्या घरी गेली. दुसरे दिवशी-पासून न कंटाळता हिरीरीने पलटे घोटू लागली. हजारो व्याख्याने ऐकवण्यापेक्षा

एखादा विषय बिंबवण्यासाठी दोन उदाहरणे अधिक बोलकी असतात.

बुवांना कुणी स्वतःहून गुरुपण बहाल केले तर त्याच्यावरही बुवांचा कटाक्ष असे. गोविंदराव टेंबे म्हणून कोल्हापूरचा विद्यार्थी भास्करबुवांवर खूप लोभ करायचा, एखाद-दुसरी चीज घ्यायला अगर ऐकायला शास्त्री हॉलमध्ये बुवांच्या बिऱ्हाडी यायचा.

टेंब्यांना उपजत समज व तीव्र बुद्धी होती. पण गळा किरटा आणि मेहनतीचा कंटाळा. मग बुवांचे गाणे पेलावे कसे ? तरीही टेंब्यांच्या आधीच तयार झालेल्या हर्मोनियमवरच्या कसबाचे भास्करबुवांना कौतुक असे. पण फुकटचा मोठेपणा नको असे.

पण इतर अनेकांप्रमाणे बुवांचे शिष्यत्व मिरवण्याची टेंब्यांना इतकी हाव सुटली की त्यांनी मजाच केली–

कोकपखाँ म्हणून 'बँजो' वादक मुंबईत आले. त्यांनी टेंब्यांचे पेटीवादन ऐकले. खूष होऊन गुरूचे नाव विचारले. तशी गोविंदरावांनी दडपून सांगितले–

"पंडीत भास्करबुवा बखले."

दुसऱ्याच दिवशी कोकपखाँची व भास्करबुवांची गाठ पडली.

कोकपखाँनी बुवांच्या शिष्याची तोंडभरून स्तुती केली. तशी बुवा विनयाने म्हणाले–

"तो माझे एकटयाचेच वाजवत नाही. मधुमक्षिकेप्रमाणे अनेक ठिकाणांहून त्याने संगीतमधु जमवला आहे."

मात्र संध्याकाळी प्रत्यक्ष गोविंदराव टेंबे सामोरे येताच बुवांना राहावेना. त्यांची कानउघडणी करून बुवा म्हणाले–

"बॅन्जोवाले कोकपखाँ तुमच्या वादनाची तारीफ करीत होते बरं का. पण मी तुमचा उस्ताद असं भलतंच त्यांना काय म्हणून सांगितलंत ? खरं तर माझी ओळख होण्यापूर्वीच तुम्ही पेटीमध्ये नाव कमावलं आहे.

बरं, शिष्य म्हणवून घेता तर माझ्या सांगीनुसार गाण्याची मेहनत करीत नाही. तान पलटे घोकत नाही. खुल्या आवाजात गात नाही. मग माझ्यापासून तुम्ही मिळवता काय ? आणि मी तुमचा गुरू कसा ?"

टेंबे नम्रपणे म्हणाले–

"माझ्या व्यासंगाला काही शिस्त आली असेल– वादनाला आधार व पायाशुद्धी मिळाली असेल तर ती आपल्या खुल्या दिलाच्या शिकवणीमुळेच. ती शिकवणी आपल्या मैफलीतही चालू असते."

"माझं पहिलं गाणं ऐकल्याची आठवण आहे ?"

"का नसणार ? सुगंध शिंपीत वातावरणातील आग विझवीत येणारा,

गारव्याची बाग लावीत धावणारा पहिला पाऊस कुणी विसरतो काय ?

आपले गाणे ऐकेपर्यंत इतर सटरफटर गायकांनाच मी बुजूर्ग मानत होतो. हिमालय पाहीपर्यंत सह्याद्रीच मोठा वाटतो ना ?"

"तोही आपल्यापरीने मोठा असतोच की; गंगा-यमुना नाही, तरी गोदा-कृष्णांचे उगमस्थान असतोच की."

"होय. पण दोघांची जातच वेगळी. स्वर्गंगेला माथी धरण्याची ताकद फक्त हिमालयात असते. तशी सूरगंगेला पेलण्याची ताकद फक्त आपलीच."

स्वतःची स्तुती टाळत भास्करबुवांनी टेंब्यांना समेवर आणले.

"पहिल्या गाण्याबद्दल सांगत होतात."

"त्या दिवशी गिरगावांत चितोबा गुरव लगबगीने चाललेले भेटले. म्हणाले,

"बुवांची सकाळची बैठक आहे. एकही आलाप चुकता कामा नये. म्हणून जरा घाईत आहे."

"कोण बुवा ?"

"आमचे भास्करबुवा. भास्करबुवा बखले, आम्ही फक्त त्यांनाच बुवा मानतो. वनराज सिंह एकच. बाकीने कोल्हे-कुत्रे नगण्यच ! सिंहाची डरकाळी ऐकल्यानंतर कोल्हे-कुत्री अगर श्वानाचे केकाटणे कोण ऐकणार ?

आपण तर बुवा इतर बुवांचे गाणे ऐकायलाच तयार नसतो–

खरं सांगू भास्करबुवा–तोवर तुम्हाला मी पाहिलेही नव्हते, ऐकलेही नव्हते. त्यामुळे या एककल्ली शेऱ्याचा रागच आला. चितोबांना म्हणालो–

"इतरांची ऐसी की तैसी करणाऱ्या या बुवाला ऐकायला तुमच्याबरोबरच येतो."

आणि हे एक प्रकारचे आव्हान देऊनच मी आपले गाणे ऐकायला गुरवां-बरोबर गेलो. गाणे सुरू झाले होते. मोगऱ्याचे झेले उमलावेत त्याप्रमाणे देसी रागाचे झेले उमलत होते–

'मारे डेरे आवो–'

आपला देसी ऐकला आणि त्या मंतरलेल्या क्षणीच आपला झालो. ते सर्वांगपरिपूर्ण गाणे ऐकून झपाटून गेलो. स्वरांची सच्चाई–तालाशी लडिवाळ चढाई–आणि प्रसन्नतेची बढाई. अहाहा ऽऽऽऽ ! आपल्याला पाहिलं–आपल्याला ऐकलं आणि आपल्याला गुरुत्व बहाल करून बसलो. त्यानंतर आपली एकही बैठक चुकवली नाही..."

"आज मी तुम्हाला माझ्या गुरूंच्या गाण्याला घेऊन जाणार आहे."

"...कुणाच्या ?"

" कोल्हापूरच्या अल्लादियाखाँसाहेबांच्या."

शिष्यांचा गळाच नव्हे तर कानही तयार व्हावा, यासाठी धडपडणारे भास्कर-बुवा खरंच टेंब्यांना खाँसाहेबांच्या गाण्याला घेऊन आले. त्यादिवशी खाँसाहेब अनवट रागच जास्त गायले. बसंतीकेदार, नट बिहाग आणि असेच काही.

मैफलीहून परतताना भास्करबुवांनी विचारले—

" कसं वाटलं गाणं ?"

गोविंदराव प्रांजळपणाने उद्गारले—

" खरं म्हणजे समजलंच नाही ! डोक्यावरून गेलं ! त्यात रंजन नसून पांडित्य प्रदर्शनच वाटलं. भलतीच कूट गायकी हो ! आपल्याला अवघडदास पदवी दिली आहे मित्रांनी. तेव्हा आपणच पचवणार ही गूढ— कठीण गायकी."

" अहो आम्हालाही अजून ती कूट वाटते. ती तुम्हाला कूट वाटल्यास काय नवल !"

स्वतः तयार असून अल्लादियॉखाँच्या मागे बसणाऱ्या भास्करबुवांच्या स्वभावातला विनय पाहून टेंबे चकित झाले आणि घराकडे वळले. तेव्हा अल्ला-दियांच्या गाण्यापेक्षा बुवांच्या बोलण्याचाच विचार त्यांच्या डोक्यात अधिक घोळत होता.

भास्करबुवांचे आणि गोविंदराव टेंब्यांचे जिव्हाळ्याचे संबंध होते. टेंब्यां-च्यातली सुबुद्ध जाणकारी जाणून शास्त्रोक्त संगीताबद्दलच नव्हे, तर नाटच-संगीताच्या अनुषंगानेही अनेकदा चर्चा होत असे. दोघेही विषयातले मुरब्बी. त्यामुळे चर्चाही नाटचसंगीताइतकीच रंगे.

त्यादिवशी ताई पुन्हा पुन्हा पाने वाढल्याचा निरोप देत होत्या. पण तो कुणी कानीच घेत नव्हते. जसा कलात्मक नवरसांनी भोजनातील षड्रसांचा पराभव केला होता. कानांच्या पानांवरचे वाढप भाव खाऊन गेले होते.

" मला वाटतं बुवासाहेब, रंगभूमीवर काही संकेत असतात. स्वगत भाषणे—जनांतिक भाषणे— चौथी भिंत नसणे इत्यादी संकेतांप्रमाणेच नाटकात पद्य असणे हाही संकेत मानायला हरकत नाही. किंबहुना तसा तो मानला गेलाही आहे."

" आहे. पण गोविंदराव, तुमची पेटी जशी मैफलीची साथ असते तशीच पदांनी गद्याला साथ दिली पाहिजे. पूरक आणि प्रेरक साथ. पण तरीही या पद्याने गद्यावर कुरघोडी करायला न पाहिजे."

" अगदी बरोबर. कथावस्तूशी निकट संबंध असलेली व कथाप्रवाह पुढे ढकलण्याची ताकद असलेली पदे हवीत. ती तशी असली तरच उपयोग."

" बरोबर. कलात्मक रचनेचे भान ठेवताना, भावनाविष्काराचाही मान राखला गेलाच पाहिजे. मैफलीत संगीताचे राज्य असले तरी, नाटकात सारस्वताचे

राज्य मानले गेले पाहिजे. "

" बुवासाहेब, मला वाटतं, नाटककारांनी क्लिष्ट– किचकट रचना करू नयेत. आणि लोकांना कोडी घालू नयेत. कारण नाटकाचा ओघ विलक्षण जलद असल्याने ती कानांपासून मनापर्यंत आणि मेंदूपर्यंतही पोचली पाहिजेत. "

" गोविंदराव, सौभद्र– शाकुंतल– मृच्छकटीक या नाटकांतील देवल, किर्लोस्करांची पदे या कसोटीस उतरली म्हणून आजपर्यंत जिवन्त राहिली. रसाच्या गळ्यात रागाचा गळा घालून नेणारे असे हे थोर वाग्गेयकार !"

बुवांकडे अभिमानाने पाहत गोविंदराव उद्‌गारले–

" बुवासाहेब, आपणही पूर्वसुरींच्या पावलावर पाऊल टाकून चालणारे थोर संगीतकार आहात. याच नव्हे तर पुढच्याही शतकात रसिक रंगभूमी आपली ऋणाईत राहील.

कारण पदांना जे उच्चदर्जाचे संगीत आपण वापरलेत आणि प्रासादिक चालींच्या माध्यमातून श्रोत्यांपर्यंत पोहोचवलेत, त्यामुळे अभिजात संगीताची ओळख व आवड सुशिक्षितच नव्हे, तर अशिक्षित समाजालाही लागली. ही आपली अत्यंत अभिनंदनीय कामगिरी म्हणायला हवी. पूर्वीचे हरदासी वळणाचे संगीत आपण अस्सल खानदानी वळणावर नेलेत."

" होय. पण अती तिथे माती झाली नाही म्हणजे मिळविली. आमचे यश पाहून नाटकात मोकाट संगीत घुसले न पाहिजे. पदे सहज आली पाहिजेत. वेली-वर फूल फुलावे तशी सहज फुलली पाहिजेत. गुणगुणली गेली पाहिजेत."

तोच ताई आत सहजच गुणगुणल्या–

" बाई किती सांगू तुला."

तिखट कान करून बुवा म्हणाले–

" ते पहा, रंगभूमीचे संगीत थेट आपल्या स्वयंपाकघरापर्यंत पोहोचले. मला तर कधीकधी संभ्रम पडतो– सौभद्रातले गद्य कधी संपले आणि पद्य कुठे सुरू होते !

अहाहाऽऽ ! नाट्यवस्तूंशी एकजीव होणाऱ्या पदावर रसिक उगीच नाही अजून जीव टाकतात ते."

" उत्कट भावना अनुरूप गायनाने आविष्कृत करण्याचा नाट्यसंगीत हा रसिकमान्य प्रयोग आहे. प्रत्येक पदाला नाटकाची पार्श्वभूमी हवी, तसाच स्वभाव-परिपोषही हवा."

भास्करबुवा मिशीतल्या मिशीत हसून म्हणाले–

" हो. नाहीतर कुठल्यातरी भरमसाठ तसबिरी आगापिछा नसताना भिंतीचा पिच्छा पुरवतात, तसे व्हायचे."

" पण बुवासाहेब, काही प्रेक्षकांनाही वाईट खोड जडलीय की, एका नाटकाचे पैसे खर्च करून दोन-तीन नाटकांचे संगीत ऐकायचे, त्याचे काय ?"

" अहो, पण असले हे पदांचे अजीर्ण उद्याच्या संगीत रंगभूमीला तारक होण्याऐवजी मारक झाले म्हणजे ?

अहो गोविंदराव, वासुदेराव डोंगऱ्यांनी रागदारीचा वापर इंद्रसभा नाटकात केला, तेव्हा आमच्यागत प्रेक्षकांची सभा तटस्थ खाली. आणि मला वाटतं, मला संगीताची समज आल्यावर– बॅण्णव त्रॅण्णव साली असेल– पांडुरंग गोपाळ गुरवांचे, द्यूत विनोद नाटक विनोदी म्हणून पाहायला गेलो तर ते चक्क दर्जेदार संगीत नाटक निघाले. त्यात पासष्ट पदे होती. आणि जयजयवंती– वसंतबहार– बिहाग– सुहा अशा अनेक राग– रागिण्या होत्या.

चाली करताना हे सारे कुठेतरी डोक्यात असणार. मला नकळत पदावर आक्रमण करून गेले असणार. म्हणूनच स्वयंवर द्रौपदीचे यश माझे एकटयाचे नाही, पूर्वसुरींचेही आहे."

" बुवासाहेब, आपले मला नवल वाटते, आई मोठमोठे घास छोटे करून बाळाला घालते तसे मोठमोठे राग छोटया पदात घालून प्रेक्षकांपर्यंत पोहाचवलेत. या बाळकडूमुळेच मराठी संगीत नाटकाने बाळसे घेतले आहे."

बुवा हसून म्हणाले–

" होय, पण बाळकडूही प्रमाणात हवे. नाहीतर बाळसे जायचे नि सूज यायची."

" गायकानेही केव्हा किती गायचे ते समजून गायला हवे. नाहीतर रसहानी, प्रसादहानी व श्रोत्यांचीही हानी..."

" गोविंदराव, नारायणाला हे भान जबरदस्त आहे, बरं का."

" म्हणूनच या 'देवगंधर्व' पदवी मिळालेल्या आमच्या गुरूच्या चेल्याला लोकमान्यांनी 'बालगंधर्व' पदवी दिली."

" पण या गंधर्वाला पुढे ठेवूनच रचना झाली, तर नाटयवस्तूशी फारकतही व्हायची."

तोच ताई ताटे मांडीत अम्मळ मोठ्यानेच म्हणाल्या–

" आता अन्नाची आणि तोंडाची फारकत पुरे झाली, नाही का ? आता उनऊनीत खिचडी खायला चलता नं ? नाहीतर तुमच्या या गरमगरम चर्चेत खिचडी गार होईल, आणि पोह्याच्या पापडांची चिरगुटे होतील. आणि मग मलाच म्हणायला लागेल–

'वद जाऊ कुणाला शरण,
करील जो हरण
संकटांचे...'

गुरु-शिष्य हसले आणि हसत हसतच जेवायला बसले.

शिष्यांबरोबर गरमागरम चर्चा करणारे भास्करबुवा कधीकधी गरम सुद्धा होत. याचा अनुभव त्यांच्या शिष्यांना एकदा वेगळयाच प्रकाराने आला.

भास्करबुवा शिष्यांसह गुजराथच्या दौऱ्यावर निघाले होते. डब्यातही त्यांच्यातला गायक जागा झाला. ते शिष्यांना आगगाडीच्या 'झुकझुक' तालात आणि विशिष्ट लयीत बसतील अशा उडत्या चालीच्या चिजा सांगू लागले.

तबला, डग्गा, पेटी, तंबोरा आणि स्वतः बुवा हे पंचायतन असल्यावर, बुवांच्या हलक्याफुलक्या गाण्यातही शिष्यांना राम वाटू लागे. पण थोडयाच वेळात त्या रामाचा धनुर्धारी राम व्हायची वेळ आली. कुठलेसे बडे स्थानक आले आणि त्यात एक मुजोर माणूस वजनदार सामानासह घुसला. आणि शिरजोरी करू लागला. तशी बुवांनी सौम्यपणे समजावले–

" पलीकडे पार्सलचा डबा आहे. तिकडे हे सामान जाऊ दे."

त्या इसमाने रेल्वे आपल्या बापाचीच आहे अशा थाटात भिवई उंचावली. वक्र दृष्टीने बुवांकडे पाहिले. आणि आणखी सामान डब्यात भरण्यास सुरुवात केली. शिष्यांना हातपाय हालवता येईनात. धड श्वास घेता येईना. मग गाता कसे येणार ?

मग मात्र बुवांची सहनशक्ती संपली. त्यांच्यातली कधीकाळी वठवलेली कैकयी जागी झाली. रणरागिणी प्रकट झाली. मंद सप्तकातून ते एकदम तार सप्तकात गेले. अस्तन्या सरसावून दंड ठोकून ओरडले,

" मिस्टर, सामान डब्यातून बाहेर फेकून देऊ काय ? तुमची उचलबांगडी करून कायदा शिकवू काय ? मला संगीतातलाच नव्हे, तर सरकारी कायदाही समजतो."

हा रुद्रावतार पाहिल्यावर तो रेल्वे अधिकारी एकदम नरमला. विरमला. बुवांच्या हातीपायी पडला. त्याने सामान आपण होऊन पार्सलच्या डब्याकडे नेले. पण जाण्यापूर्वी शिष्यांसकट बुवांना चहापान आणि पानपट्टी देऊन गट्टी केली.

त्या दिवशी– भास्करबुवांचा जन्म 'कठोर' गावी झाला, ही ऐकीव बातमी खरी असल्याची प्रचीती सर्व शिष्यांना आली. त्यानंतर बुवांनी मुलांना डब्यात तराणा शिकवला.

*

# तेवीस

हली भास्करबुवा अधूनमधून नथ्थनखाँचे धाकटे चिरंजीव विलायत यांनाही शिकवायला भेंडीबाजारमध्ये जात असत. विलायतखाँचे हळूहळू नाव होऊ लागले होते. नाव कमावता कमावता ते पैसाही कमावू लागले होते. कुठून कुठून चिजा गोळा करून– त्यांची अभ्यासपूर्ण छाननी करून ' कोठीवाले गायक ' ही संज्ञा त्यांना हळूहळू प्राप्त होऊ लागली होती.

म्हणूनच एक दिवस त्यांनी भास्करबुवांना स्वच्छपणे सांगून टाकले–

" भास्करभैय्या, आता आम्ही भावंडे सु-स्थितीत आहोत. आपलाच आशीर्वाद आणि कारवाईमुळे चालायला लागल्यावर पांगुळगाडा कशाला. आपल्या प्रत्येक जलशात आजवर पुढे दामटलेत. चतकोरातले नितकोर भरवलेत.

अब्बाजानना अंत:काळी दिलेले वचन आपण अशातऱ्हेने पूर्ण केलेले आहे. सतत आर्थिक मदत करून आम्हाला लाजवू नये, कारण आपल्या पदरी तीन कन्या-रत्ने आहेत. आपलीही प्रापंचिक जबाबदारी वाढली आहे."

भास्करबुवांनी मदत करणे बंद केले. पण शिकवणे बंद केले नाही. त्यामुळे हा दुवा कायम राहिला.

आज त्यांचे स्वत:चेच एका ठिकाणी होळीकोत्सव म्हणून गाणे होते. त्यासाठी विलायतखाँची शिकवणी लवकर आटोपून ते जरा लवकर शास्त्री हॉलच्या घराशी आले. तो गाण्याला येऊ घातलेला शिष्यपरिवार घरात अगोदरच दाखल झालेला होता. भास्करबुवांच्या गायकीवर चर्चा करीत होता.

बुवा गुपचूप बाहेरच उभे राहिले. तो मनमोकळा परिसंवाद ऐकू लागले. मुंगीलासुद्धा आपल्या पायाने न दुखावणारे बुवा शिष्यांचा संवाद कसा दुखवणार ? ते संगीतातलेच नव्हे, तर संवादी सुरांचे जाणकार– विसंवादी सुरांचे नव्हे.

दत्तोबा बागलकोटकर म्हणत होते–

" बुवांची अस्ताई, अंतरा ऐकला की रसिकांचे पाऊण पैसे वसूल होतात. कारण तीच दमदारपणे रागस्वरूप सांगून जाते."

बापूराव केतकर ठासून सांगत होते–

" बुवांच्या गायकीतला गोडवा– भरीवपणा आणि वजन शब्दांच्या ताजव्याने तोलणारे नाही."

" म्हणूनच वाटतं खिडकीतून उडी मारून या गुरूकडे वळलात."

गणपत पुरोहितने विचारले. तशी बापूराव रंगात आले–

" तेव्हा मी अब्दुल करीमखाँ साहेबांकडे शिकत होतो. आम्हाला किराणा

घराण्याशिवाय अन्य कुणाचे गाणे ऐकायला मज्जाव करण्यात आला होता. पण स्वरांना कोण मज्जाव करणार ?

एक दिवस वाऱ्यावर वहात अडाण्यातली 'मुंदरी मोरी' ही रसिली चीज माझ्या कानांच्या पायवाटेवरून थेट हृदयात शिरली. मला निमंत्रण देऊ लागली. अस्वस्थ करू लागली !

गल्लीत कुठे या गणपती बसला होता. तिथे कुणाचेसे आक्रमक मधुर गायन चालले होते. अडाणा माझा अजून झाला नव्हता. पण मलाच नव्हे तर अडाणी माणसालाही समजावा इतका सहज सोपा करून आळवला जात होता.

मी भारावलो. माझे पाय तिथे जाण्यासाठी वळवळू लागले. कान ते जादूभरे गाणे ऐकण्यासाठी घाबरे झाले. मी घाईघाईने माडीच्या पुढीलदाराशी आलो. हाय रे दैवा !

दार बाहेरून बंद केलेले होते. मी पळून जाऊ नये म्हणून, दुसरे तिसरे ऐकू नये म्हणून. पण 'अडाण्याने' माझ्यावर चेटूक केले होते. माझे भान हरपले होते. केवळ कान शाबूत होते.

त्या धुंदीतच मी माडीच्या मागील बाजूस पाहिले. बिनगजाची खिडकी उघडी होती. खिडकीला लगटून म्युनिसिपालटीचा दिव्याचा खांब उभा होता. गाणे पकडण्याआधी त्याला पकडला. सुर्रर्रकन् मेंढ घ्यावी तसा त्यावरून खाली उतरलो, आणि थेट मैफलीत पोहोचलो."

"भास्करबुवा गात होते ?"

कुणाचेसे कुतुहल.

"अंहं. आपले गुरूबंधू मास्तर कृष्णराव. मी मग त्यांचा पिच्छा सोडला नाही. गाणे शिकवा म्हणून मागे लागलो. तशी ते म्हणाले–

"मी अजून अपूर्ण आहे."

"माझ्या दृष्टीने पूर्णच आहात."

तेव्हा मास्तर कृष्णा त्यांच्या मिस्कील शैलीत म्हणाले–

"तळ्यातला चंद्र म्हणजे खरा चंद्र नव्हे, ते केवळ त्याचे प्रतिबिंब. त्याप्रमाणे शिष्याच्या गळ्यातला गुरू म्हणजे पूर्ण गुरू नव्हे, ते केवळ गुरूचे प्रतिबिंब, तेव्हा माझ्या गुरूकडे चला. ते शिकवनील."

आणि त्यांनी हात धरून इकडे आणले."

"भले बहाद्दर ! म्हणूनच बुवा मनापासून विद्या देतात तुम्हाला."

कुणीसे म्हणाले. तशी जगन्नाथबुवा पंढरपूरकर नाक चढवून म्हणाले–

"तसं नाही हं. मलाही पुण्याच्या पर्वती मंदिरात गाऊन पोट भरेना म्हणून हाताशी घेतलं आहे. या हिमालयाची एक चढण गळ्यावर चढली तरी भरून

पावेल. मला त्यांच्या ख्याल गायकीपेक्षा सुगम संगीताचीच ओढ आहे."

"म्हणूनच पात्र पाहून दान करणारा आपला गुरू तुम्हाला अष्टपद्या नि दोहे शिकवत असावा."

मणेरीकर मास्तर मध्येच म्हणाले–

"आपल्याला बुवांच्या तीन सप्तकात फिरणाऱ्या तानेचेच वेड आहे."

"त्यासाठी गळा घोटावा लागतो महाराजा."

गणपत पुरोहितांनी घोडे दामटले.

"फैजमहम्मदखाँ– नथ्थनखाँ आणि अलादियाखाँ या तीन उस्तादांच्या शिकवणीत स्वतःच्या स्वतंत्र प्रतिभेची भर घालून बुवांनी भगीरथ प्रयत्नांनी जी स्वरगंगा भूतलावर आणली आहे, त्याचे मूल्यमापन करण्यापेक्षा–

त्या गंगेत एखादी बुचकाळी मारण्याची पुण्याई गाठी आहे, त्याबद्दल भगवंताचे आभार मानू."

एवढा वेळ न बोललेला यशवंत ठाकूरदास म्हणाला–

"मी बुवांकडे का येतो सांगू ? अरे दगडावर सूर्यप्रकाश पडला की दगडही तेजस्वी दिसतो म्हणून."

त्याचा दगड सगळ्यांना रगड हसवून गेला. तेवढ्यात गाण्याची कदर आणि मैफलीची नजर आलेले बापूराव केतकर म्हणाले–

"मंडळी, सगळंच मुसळ केरात, गाणं गळ्यात उतरलं आणि चेहऱ्याला विसरलं तर सब झूट."

"गाण्याचा आणि चेहऱ्याचा संबंधच काय ? सांगा या गणपतला."

"लोक गाणं ऐकायला येतात, म्हणजे आनंद लुटायला येतात. तुम्ही जर लंबाडा चेहरा करून– कुणाच्या दहा दिवसांत असल्यागत चेहरा टाकून अगर गाणं ही व्याधी असल्यागत कपाळभर आठ्या घालून बसलात तर मैफलीला हुकलात म्हणून समजा."

"बापूराव, सर्वांनाच तुमच्यासारखा बोलका चेहरा कसा असणार ? अभिनय अंगी कसा असणार ? सौंदर्य कसे असणार ?"

"रागाचे सौंदर्य नसानसातून भरले की, ते चेहऱ्यावर प्रकट झाल्याशिवाय राहणार नाही. या अतिंद्रिय सौंदर्याचा नाकडोळ्याच्या सौंदर्याशी संबंध नाही.

पण गायकीचे सौंदर्य नसेल असा मदनाचा पुतळा माकडाचा वंशज असल्यागत चेहरा करू लागला तर श्रोतेही माकडचेष्टा करू लागणार."

तोच दातार मास्तर म्हणाले–

"बुवांच्या मैफलीत रागसिद्धी झाली की, श्रोत्यांच्या डोळ्यातून आनंदाश्रूंची सिद्धी होते. ठुमरीवाले मोजुद्दीनखाँ म्हणतात त्याप्रमाणे–

"या रागाच्या भोवती बुवांनी तारुण्यभर घिरट्या घातल्या आहेत. प्रत्येक स्वराच्या कणाकणाला पिसून काढण्यात त्यांनी हाडाची काडं केली आहेत. म्हणून ही दाद मिळते आहे.'

तोच बळवंतराव बर्वे म्हणाले—

"आम्ही पोस्टातली माणसं. तिकिटाच्या शिक्क्यावरून आम्ही त्याची किंमत ठरवणार. पण बुवांच्या गायकीतील तीन-तीन शिक्क्यांची गायकी किंमत करण्या-पलीकडची आहे. म्हणून आम्ही आपला त्यातला डौलच उचलतो. आणि ते गुरू म्हणून डौल मिरवतो."

तोच पिगे वकील म्हणाले—

"आम्हाला वकिलीची सनद मिळेपर्यंत या खोलीत यायला मज्जाव होता हं मंडळी."

"तरी तुम्हाला चिजा कशा येतात ?"

"अहो, आम्ही यायचे, बाहेर खिडकीखाली उभे रहायचे, चोरून चिजा ऐकायचे. हातावरही चिजा टिपल्या म्हणून चिजा श्रेष्ठ."

तोच सर्व शिष्यगणांना चहा घेऊन ताई सामोऱ्या आल्या, तशी त्या मानस-पुत्रांनी एकच गिल्ला केला—

"वहिनी, तुम्ही बुवांना रात्रंदिवस ऐकता तेव्हा आमच्यापैकी बरोबर कोण याचा तुम्हीच फैसला करा."

ताई हसून म्हणाल्या—

"तुमच्यापैकी प्रत्येकजण आपापल्या परीने बरोबर आहे बरं का ! पण तुमची अवस्था हत्ती आणि आंधळे यांच्या गोष्टीप्रमाणे आहे बरं का."

"सांगा सांगा. ती गोष्ट सांगा."

तो लडिवाळ हट्ट. प्रेमळ ताईंना मग पुरवावाच लागला. महनुभाव पंथातली ती गोष्ट त्या सांगू लागल्या—

"एका गावातून एक हत्ती चालला होता. जवळ चार आंधळ्यांची माळ बसली होती. त्यांनी डोळ्यांनी नाही तरी स्पर्शाने हत्ती पहायचे ठरविले.

एकाने पाय चाचपला, त्याला वाटले हाच हत्ती, तो ओरडला,

"समजला— समजला. हत्ती समजला. हत्ती मुसळासारखा असतो."

तोच दुसऱ्याने हत्तीचे कान पकडून म्हटले—

"एकदम चूक ! हत्ती सुपासारखा असतो."

तिसरा हत्तीची शेपूट कुरवाळीत म्हणाला—

"अहा रे मूर्खांनो, हत्ती चवरीसारखा असतो."

चौथा हत्तीची पाठ रगडून म्हणाला—

"हत्ती अंबारीच्या आकाराचा असतो."

झाले ! त्यांच्यात एकच हमरी तुमरी माजली. तोच हत्तीचा माहूत तेथे येऊन म्हणाला—

"बाबांनो, तुम्ही सगळे बरोबरही आहात नि चूकही आहात. तुम्ही हत्तीच्या एकेका अवयवाचे बरोबर वर्णन केलेत म्हणून बरोबर, पण त्या अवयवालाच हत्ती समजलात म्हणून चूक ! आता सर्वांचे वर्णन एक करा आणि होईल तो हत्ती— तसेच तुम्हा सर्वांचे वर्णन एक करा म्हणजे मिळतील ते ––"

"हे भास्करबुवा !"

–बुवा हसत हसत आत येत म्हणाले,

"चला, दूध आणा. आमची निघायची वेळ झाली."

दूध घेऊन– मैफलीचे कपडे करून बुवा शिष्यपरिवारासह एका प्रख्यात वकिलाच्या घरी गाण्याच्या जागी पोहोचले.

तो काय आश्चर्य ! त्यांच्या आधी एका गायिकेला बसवण्यास आले होते ! आणि ती गोवेकरीण लावणी म्हणत होती ! ! ! बनारसी शालू नेसलेली. अंगभर साज ल्यालेली, डोळ्यांत सुरमा भरलेली आणि ओठात पान रंगलेली ती गायिका हावभाव करीत, आदा करीत होती. गाणे मादक होते. श्रोते धुंदफुंद झाले होते. साजिरी-गोजिरी मदनाची मंजिरीच जशी. सूर नव्हे, सुराच उधळीत होती.

भास्करबुवांना शिष्टाचार आवडत होते. ते त्यांच्या अंगोपांगी मुरलेलेच होते, पाण्यात गारवा मुरावा तसे ! म्हणूनच स्वत:च्या अस्तित्वाची जाहीर जाणीव न देता ते शिष्यपरिवारासह गुपचूप मागे जाऊन बसले.

तोच वकीलसाहेब लगबगीने बुवांजवळ जाऊन म्हणाले—

"आज श्रोत्यांकरता बदामयुक्त भांगही घोटली आहे, थोडा प्रसाद घेणार काय ?"

"आम्ही गाताना नशा करत नसतो. गाण्याची नशा चढवत असतो. घरून दूध घेऊनच आलो आहे."

बुवांचा निग्रह पाहून त्यांनी आग्रह मागे घेतला. बुवांच्या शिष्यांना वागणुकीचा वास्तूपाठही अनायासे मिळून गेला. तोच बाईंनी टिपेचा सूर लावला—

"चांदणं काय सुंदर पडलं—
 त्यात पाखरू तुम्हासारखं अवचित सापडलं."

बुवा लक्षपूर्वक ऐकू लागले. आणि त्यांना उगीचच वाटले—

"शब्दांचे चांदणे मादक असले तरी सुरांचे चांदणे आणखी मोहक असायला हवे होते."

त्या लावणीनेच बाईने तंबोरा खाली ठेवला. ती उठली. पान खाऊन निघून

जाऊ लागली. तशी लगबगीने पुढे होऊन भास्करबुवांनी विनंती केली,

"बाई, आपण बसा, या भास्करबुवाचेही थोडे ऐकून चला."

बाई कुऱ्यात म्हणाली–

"आपण अल्लादियाखाँचे शिष्य. ती कूटगायकी मला समजणार नाही. आम्ही हलकं फुलकं गाणाऱ्या."

–नाकातली चमकी वरखाली करीत ती निघाली. तशी बुवा हसून म्हणाले–

"आज ती गायकी मी ऐकवणार नाही. कारण आजचा श्रोतृवर्ग तुमच्या गायकीचा आहे."

काहीशा नाईलाजानेच बाई बुवांच्या समोर बसल्या. बुवा बैठकीवर जाऊन बसले. टाळ्यांचा हा गजर झाला. वातावरण काळी पाचचे होते. हवा लावणीची होती. हे लक्षात घेऊन बुवांनी काळी पाचचेच तंबोरे लावले. तो स्वर बुवांच्या कंठात येण्यापूर्वी ऐकणारांचेच प्राण कंठात आले !!!

पण ते भास्करबुवा होते. कुणी आशुक माशुक गायक नव्हते. आयुष्यात अनेक आव्हाने स्वीकारलेले होते. ते या जनानी आव्हानाला थोडेच घाबरणार होते ?

त्यांनी क्षणभर डोळे मिटले. प्रथम सर्व गुरूंचे स्मरण केले. आणि नंतर भाऊराव कोल्हटकरांचे बंधू– उस्ताद आप्पाराव कोल्हटकर यांचे स्मरण केले. कारण त्यांच्याकडून टप्प्याच्या अंगाच्या आणि बहुरंगी ढंगाच्या अनेक लावण्या त्यांनी कंठगत केल्या होत्या.

आणि म्हणूनच श्रोत्यांचा वकूब ओळखून आणि बैठकीचा रागरंग लक्षात घेऊन भास्करबुवांनी रागातली चीज नव्हे तर अनुरागातली लावणी चक्क सुरू केली,

'काठेवाडी घोड्यावरी...

श्रोत्यांच्या अपेक्षा पुऱ्या करणाऱ्या त्या यशस्वी गायकाने लावणीची उपेक्षा न करता लावण्यगीत म्हणून तिला गळ्याशी धरले तेव्हा श्रोते चकित झाले.

"हाय हाय ऽऽ!" म्हणून श्रोते दाद देऊन गेले. शब्दांना साजेसा हावभाव आणि चेहऱ्यावरचा भाव पाहून, भास्करबुवा श्रेष्ठ गायकच नव्हे, तर श्रेष्ठ नटही आहेत, ही गोष्ट बाईला समजून चुकली. लावणी संपताच ती उठली. आणि बुवांच्या पायावर पडून ती म्हणाली–

"आज आपण माझ्या लावणीतलेही गुरू झालात ! पण गुरुदेव, पुष्कळ बुजुर्ग लावणीला तुच्छ मानतात पण आपण तिचा गुच्छ करून श्रोत्यांना बहाल केलात."

बुवांचे तेजस्वी डोळे आणखी चमकले. ते म्हणाले–

" बाई– लावणी म्हणजे लावण्यगीत. गायकाच्या गळ्याला कुठलेही लावण्य वर्ज्य नसते. मग ते ख्यालांचे असो– ठुमरीचे असो, नाहीतर लावणीचे असो. फार काय लोकगीतांतली प्रियतमाने प्रियेला या डोंगरावरून त्या डोंगरावर घातलेली पहाडी धूनही हीन नसते. तो सुरिला आर्त पुकार असतो. मंदिरातला देव जेवढा पूजनीय, तेवढाच माळावरचा देवही पूजनीय नसतो काय ?"

या सखोल वक्तव्याने बाईच नव्हे, तर सारी सभाच अवाक् झाली ! तटस्थ झाली ! !

तोच वकीलसाहेब म्हणाले–

" आपल्या सहवासात असतो तर आम्हीही काही उचलले असते."

बुवांनी थट्टा केली–

" आपली उचलेगिरी वेगळी, आणि आमची वेगळी !"

आणि सभा हास्यरंगात भिजून गेली.

*

# चोवीस

भूगंधर्व रहिमतखाँ अवलीया होते. हा खानदानी गायक अफूच्या आहारी जाऊन बनारसला रस्तोरस्ती वणवणत असायचा. गाण्याला आठ आणे घेऊन मिठाई विकत घ्यायचा. आणि पुन्हा तारेत जायचा. गुणग्राही सर्कसवाल्या छत्र्यांना तो दिसला. गालीच्याला पायपोसाची किंमत आलेली पाहून त्यांचा जीव गलबलला... हळहळला...

त्यांनी त्याला जवळ केले. आपले मानले. कारण ब्रह्मदेवाचा डोळा चुकवून हा गंधर्व स्वर्लोकी न जाता भूलोकी आला असावा, असा त्यांचा आडाखा होता. रहिमतखाँ हे प्रसिद्ध बुजुर्ग गायक ग्वाल्हेरचे हद्दूखाँ यांचे कनिष्ठ चिरंजीव होते. बहुधा बनारसी ठुमरीच्या ओढीनेच ते घरदार सोडून बनारसला आले असावेत.

छत्रेबंधूंनी त्यांना माणसात आणले. त्यांचे व्यसन काबूत आणले. त्यांना मोठमोठ्या शहरी गायला लावले. आणि त्यांची कला प्रकाशात आणली. छत्रे नावाप्रमाणे त्यांनी खरोखरच त्यांच्यावर छत्र धरले.

आवाज अती मधुर. हा माणूस गायला लागला की, बिनबियाची द्राक्षे कानांनी खात आहोत असा श्रोत्यांना भास व्हायचा. साधा षडज् लागला की

सभेची शुद्धच हरपायची !

मात्र हा लहरी माणूस कधी कुणाला चांगले म्हणायचा नाही. कोल्हापूरच्या देवल क्लबमध्ये संगीत महोत्सव चालू होता. सभागृहाच्या बाजूच्या खोलीत भूगंधर्व अफूच्या तारेत पाय लांब करून डोळे मिटून पडलेले असत– गंभीर चेहऱ्याने, न बोलता.

आणि एक दिवस एकाएकी त्यांना काही वजनदार ऐकू आले. धीरगंभीरत्व जाणवले. संगीततत्त्वातून परतत्त्व स्पर्श करणारी ती गायकी ऐकून रहिमतखाँ खाडकन उठून बसले. आणि त्यांनी विचारले–

"ये कौन गाते है ?"

"भास्करभैय्या बखले."

"ये पंडत है ?"

"हां जी."

"नही नही, यह खाली पंडतका गाना नही, ये हड्डीका गाना है !"

तेवढ्यात एक सुन्दर जागा गेली. जशी रेशमाची लडी उलगडत गेली.

अस्ताईचा एक शिस्तशीर मुखडा बांधून भास्करबुवा समेवर आले. तशी रहिमतखाँ एकदम ओरडले–

"वाहव्वा ऽ !"

आणि त्या स्वर्गीय स्वरांना उत्थान देऊन त्यांचा बहुमान करण्यासाठीच की काय हा भूगंधर्व उठला. अस्ताव्यस्त फेटा कसाबसा सावरला. आणि म्हणाला–

"अब, गाना शुरु हो गया है। अब मुझे वहाँ, मैफीलमे जानाही पडेगा."

आणि ताडताड पावले टाकीत ते बैठकीच्या समोर येऊन बसले. समोर उगवलेला तो रसिकचंद्रमा पाहून, बुवांच्या कलासागराला भरती आली. त्यांच्या स्वरलहरी आभाळाला भिडल्या. व बैठकीत बसलेले अलादियाखाँसुद्धा उद्‌गारले–

"वा ऽऽ वा ऽऽ ! भास्कररावांनी सुंदर मैफल सजवली."

कोल्हापूर सर करून– रहिमतखाँची शाबासकी घेऊन भास्करबुवा मुंबईला आले तेव्हा आणखी एक महत्त्वाची व्यक्ती बुवांची वाट पहात होती. ती व्यक्ती म्हणजे गांधर्व महाविद्यालयाचे संचालक पं. विष्णू दिगंबर पलुस्कर. भारतीय संगीताचे प्रचारक आणि प्रसारक या नात्याने पं. विष्णू दिगंबरांनी केलेली कामगिरी इतिहासाला विसरता येण्यासारखी नाही. सुवर्णाक्षरांनी लिहून ठेवण्याइतकी ती मोठी आहे.

पं. विष्णू दिगंबरांनी उत्तरेला जाऊन दक्षिण आणि उत्तर यांच्यात संगीतमय सेतूच बांधून टाकला. आणि गायक-वादकांची आवक-जावक सुकर केली. पायवाट पाडून दिली. पुढे ती थेट राजरस्त्याला भिडली.

अशा या पलुस्करांनी एकोणीसशे अठरा साली गांधर्व महाविद्यालयातर्फ पहिली संगीत परिषद घेण्याचे ठरविले. हिंदूस्थानभरच्या गायक वादकांचा दर्जा ओळखण्याची हिम्मत असलेले पं. विष्णू दिगंबर यांनी या परिषदेत दक्षिणेपासून उत्तरेपर्यंतच्या बुजुर्ग कलाकारांना पाचारण केले.

अर्थात या मेळाव्यात जालंदरला अनेक वर्षे सुवर्णपदकाच्या मानकरी होणाऱ्या आणि महाराष्ट्रात यशाची ललकारी मिळवणाऱ्या भास्करबुवांना विसरणे शक्यच नव्हते.

भास्करला वगळून तारामंडळ होत नसते हे ते जाणून होते. पण पूर्वीचे काही रुसवेफुगवे मनात होते. त्यामुळे काहीसे भीतभीतच विष्णू दिगंबर शास्त्री-हॉलमध्ये बुवांच्या घरी गेले.

बुवांच्या हातचे सुवर्णपदक घ्यायला विष्णू दिगंबरांनी घेतलेले आढेवेढे भास्करबुवांना आठवले आणि पंडितजींनी परिषदेचे निमंत्रण दिले तेव्हा प्रथम जरा आखडूनच धरले–

"पाहतो. विचार करून सांगतो. अन्य कुठे तारीख गेलेली असायची."

"असली तरी आमच्यासाठी पुढे ढकला. पण येण्यात चालढकल करू नका. तुमचे नाव नुसते कलाकारांच्या यादीत झळकले तरी सारा फलक चैतन्यमय होऊन जाईल."

"चेतना देणारा मूर्तिमंत विष्णू असल्यावर आमच्या नाटकी चेतनेची जरुरीच काय ?"

"भास्करबुवा, पूर्वीचे सारे विसरून जा. तुम्ही स्वयंभू–स्वयंसिद्ध; नव्हे, सिद्ध गायक आहात. आमच्या पहिल्या वहिल्या परिषदेला या भास्कराचा किरण लाभला नाही, तर सभा चाचपडत बसेल."

हो– नाही करता करता भिडस्त स्वभावाच्या भास्करबुवांनी होकार भरला. आणि मोठ्या खुशीत विष्णू दिगंबर निघून गेले.

पं. विष्णू दिगंबराचे शिष्य विनायकराव पटवर्धन हे जातीने बुवांना आणा-वयास गेले.

जाण्याच्या दिवशी परिषदेच्या मंडपात भास्करबुवांनी पाऊल टाकताच टाळ्यांच्या रूपात रसिकतेच्या प्राजक्ताकडून टप्टप् फुलांचाच उपहार मिळाला.

विष्णू दिगंबरांनी सर्व स्वयंसेवकांना बजावले–

"आज तुमचे परिषदेवरचे चौकी पहारे ढिले झाले तरी चालतील. पण भास्करबुवांचे गाणे ऐकण्याबाबत ढिलाई करू नका, कारण शास्त्र आणि कला यांचा इतका सुंदर संगम अन्यत्र क्वचित."

वझेबुवा आणि अनंत मनोहर यांचे ओजस्वी गायन झाल्यावर भास्करबुवा रंगमंचावर आले. श्रोत्यांचे प्राण कानांत गोळा झाले. आणि होऽऽत्या राजबिंड्या पुरुषोत्तमला पाहण्यासाठी डोळ्यांत सुद्धा !

सभेची मरगळ झटकण्यात हातखंडा असणाऱ्या बुवांनी एकदम आडाण्यालाच हात घातला. श्रोत्यांच्या लोचनांत येऊ पाहणारी नीज कुठल्या कुठे पळाली. कारण भास्करबुवांचा गळाच सुरिला नव्हता, तर एकंदर व्यक्तिमत्त्वच सुरिले होते.

ते व्यासपीठावर बसलेच अशा डौलात की तो डौलच श्रोत्यांचा कौल देऊन गेला. स्वरांची सच्चाई श्रोत्यांवर चढाई करून गेली. तालाचा पक्केपणा– हा कच्च्या गुरूचा चेला नाही हे सुनावून गेला. सुंदर शब्दोच्चारातली चीज दिलाचे दरवाजे खोलत गेली. नाहीतर चिजेच्या दरवाज्यावर डोकेफोड करूनही 'च्याऊ-म्याऊ' शब्द लागतील तर शपथ !

पण भास्करबुवा जणू म्हणत होते–

"मी गुरुमुखातून घेतलेली चीज आहे. चोरून मारून आणलेली नाही, मारून मुटकून पळवलेली नाही. घासूनपुसून जतन केलेली आहे. मला तिच्यातल्या काव्याशी इमान राखलेच पाहिजे."

लयकारीचे चमत्कार ऐकून श्रोत्यांना प्रतिभेचा साक्षात्कार झाला. ती रसानुकूल मुद्रा आणि ती रसिली गायकी म्हणजे शारदेला पडलेले आणि नटराजाने खरे केलेले स्वप्नच जणू समोर साकारले.

ते गाणे स्वरांचे नव्हते. आत्म्याचे होते. म्हणूनच आगळी अनुभूती देत होते. नादब्रह्मी परब्रह्माशी हातमिळवणी करीत चालले होते.

गाणे संपले तरी बराच वेळ टाळी संपलीच नाही. आणि ती दाद सामान्यां-कडून नव्हे तर रहिमतखाँ– बाळकृष्णबुवा– वझेबुवा– गुंडा महाराज– अण्णाबुवा– अनंत मनोहर– इत्यादी असामान्यांकडून दिली गेली !

ती नव्हती टाळी, ती होती हृदयाला हृदये मिळाली...

घरी परतण्यापूर्वी भास्करबुवा पंडितजींना भेटून प्रेमाने म्हणाले,

"पंडितजी, हा सारा तुमचा प्रभाव आहे. प्रताप आहे. समाजात चांगल्या गाण्याचा प्रसार तुम्ही केलात. मैफलीच्या यशाला तानसेन नव्हे, तर कानसेनही हवेत."

नंतर भास्करबुवांना विष्णू दिगंबरांनी अल्पशी देणगी दिली, पण तिचा स्वीकार न करता बुवा म्हणाले–

"पंडितजी, परिषदेसाठी तुम्ही इतक्या खटपटी-लटपटी केल्यात. आम्ही नुसते येऊन गायलो तर देणगी कसली देता ? ती देणगी परिषदेलाच देत आहे."

असे बोलन पंडितजींच्या हाती भास्करबुवांनी हात मिळवला. आणि त्या

हाताबरोबर दूर गेलेली हृदयेही मिळाली.

भास्करबुवांचा मानधनाच्या बाबतीतला दृष्टिकोन नेहमीच असा उदार असे. गाणे करणाऱ्याच्या मागील हेतू व परिस्थिती लक्षात घेऊनच ते आकडा सांगत.

एक दिवस माधव धामणकर म्हणून विद्यार्थी बुवांच्या दारात आला– विस्कटलेले, केस मळकटलेले कपडे– अशा अवतारात.

" ये बाळ, ये, खूप दमलेला दिसतोस. बाहेर थंड पाणी आणा होऽ "

तो मुलगा आवेगाने म्हणाला–

" दमेन नाही तर काय ? माहीत आहे ? शीवपासून पायपीट करीत आलो आहे केवळ आपल्या भेटीसाठी. "

" का बरं ? वाहनं चालू नाहीत ? कमीत कमी दादरपासून तरी ट्राम चालू असणार."

" वाहन चालू असले तरी खर्च चालला पाहिजे ना ?"

" असू दे. असू दे. हेही दिवस जातील. बरं, काय काम होतं ?"

" आमच्या छोटया मित्रमंडळींचा सायनला गणपती बसतो. त्यात आम्ही आपलंच गाणं करायचं असा विडा उचलला आहे."

गणपत पुरोहित शिकवणीला आलेले होते. ते झटकन् बोलून गेले–

" पण गायकाला सुपारी दिल्याविना पैजेचा विडा उचलण्याचं धाडस केलंतच कसं ?"

धामणकर नाक चढवून म्हणाला–

" उगीच बरा करीन ? बुवांचं गाणं ऐकलेलं आहे. त्यांचं गाणं प्रेमळ आहे. तसाच स्वभावही प्रेमळ असणार."

बुवांनी हसून विचारले–

" वर्गणी किती जमवली आहेत ?"

" अठरा रुपये."

" ठीक आहे. गाणं घेतलं बरं का आम्ही."

" शनिवार-रविवार सर्वांना सुट्टी असते. म्हणून शनिवारच ठरवलाय."

बुवांनी टिपणवहीत तारीख लिहून ठेवली. दुरून दमून भागून आलेल्या माधव धामणकरला खाऊ-पिऊ घालून रजा दिली.

मग त्या वर्षीच्या गणेशोत्सवातच नव्हे, तर पुढे आमरण बुवा शीवच्या त्या विद्यार्थ्यांच्या गणेशोत्सवात गात राहिले. ब्राह्मणसभेचे गिरगावातले एक टोक सांभाळूनही, मुंबईची सीमा असलेले शीवचे दुसरे टोक निसटू न देण्याची त्यांनी खबरदारी घेतली.

काही असो. त्यांचा विद्यार्थ्यांवर भारी जीव असे. त्यांनी केलेली फर्माइश हटकून गायली जात असे. मग ती रागाची असो– पदाची असो किंवा दादरा-ठुमरीची असो.

कारण दोन पिढ्यांना साधणारा हा दुवा जर अभिजात संगीताच्या बैठकीला दुरावला तर पुढची पिढीच खानदानी संगीताला दुरावेल याची त्यांना जाणीव होती.

या जाणिवेपोटीच काही ना काही सवलतीही ते मोठ्या मायेने देत. केशव भोळे नावाचा मुंबईच्या मेडिकल कॉलेजचा विद्यार्थी भास्करबुवांच्या संगीताच भोक्ता होता. पण संगीत-मंडळाचे तिकीट काढण्यापुरते पैसे खिशात नसायचे त्यामुळ ऐकण्याचा षौक पुरवू शकत नव्हता.

एकदा भास्करबुवांचे कुठेसे गाणे होते. तेव्हा हॉलबाहेर पडेल चेहऱ्याने घुट-मळणाऱ्या या हुशार विद्यार्थ्याची ती व्यथा बुवांना समजायचा अवकाश, त्यांनी सांगून टाकले.

" इथून पुढे मुंबईच्या प्रत्येक गाण्याला तू यायचंस."

" पण प्रवेशमूल्य ?"

" ऐक. मी हॉलमध्ये शिरायच्या सुमारास तू दारात उभं राहायचंस. आणि मी खूण केली की माझ्याबरोबरच आत यायचंस."

या विद्यार्थ्यावर झालेले संगीताचे उच्च संस्कार केशव भोळ्यांनी पुढे सत्कारणी लावले. ते कृतज्ञतेने वारंवार म्हणत–

" आपल्या श्रोत्यांवर प्रेम करणारा हा राजा माणूस आहे. आपल्या कलेचे कौतुक आणि चीज श्रोताच करतो हे हा राजा जाणून आहे. या राजाला मैफलीच्या दरबारात मुजरा करायला मिळतो हे माझे केवढे भाग्य !"

जवळच बसलेला माधव धामणकर केशव भोळेला म्हणाला.

" हा कलावंत श्रोत्यांना मानतो, पैशाला मानीत नाही. म्हणूनच बिदागी किती मिळेल याची पर्वा करीत नाही, किंवा बिदागीच्या मानाने गाणे उणे-अधिक करीत नाही."

*

# पंचवीस

चंदा कारवारकर, कुमठेकर, अंजनीबाई कलगुटकर इत्यादी कितीतरी शिष्या बुवांना होत्या. पण त्यांची गायकी उचलण्याची कुवत एकट्या ताराबाई शिरोड-करांच्याच गायकीत होती.

ताराबाई मेहनतीला जबरदस्त होती. बुद्धीला सरस्वतीची देन होती. आणि गळ्यात बासरीची धून होती. त्यामुळेच बुवा त्यांना मुंबईत शिकवतच, पण गोमं-तकात जाऊनही शिकवत असत. त्यांचा लौकिक गुरूप्रमाणेच झाला होता.

एकदा कधीशा—कुठेशा त्या गायल्या. भास्करबुवांचे नाव न सांगता दुसऱ्याच गुरूचे नाव सांगून. म्हणजे कष्टाला भास्करबुवा आणि मलिद्याला दुसराच बुवा असे झाले.

ही हकीकत कळताच बुवांचा स्वाभिमान डिवचला गेला. त्यांनी त्या वर्षी ताराबाईंकडून गुरुदक्षिणा घेतली नाही. गुरुपौर्णिमेच्या दिवशी तारा शिरोड-कर यायच्या सुमारास ते बुद्धिपुरस्सर बाहेर निघून गेले. बजावून गेले—

"मी नसताना तारा येईल. मी नसलो तरी गुरुदक्षिणा ठेवून जाईल. ती घ्यायची नाही. आपल्याला तिची ही श्री नको नि श्रीफलही नको."

पण पुढे ताराबाईंना आपली चूक उमगली होती. तिने क्षमायाचना केली होती आणि दुप्पट उत्साहाने शिकवणी पुन्हा सुरू झाली होती. बुवा हातचे न राखता भरभरून देत होते. कारण गुरूचे आणि स्वतःचे नाव मोठे करीत चाललेली ही शिष्या हिंदुस्थानातील अद्वितीय गायिका करण्याचा इरादा बुवांनी बांधला होता.

पण—हाय ! ही आम्रमंजिरी फुलली—तरतरली—गंधित झाली. पण फळली मात्र नाही.

ताराबाईंचा लौकिक गुरूप्रमाणेच झाला. व त्या इंदूरच्या दरबार गायिकाही झाल्या. पण संस्थानची नोकरी त्यांनी काही कारणाने सोडली. आणि पुढे थोड्याच दिवसांत काही कौटुंबिक आपत्तीने सैरभैर होऊन त्यांनी, गाणेच सोडून दिले.

भास्करबुवांना परम दुःख झाले ! कारण स्त्री-शिष्यांत तिने एकटीनेच नाव कमावले होते. गळा कमावला होता. पैशाचा आणि वेळेचा हिशेब न करता बुवांनी त्यांना तिन्ही गुरूंची गायिका शिकवली होती. महाराष्ट्रातच नव्हे, तर हिंदुस्थानात पहिल्या प्रतीची गायिका होण्याची तिची योग्यता होती. म्हणूनच अलादियाखाँच्या मातब्बर शिष्या आणि वर्षभर बुवांचीही तालीम मिळालेल्या केसरबाई केरकर हा

गानसंन्यास ऐकून म्हणाल्या—

"ताराबाईंनी गाणे सोडले नसते तर आम्हा कुणालाही गाण्यात मानाचे स्थान मिळणे कठीण झाले असते !"

आधीच बासरीने लाजावे असा गोड आवाज आणि त्यांत भास्करबुवांसारखा अजोड गुरू.

पण ही बासरी अवेळी मूक झाली...संगीताचे वृंदावन सोडून गेली ! आणि रसिकांची भूक तशीच राहिली !

हा बाण बुवांच्या हृदयातून कधीच निघाला नाही...हा गानसंन्यास कळला त्या दिवशी बुवा आतल्याआत जळले. त्यांना गाणे गायला सुचेना की गाणे शिकवायला सुधरेना.

गणपत पुरोहित—मणेरीकर—ठाकूरदास सारे आले. आणि आल्या पावली परतले. भास्करबुवांनीच प्रत्येकाला सुनावले—

"आज शिकवणी बिकवणी कुछ नाही. चला."

आणि बुवा पाठीमागे हात बांधून बैठकीच्या खोलीत येरझारा घालीत राहिले. ते कुणावर तरी, नाहीतर स्वतःवर तरी रागावले असावेत असे समजून ताई हलकेच म्हणाल्या—

"आज तब्बेत ठीक नाही ?"

"आम्हाला काय धाड भरलीय ?"

"नाही. म्हणजे सारे शिष्य न गाताच परतले ?"

"रोज खाडा न करता घालायला तो काय गवळ्याचा रतीब आहे ?"

"आपण रोज देवपूजा करतो तो काय रतीब असतो ? सांगा मला कारण या त्राग्याचं. मला नाहीतर कुणाला बरं सांगणार ? आपण आणि ही वेणू काय दोन आहेत ? म्हटलं, आग आतल्या आत धुमसली की वाढते बरं का."

या प्रेमळ आग्रहाने बुवा विरघळले. पुटपुटले—

"ती तारा शिरोडकर —"

"तिचं काय ? मागच्यागत आपल्याऐवजी दुसऱ्याच गुरूचं नाव सांगितलंन की काय ? खुशाल सांगू दे. तोंड काही का सांगेना. तिचं गाणं तुमचंच नाव सांगणार."

बुवा सुस्कारा सोडून म्हणाले—

"नाव सांगायला तिनं गायलं पाहिजे ना ?"

छातीवर हात ठेवून तोंडाचा चंबू करून ताईंनी विचारले—

"म्हणजे ?"

बुवा मान फिरवून म्हणाले–

" ताराने काही घरेलू कारणाने गाणे कायमचे सोडले!"

" हाय ऽऽ हायऽऽ! काय म्हणून हा कठोर निर्णय ऐन वयात तिला घ्यावा लागला."

" तिचं तिलाच माहीत! म्हणूनच आज आम्हालाही शिकवावेसे वाटत नाही. कशाला शिकवायचं? शेवटी रक्त आटवून शिकवलेलं सारं आळवावरचं पाणीच ठरायचं!"

ताई धीर देत म्हणाल्या–

" असं नाही हं. आभाळातलं सारंच पाणी आळवावर पडत नसतं. काही थोडं-फार शिंपल्यावरही पडत असतं. मोत्यांचा जन्म घेत असतं. असे चार शिंपले आपलेही शिष्य आहेत– कृष्णा फुलंब्रीकर–नारायण राजहंस–बापू केतकर–गोविंदराव टेंबे–"

ही समजावणी चालू असतानाच भास्करबुवांची शिष्या रेहेमुबाई शेख आली. भास्करबुवांना नमस्कार करून अदबीने उभी राहिली.

" ही पुण्याहून शिकायला आलीय. हिला नाट लावायचा नाही बरं का."

बुवांना मग रेहेमुबाईला शिकवावेच लागले.

बुवा शास्त्रीहॉलमध्ये रहायला आले त्याच सुमारास रेहेमुबाई शेख ही शिष्या भास्करबुवांच्या घरी तालीम घेऊ लागली. काहीशी दबत, काहीशी भीत.

त्याचे कारण गिरगावचे सोवळे वातावरण. शास्त्रीहॉलमध्ये तळापासून वरच्या मजल्यापर्यंत ब्राह्मणी वातावरण. मग त्यात हा मुसलमानी वाण खपायचा कसा?

शास्त्रीहॉलमध्ये एका चाळीत, अगदी तळातली शेवटची खोली बुवांनी घेतली होती. रात्री-अपरात्री वाद्यांची ने-आण करताना कुणाला त्रास नको व गाण्याचा उपद्रवही नको हा त्यातील दूरदर्शी हेतू होता. पण अंग्रे चाळीप्रमाणे येथेही जातपातीची चर्चा होऊ लागली तशी पुण्याहून आवर्जून गाणे शिकायला येणाऱ्या रेहेमुबाईना कसे शिकवायचे असा बुवांपुढे प्रश्न आला.

पण काय आश्चर्य! तो प्रश्न ताईंनी हाताळला–सोडवला...पहिल्याच दिवशी शिकवणी झाल्यावर ताईंनी रेहेमूला आत बोलावले आणि नवी नऊवारी तिच्यापुढे ठेवून म्हटले–

" ही तुला दिलीय बरं का."

" किसलिये ?"

" न नेसशील तर हाकलून देतील भटांच्या चाळीतून या मुसलमानी पेहे-रावाबद्दल."

डोळे पुसत रेहेमु म्हणाली–

"म्हणजे माझी शिकवणीच बंद होईल––माझं जेवणच बंद होईल म्हणा की."

"लोक लाख बंद करतील. मी बरी बंद करू देईन? म्हणून तर साडी देतेय. बरोबर हा कुंकवाचा करंडाही आहे. उद्या शिकवणीला येशील तेव्हा ही साडी नेसून–रुपयाएवढं कुंकू लावून डोक्यावरून पदर घेऊन यायचं."

ताई नुसत्या म्हणून थांबल्या नाहीत तर त्यांनी तिला मधले दार लावून साडी नेसायची दीक्षाही दिली.

बुवा कौतुकले–

"दार लावून मायलेकीचं हितगुज चाललंय तरी काय?"

"ते तुम्हाला नाही समजायचं. खाजगी आहे."

दुसऱ्या दिवशी कासोटयाची जरीपट्टी रेखलेली–ओचे सोडलेली–डोक्यावरून पदर घेतलेली–नाकात नथ घातलेली–कपाळी कुंकवाची चिरी असलेली रेहेमु शिकवणीला आली तशी बुवांनी तिला ओळखलीच नाही. ताईंची कुणी मैत्रीण आली आहे असे समजून पाठमोरे होऊन भास्करबुवा खिडकीशी जाऊन उभे राहिले.

तशी खोऽऽखोऽऽहसून ताई म्हणाल्या–

"ये रमा,"

आणि बुवांना हलकेच म्हणाल्या–

"ही मुलींची रमामावशी आणि तुमची शिष्या रेहेमु."

आणि हसत हसत शिकवणीची सुरुवात झाली.

शिष्यांच्या बाबतीत गुरूच उदारांचा राणा असून भागत नाही, गुरुपत्नीनेही उदार असावे लागते. स्त्री-शिष्यांना तर विशेष आपुलकीने वागवावे लागते.

त्या काळात कुलीन स्त्रियांनी सर्रास गाणे शिकण्याची चाल एवढी रूढ नव्हती. ती पुढे पं. पलुस्कर– पं. विनायकबवा पटवर्धन आदींनी जोपासली. हे भगिनीवर्गावर मोठे उपकारच म्हणावयाचे. नाहीतर अनेक गोड गळे जगाच्या कानापर्यंत न पोहोचता जात्याच्या खालीच चिरडून गेले असते! अर्थात गोमंतकीय भगिनी सरस्वती आणि कुलीन स्त्रिया यांच्यामधला दुवा होत होत्या म्हणून तर!

रेहेमुबाई शेख ही बुवांची सर्वांत लहान शिष्या म्हटली तरी चालेल. तिचे बुवांशी वागणे मनमोकळे असे. लेकीगत असे. त्यांना स्वयंपाकघरापर्यंत प्रवेश असे. बुवांच्या शिष्या या त्यांच्या मानसकन्याच म्हणायच्या.

एकदा गंधर्वकंपनीत सोवळयाची पंगत झाली. बुवा कद नेसून सोवळयाने जेवले. दिलखुलास गप्पाटप्पात रंगले. पंगत बराच वेळ रंगली. बुवा हात धुऊन

उठले तो शिकवणीची वेळ झाली. सदरा चढवून फटा घालून बुवा लगबगीने निघाले. बूट अडकवणार तोच गुरुबंधू नारायणरावांकडे आलेल्या रेहेमुबाईनी विचारले–

" बुवासाहेब, असेच शिकवणीला जाणार ?"

" का ? काय झालं ?"

पोट धरून हसत रेहेमुबाई म्हणाली–

" काय झालं काय ? मारे बूट घालायला निघालात. पण सदऱ्याखाली मुकटा तसाच ?"

बुवांनी आत जाऊन धोतर नेसले, रेहेमूचे आभार मानले नि ते गेले. पाठमोऱ्या भास्करबुवांकडे पाहून रेहेमु पुटपुटली–

" गायकांची तंद्री ही अशीच. कपड्यांचीही शुद्ध गाण्यापुढे नाही."

पण त्या तंद्रीतही रेहेमुबाई ही जवान लडकी आहे, तिची पितृतुल्य जबाबदारी आपल्यावर आहे, हे भास्करबुवा विसरले नव्हते, हे रेहेमूच्या लवकरच लक्षात आले.

बुवांची रेहेमूला चाललेली तालीम ऐकण्यासाठी कधी कधी एक पेटीवादक भास्करबुवांबरोबर जात असत, ते जरा फाजिल रंगिले, रसिले होते. अधूनमधून अपेयपानही करीत असत. म्हणूनच बुवांनी रेहेमुबाईला कानमंत्र देऊन ठेवला होत–

" रेहेमु, मी नसताना हा माणूस दारावर आला तर एकट्याला कधीही दार उघडू नकोस."

त्याच आठवड्यात बुवा दौऱ्यावर गेले असताना तसा प्रसंग आला. पण रेहेमूने दार उघडले नाही. भानावर नसलेल्या त्या कलावंताला घरात घेतले नाही. म्हणूनच ती कृतज्ञतेने म्हणे,

" गुरुजींनी आम्हाला चिजांचंच वळण दिलं नाही, तर वागण्याचंही वळण दिलं."

रेहेमुबाई घरापर्यंत यायची. ताईंना उंबऱ्याबाहेर बसून फर्मावायची.

" वैनी, आज शिकायलाच नाही, तर जेवायलाही आलेय. बेसन-रोटी कर."

" पिठलं का ? श्रीखंड करते."

" नको, पिठल्याची चव श्रीखंडाला नाही."

मग खमंग झुणका आणि गरम भाकरी यांची पंगत झडायची. मांडीवर बुवांच्या एखाद्या लेकीला घेऊनच व्हायची. माई, अक्का, शांताला ही रमामावशी खूप आवडायची. ती रिक्तहस्ताने कधी यायची नाही. मुलांना फळे, बिळे घेऊनच यायची.

फार दिवस रेहेमुबाईला पुण्याच्या स्वतःच्या घरी बुवांचे गाणे करावयाचे

होते. पंतसचिवाच्या आघाडीला शुक्रवारात तिचे घर होते. एक दिवस बरेच दिवस मनात घोळणारी गोष्ट तिने बोलून दाखवली–

"बुवासाहेब, रमाच्या घरी गाणार का?"

"गाईन की, लेकीच्या घरी गायची कसली चोरी?"

"पण मानधन– बिदागी–"

"ते मात्र ऐकणार नाही हं. गुरुपौर्णिमेला तू यथासांग गुरुपूजा करतेसच. मग अधेमधे ती कशाला घेऊ? साथीदार तयार ठेव म्हणजे झाले."

तो रूकार ऐकून रेहेमूचा जीव आनंदाने मोर होऊन नाचू लागला, ती उत्साहाने म्हणाली–

"चार श्रोत्यांनाही बोलावते. श्रोत्यांशिवाय गाण्याला रंगत नाही."

बुवा भरघोस म्हणाले–

"पन्नास अरसिकांपेक्षा एक रसिक श्रोता मी महत्त्वाचा मानतो. गर्दी महत्त्वाची नसते, दर्दी महत्त्वाचा असतो."

"बुवा, मी आपलीच शिष्या आहे. मंडईजवळ रहाते म्हणून मंडई गोळा करणार नाही. कातड्याचे कानवाळे नाही, तर गाण्याचे कानवाळेच जमवीन."

"आणखी एक अट, रमा."

"सांगा."

"नथ्थनखाँसाहेबांचे चिरंजीव अबदुल्ला माझ्याबरोबर येतील, गातील."

"पण मग आम्हाला आमच्या गुरूचे गाणे थोडेच ऐकायला मिळेल. प्यास भागणार नाही. अब्दुल्ला बडे गायक असतील, पण शुक्रताऱ्याने कितीही तेज फाकले तरी त्याला भास्कराची सर येणार नाही."

"पुरे, पुरे. गावेकरांच्या गाण्यातच नव्हे तर बोलण्यातही गोडवा असतो मला वाटतं. बरोबर! तिथल्या सृष्टीतच गोडवा, ना!

हे बघ, तो आधी गाईल, मी नंतर गाईन. तुझे समाधान होईपर्यंत गाईन. मग तर झालं?"

रेहेमु खूष होऊन निघाली. तो आतून ताई ओरडल्या–

"रमा, थांब. थालीपीठ लावतेय, खाऊन जा."

रेहेमु स्वयंपाकघराच्या दाराशी बसत म्हणाली–

"रोज बरे नवनवे पदार्थ. आज काय बदामपाक– उद्या काय गाजर हलवा. परवा काय थालीपीठ."

तशी ताई म्हणाल्या!

"असं बघ– स्वारीचे महिन्यातले निम्मे दिवस दौऱ्यावर जातात. बाहेरच्या खाण्यावर जातात. म्हणून घरी असतील तेव्हा पौष्टिक करून घालते. गरम करून

घालते. आवडीचं करून घालते."

रेहेमु हसून म्हणाली—

"वैनी, माझी आई ज्यांच्याकडे शिकायची, त्यांची बायको शिष्य शिकवणीला आले की दाणकन दार लावून घ्यायची. नाहीतर खड्या आवाजात नवऱ्याला शिव्या तरी घालायची."

बाहेरून हे ऐकणारे भास्करबुवा हसत म्हणाले, "म्हणूनच परवा आमच्या एका गायक दोस्ताने ठार बहिऱ्या मुलीशी लग्न केले तेव्हा सर्व गायकमित्रांनी त्याचे अभिनंदन केले."

ताईंनी चिडून विचारले, "त्याची कीव करायची, का अभिनंदन ?"

"अहो, दिवसभर शिकवण्या चालल्या तरी किंवा रियाज चालला तरी खलबत्त्यात ख्याल कुटला जायचा नाही की दारात ठुमरी चिरडली जायची नाही."

खुसखुशीत थालीपीठ अशा खुसखुशीत हास्यविनोदात केव्हा संपले ते गुरू-शिष्येला समजलेच नाही.

रेहेमुबाईकडचे अब्दुल्लाचे गाणे खूप रंगले आणि त्याच चढ्या पट्टीतले भास्कर-बुवांचे गाणे तर अप्रतिम वठले. सुरांची अशी खुलावट आणि लयीचा असा थाट रेहेमूने क्वचितच ऐकला होता.

त्या दिवशी और ताकदीचे गाणे झाले. तीन सप्तकांत फिरणारी दोन दोन आवर्तनाची तान ऐकून श्रोत्यांचाच दम उखडला.

त्या दिवशी बुवा इतके कसून गायले की गाण्यानंतर तस्तात अक्षरश: रक्त पडले !! रेहेमु घाबरून म्हणाली, "रक्त ओकेपर्यंत गायचा आग्रह नव्हता हं माझा."

"अग, बेभान होऊन गातो तेव्हा कलावंत स्वत:चा नसतो. केवळ गान-विद्येचाच असतो. देहाची सुधबुध हरवतो आणि मग असा काहीतरी प्रकार होतो."

"होय. पण जे पंचविशीत झेपलं ते आता पन्नाशीत झेपणार नाही. कला-वंताच्या कलेला वय नसले तरी कलावंताला वय असते."

बुवा नुसतेच हसले आणि त्यांनी पानाचे तबक पुढे ओढले. श्रोतेही पान खायला सरसावले. कारण भास्करबुवांची बैठक चालू असताना गायकच नव्हे, तर प्रेक्षकही नादब्रह्माचे उपासक बनत. मग कुठलं आलंय पान आणि कुठलं आलंय भोजन ?

नंतर रेहेमुबाईंनी मध्ये शुभ्र हिरा आणि भोवताली लाल माणकांची मेहेरप बसवलेली मुद्रिका, बुवांना आणि अब्दुल्लांनाही भेट म्हणून दिली. कुणीसे म्हणाले, "काय तेज रत्ने आहेत हो अंगठीतली !"

"माझ्या गुरूचं गाणं त्याहून तेज आहे." रेहेमुबाई अभिमानाने म्हणाली.

तेव्हा बुवांच्या गाण्याने संतृप्त झालेल्या श्रोत्यांनीही " सच है ! " म्हणून पोटापासून दाद दिली.

नंतर काही दिवसांनी रेहेमुबाई उजाडत बुवांकडे आली व म्हणाली, " आज चीज घ्यायला नव्हे, तर चीज द्यायला आले आहे."

" चीज ? तू बांधलेली ?"

" अंहं. मी घडवलेली. "

आणि दागिन्यांचा डबा बुवांच्या पुढ्यात ठेवून रेहेमु म्हणाली, " हा पट्टा, या गोठपाटल्या, हा बिंदी-बिजवरा, या तोरड्या–"

भास्करबुवा डोळे घट्ट मिटून म्हणाले, " मला ते विष पहायचंही नाही. ते तुझं तू सांभाळ. "

" पण या घरातही सोनंनाणं असणारच. "

" आहे. पण ते इथं नाही. शंकरबुवा अष्टेकरांच्या चालत्या बोलत्या बँकेत आहे. "

रेहेमुबाई हिरमुसली. दागिन्यांसह परतली. पण पुढच्याच आठवड्यात तिच्या साजांची राहत्या घरातून चोरी झाली ! तशी बुवा चुटपुटले. तसे त्यांनी रेहेमूला बोलूनही दाखवले. तशी रेहेमुबाई म्हणाली,

" आपण मला दागिने सांभाळायची अक्कल दिली नाहीत, तरी शील सांभाळायची अक्कल दिलीत. म्हणूनच माझं शील चोरायला आलेला चोर मी त्या रात्री परतवू शकले. "

त्या दिवशी बुवा दौऱ्यावर गेले होते. तो मोका साधून ताईंनी त्यांची शिष्या रमाला नववा संपता संपता डोहाळजेवण केले. अलीकडे सातव्यापासून शिकवणी बंद होती. पोटाचा डेरा बराच आला होता. तरीही रमा नऊवारी कोरी साडी नेसून आली. ताईंनी पुरणा-वरणाचा स्वयंपाक केला. ब्राह्मणी जेवणाने तृप्त होऊन रमा पानावरून उठली. पण आग्रहाचे जेवण आणि पोटातले वजन यामुळे अस्वस्थ झाली. ताईंना म्हणाली,

" पोटातला बोंगा आणि हा नऊवारीचा बोंगा. घरापर्यंत कशी पोहोचेन कोण जाणे ? त्यापेक्षा एखादे धोतर द्या बुवांचे हलकेसे. तेच गुंडाळते, बग्गी करून जाते. "

ताईंनी धुतलेले कपाटातले धोतर दिले. ते नेसून बग्गी करून रमा गेली. आणि दुसऱ्या दिवशी सकाळी सकाळीच चिठ्ठी आली. रेहेमुबाईंच्या हातची–

" ति. सौ. वैनीस,

स. न. वि. वि.

तुमची रमा रात्रीच बाळंत झाली. मुलगा झाला. आजोबांच्या

धोतराचा पायगुण झाला. आता ते परत मिळणार नाही. प्रसाद म्हणून ठेवून घेतले आहे.

तुमची
सौ. रमा."

या धोतराची चिठी वाचता वाचता ताईंना आणखी एका धोतराची गोष्ट आठवली.

त्या दिवशी भास्करबुवांचे वालचंद हिराचंद शेटजींकडे गाणे होते. नेहमी-प्रमाणे कोरे धोतर आणि कोरा सदरा, कोट, फेटा आणि उपरणे अशा रुबाबात बुवा गाण्याला गेले. पण तिथे कुणा लंगडचा नोकराचा पाय लागून अनवधानाने समोरचा पाण्याने भरलेला गडवा पालथा झाला. त्याचा ओहोळ थेट बुवांच्या धोतरावर आला.

वक्तशीरपणाबद्दल प्रसिद्ध असलेले बुवा तसेच ओलेत्याने गाणे सुरू करणार तोच शेटजी म्हणाले,

"भास्करबुवा, आत या. आमचे ठेवणीतले नवे धोतर नेसून गायला बसा."

बुवा संकोचून म्हणाले, "आपला मान राखण्यासाठी नेसीन. पण एका अटीवर."

"ती कोणती ?"

"धोतर परत केले जाईल."

आणि खरोखरच ते धोतर ताईंनी जाईजुईसारखे स्वच्छ धुऊन परत केले.

मौज अशी की रेहेमुबाई बुवांचे धोतर परत न करता गुरुप्रसाद म्हणून जपत होती. तर वालचंद हिराचंद बुवांनी नेसून परत केलेले धोतर एका महान गायकाचा प्रसाद म्हणून महावस्त्रासारखे जपत होते.

*

# सव्वीस

"पंडतजी– पंडतजी."

केनेडी ब्रीजवर वाऱ्यावर वाहत ही हाक आली आणि बुवा एकदम चमकले. हा आवाज कुणा मुंबईकराचा नव्हता. 'हा पंजाबी पकोडा इथे कसा उगवला ?' त्यांना समजेना.

चेहऱ्यावरून माणसे ओळखणारे अनेक असतात, पण स्वरांवरून माणसे ओळखणारी भास्करबुवांसारखी माणसे विरळाच. त्यांनी ओळखले, 'हा तर गमन-खाँच्या मुबारकचा आवाज.'

बुवा मान वळवायच्या पूर्वीच आनंदाने ओरडले, "कौन ? मुबारक ?"

"जी. मैं हुं पंडतजी !"

बुवांनी मान वळवली आणि ते चकित झाले. तो गमनखाँपुत्र मुबारकच होता. पण उंची कपडे घालून– फरकॅप घालून– कानात अत्तराचा फाया घालून मिरवणारा– फुलत्या गुलाबाच्या चेहऱ्याचा मुबारक नव्हता.

तर तो होता कोमेजलेल्या चेहऱ्याचा– मळकट कपड्यांचा– विस्कटल्या केसांचा– खोल डोळ्यांचा मुबारक.

तशा त्या अवतारातल्या मुबारकलाही कडकडून मिठी मारून भास्करबुवांनी विचारले,

"अरे, अशी हालत कशाने झाली ? आजारी बिजारी होतास काय ?"

"जी नही !"

"मग ?"

डोळे मिचकावून मुबारक म्हणाला, "खरं सांगायचं तर आपणच माझी ही हालत केली !"

बरोबर बुवांचे शिष्य बापूराव केतकर होते. त्यांना ही लाक्षणिक गुरु-निंदाही सहन झाली नाही. ते म्हणाले,

"सूर्याला अंधाराचा शत्रू म्हणतात. तमारी म्हणतात. पण सूर्य आणि अंधार शत्रुत्व करायला समोरासमोर तरी येतात काय ? आपण भास्करबुवांसमोर आत्ताच आलात. मग ते तुमचे हाल करतीलच कसे ?"

"बच्चा, मी भास्करभय्यांना भेटायला आलो आणि पत्ता हरवल्याने तो शोधण्यात चार दिवस वणवणलो. अखेर थकून काल स्टेशनवर जाऊन झोपलो. तो मुंबईच्या भामट्याने आमचे कपडे पळवले आणि पाकीटही मारले !"

"अरेरेऽऽ ! मग तुमची फिर्याद बरोबर होती."

बापूराव कळवळले. तेवढ्यात भास्करबुवांनी झटकन् एक व्हिक्टोरिया थांबवली. आणि मुबारक अलीला घेऊन त्यांनी शास्त्रीहॉलमधले आपले घर गाठले. गेल्या गेल्या आत डोकावून सांगितले–

"शान्ताच्या आई– पंजाबचे बडे मेहेमान आलेत. हंडा तापवा." ताईंनी हलकेच विचारले–

"कुणी खाँसाहेब वाटतं ? दाढीबिढी वाढलेली दिसतेय."

दाढी कुरवाळीत मुबारकअली म्हणाले–

"थोडीशी ठेवली होती. आणि या चार दिवसांत आणखी वाढलीय–" मग बुवांनी बापूराव केतकरांना धाडून कोपऱ्यावरचा न्हावी बोलावला आणि मुबारकचे प्रवासाने अंबलेले अंग चांगले रगडून काढले. त्याच्याकडून मुबारक अलीची हजामतही करण्यात आली. तशी मुबारकअली हसून म्हणाला–

"हाय रे कंबक्त ! आमच्या केसालाही भास्करभैय्यांच्या घरात धक्का लागणार नाही असे वाटले होते. पण या हजामाने केसाने गळा कापला आणि चोराने खिसा कापला."

हजारोंच्या डोक्यांशी संबंध येऊन येऊन, हजरजबाबी झालेला हजाम अवजारे धोपटीत घालता घालता म्हणाला–

"चोराने तुमचा खिसा कापला असे आत्ता तुम्हीच म्हणाला. मग आम्ही फक्त केसच कापला तर बिघडले कुठे ?"

त्या दिवशी मुबारकअलींनी मालीश करून घेतले पण मग पंजाबात जाईपर्यंत त्यांनीच बुवांच्या मस्तकाचा ताबा घेतला. गुरूला मालीश करण्याची फारा दिवसांची थकबाकी वसूल केली.

पंजाबी माणूस उंची खाण्यापिण्याचा भोक्ता असतो हे जाणून ताईंनी बदाम-बेदाणा घालून दूध-तूप घालून, मस्तपैकी सत्यनारायणाचा शिरा केला. तो खाल्ल्यावर तृप्त होऊन मुबारकअली म्हणाला–

"आहाहाऽऽ! भास्करभैय्यांची गायकी जितकीच मधुर, तितकीच भाबींच्या हातची रसोई मधुर."

ताई विनयाने म्हणाल्या–

"चार दिवसांचे उपाशी आहात म्हणून मला इतके उंची प्रशस्तीपत्र देताय. म्हण आहे ना– भुकेला कोंडा नि निजेला धोंडा."

मग भास्करबुवा या चिरंजीवांना घेऊन बाजारात गेले. त्यांना आपादमस्तक सजवून सोडले. अगदी पायातल्या उंची चढावापासून डोक्याच्या जरीच्या फेटचापर्यंत नव्या सरंजामात मढवून टाकले. आणि सारी मुंबई बग्गीतून फिरवून आणली. तेव्हा बुवांचे समाधान झाले.

रात्री ताईंनी एकीकडे विचारले–

"पाहुण्यांवर एवढा खर्च करताय त्याअर्थी लाडका दिसतोय."

"माझ्या आधी चोरांचा तो लाडका झाला. म्हणून हे सारं करावं लागलं. अमीर म्हणून आलेला फकीर म्हणून थाडाच पाठवायचा मुंबईहून ?"

"तेही खरंच. स्वारीचे गाणेच मोठे नाही, वागणेही मोठे आहे हो."

"संगती संग दूषणम् । तुझी साथ आहे. म्हणून आमचा हात असा सैल सुटतो आहे. पण तुझी जीभ सैल सुटती तर आटोपलाच असता आमचा कारभार.

आणि हो. सांगायचं राहिलंच. आमच्या मस्तकाला अत्तराचे मालीश करत हिंडणारा हाच तो गमनखाँचा छोकरा."

चार दिवस पाहूणचार झाला. कानावरून शिकवण्यांच्या निमित्ताने गाणेही भरपूर गेले. तरीही आसोसी न पुरून मुबारकअलीने विचारले–

" प्यास भागली नाही. एवढ्यात कुठे मैफल नाही ?"

" आहे. आजच रात्री आहे."

" वाऽऽ ! नशिबाचे शिकंदर म्हणायचे आम्ही ! म्युझिक सर्कलला गाणं आहे ?"

" नाही. गिरगावात गणपतराव म्हात्रे यांच्या घरी वास्तूशांतीचे गाणे आहे. रात्रो दहा वाजता. शिष्य मंडळींबरोबर तुम्ही या. मी जरा पुढे होईन."

रात्रीचे नऊ वाजले. बुवांचे साथीदार– पेटीवाले आणि तबलजी; तसेच बापूराव केतकर यांनी मुबारकअलींना घेऊन पावणेदहा वाजता वास्तुशांतीच्या जागी यावे असे सांगून, भास्करबुवा वाद्यांसह व्हिक्टोरियाने पुढे गेले.

घाईत नव्या घराचा तपशीलवार पत्ता घ्यायला बापूराव केतकर विसरले. आणि मग गिरगावातल्या अनेक घरांची चढउतार करून– पुण्याच्या जवळजवळ दहा पर्वतींइतकी पायपीट करून एका जिन्याशी थबकले.

कारण नव्या घराच्या दिवाणखान्यातून–

" शुभ घडी शुभदीन "

–हे बुवांचेच चिजेचे स्वच्छ शब्द वाऱ्यावर वहात आले. पत्ता सांगून गेले. तबलजी या जथ्यातच होता, पण उशीर झाल्यामुळे कुणालातरी घेतलेले दिसतेय, असे वाटून सारे जण खजिल होऊन लगबगीने जिना चढले.

कारण वक्तशीरपणाबद्दल भास्करबुवांची ख्याती होती. आणि घर शोधण्याच्या भरात साडेदहा वाजायला आले होते. आज आपली धडगत नाही असे वाटून धडधडत्या छातीने चोर पावलांनी ही मंडळी हॉलच्या दाराशी गेली आणि आतील दृश्य पाहून विलक्षण चकित झाली !

गाण्याला नुकतीच सुरुवात झाली असावी. कारण अजून मंद्र सप्तकातीलच कामगत चालू होती. आणि– आणि– विशेष म्हणजे भास्करबुवा स्वतःच उजव्या हाताने तंबोरा आणि डाव्या हाताने डग्गा वाजवत होते. आणि एकीकडे गात होते.

" माफ कीजिये !"

तबलजी धावले आणि तबल्याला बसले. बापूरावही तंबोरा घेता घेता पुटपुटले–

" घर सापडायलाच अर्धा घंटा गेला."

शिष्यांचे आणि साथीदारांचे अपराध हसण्यावारी घालवून भास्करबुवांनी

मैफल पुढे सुरू केली आणि हा हा म्हणता काबीज केली !

भास्करबुवांचे विशेष म्हणजे मुबारकअलींच्या या मुक्कामात भास्करबुवांनी स्वतःच्या घरी त्यांचे गाणे करून गमनखाँच्या चिरंजीवांचा सत्कार केलाच, पण शिवाय गिरगावातल्या ' ट्रिनीटी ' क्लबमध्ये सत्कार व गाणे आयोजित केले.

' ट्रिनीटी ' क्लब हे एक रसिले संगीत-मंडळ होते. श्री. बेंडसे यांनी एकोणीसशे चार-पाचच्या सुमारास– गिरगावातच सदाशिव गल्लीला मिळणाऱ्या– छोटचा उपगल्लीत ' ट्रिनीटी क्लब ' म्हणून संगीत-मंडळ स्थापन केले. ते भास्करबुवांच्या प्रेरणेने व आशीर्वादाने स्थापन झाल्यामुळे बुवांचाच सल्ला क्लब मानीत असे.

थोडक्यात बुवांचे शिष्य व मित्र यांना मनमोकळे गायला या ट्रिनीटी क्लबने एक व्यासपीठच मिळवून दिले.

भास्करबुवांसारखा मातब्बर सल्लागार असल्याने कृष्णामास्तर, बालगंधर्व, गोविंदराव टेंबे, बापूराव केतकर आदींचीही क्लबात ऊठ-बस असे. बुवांच्या घरचा पाहुणा क्लबचाही पाहुणा होत असे.

मुबारकअलींचा धागा म्हणूनच क्लबशी जुळला आणि तंबोऱ्याच्या तारा जुळून गेल्या.

मुबारकअलींच्या मनात भास्करबुवांचे शिष्यत्व पत्करायचे होते. पण रईसखानच्या चिरंजीवांची याद ताजी होती, म्हणून जीभ अडखळत होती.

रइसखानचे चिरंजीव भास्करबुवांचे गाणे ऐकायला पूर्वग्रहदूषित मनाने गेले. पण बुवांची प्रसन्न गायकी आणि प्रसन्न मुद्रा मुलास जिंकून गेली. त्याने गाणे संपताच बुवांचे पाय धरले आणि म्हटले–

" आपल्या या समृद्ध गायकीचा मी आजपासून दास झालो आहे. मला आपला शिष्य करून घ्या. "

हे शब्द ऐकताच बुवांची प्रसन्न मुद्रा पाहता पाहता क्रुद्ध झाली. उग्र झाली ! क्षुब्ध झाली. ते संतापून ओरडले–

" स्वतःला मान्यवर, महान गायक रईसखानचे चिरंजीव म्हणवता आणि माझे शिष्यत्व पत्करू पाहता ? छे, छे ! ते शक्य नाही. कारण जमले तर मीच खाँसाहेबांचा गंडा बांधीन म्हणतोय. "

आपल्यालाही असेच काहीतरी तिरपागडं उत्तर मिळेल, या भीतीने सहज मिळाल्या तेवढ्या चिजा भास्करबुवांनीच दिलेल्या बासनात बांधून, मुबारकअली परतले.

ते गेल्यावर ताई रात्री म्हणाल्या–

" आज घर सुनं सुनं लागतंय नाही ? कालपर्यंत पंधरवडाभर आपल्या मित्राच्या लेकाने भरल्यागत वाटत होते. "

ताईंच्या सुन्या हाताकडे बघून बुवा म्हणाले—

" पण आमच्या या पाहुण्यांच्या सरबराईपायी तुमचे हात सुने करावे लागले. गळा बुचा करावा लागला. नेमका याच महिन्यात मोठा कार्यक्रम नव्हता.

पाहुणा दुरून आलेला. त्याला तसा कसा जाऊ देणार ? त्यातून चोरांनी नागवलेला. बिनकपडयांचा थोडाच जाऊ देणार ? गायला म्हणून बक्षिसी दिली. परतीचे भाडेही दिले. ते लोक जिवापाड प्रेम करतात. त्याची थोडीशी परतफेड केली.

पण— पण त्या फेडीपायी तुमच्या अंगावरचे दागिने गहाण टाकावे लागले आणि लखुशेट दंताळे यांच्याकडून पैसा उभा करावा लागला. "

बोलता बोलता भास्करबुवांचा कंठ भरून आला. तशी ताई जवळ आल्या. बुवांचा हात हाती घेऊन म्हणाल्या—

" स्वारीचा आनंद तोच माझा आनंद. दागिने कुणीही सोमीगोमी मिरवील, पण बडीबडी माणसं मिरवण्याचं भाग्य या खोलीगत कुणाला लाभेल का ?"

ताईंना मिठी घालून बुवा भावनावेगाने गद्‌गद्‌ले—

" उद्या कार्यक्रम झाला की, पहिले दागिने सोडवून आणायला शंकरबुवांना सांगतो. "

आणि मग हे नेहमीचेच झाले. ताईंच्या आणि दागिन्यांच्याही अंगवळणी पडले ! ...

*

# सत्तावीस

वेणुताईंचे सासरचे नाव सावित्री होते. पण संगीताच्या प्रेमाने भास्करबुवा पत्नीला एकांतात वेणू म्हणूनच हाक मारीत. सावित्रीबाईंनाही ते आवडे. त्या गमतीने म्हणत—

" या हाकेमुळे कसं सातान्याला माहेरी असल्यागत वाटतं. "

चाळीतल्या बायका मात्र त्यांना ताई म्हणत आणि विद्यार्थीगण वहिनी म्हणे.

त्या रात्री भास्करबुवा टांक-दौत घेऊन कितीतरी वेळ लिखापढी करत बसले होते. ते पाहून ताईंनी विचारले—

" दौऱ्याहून आम्हाला चार ओळीचं चिठोरं येण्याची मुश्कील. नि आज चार

चार ताव काय लिहिणं चाललंय ?"

" आमच्यासमोर बसा. नि ऐका."

" मला वेडीला त्यातलं काय कळणार आहे ?"

" वेड्यांनाही संगीत कळावं म्हणून– 'भारतीय संगीत' नावाचं एक मासिक निघतं त्यासाठी लेख लिहितोय. तोच जेवढा झालाय, तेवढा वाचून दाखवतो."

" वाचावा."

–येणारी जांभई बळे बळे थोपवीत ताई म्हणाल्या.

आपल्या बुलंद– सुरिल्या– घनगंभीर आवाजात बुवा वाचू लागले,

'गायन हा विषय अत्यंत महत्त्वाचा आहे. केवळ बौद्धिक दृष्टीने विचार केला असता त्यापासून फुपफुसांस व्यायाम होऊन शरीरप्रकृती दृढ होते; व आरोग्य प्राप्त झाल्याने मन आनंदित होते.

एवढेच नव्हे तर स्वतःची करमणूक करता येऊन, दुसऱ्याचेही मन रिझवता येते.

अध्यात्मदृष्टीनेही त्याचे मोठेपण फारच मानलेले आहे. देवांची स्तुती कवनबद्ध केल्याने देव संतुष्ट होतो. गायनाने मुलांचे रूदन थांबते. वनचर लुब्ध होऊन, प्राणार्पणदेखील करायला तयार होतात. संतापलेला सर्पदेखील डोलू लागतो. मनाचे स्वास्थ्य उत्पन्न करता येऊन, मन विकाररहित करता येते. व त्या योगाने ईश्वरप्राप्तीचा मार्ग सुकर करता येतो.

विश्व हे सर्व गायनमय आहे. याच अर्थाने एके ठिकाणी म्हटलेले आहे–

ना देव व्यज्यते वर्णः पदं वर्णात्पदाद्वचः

वचसो व्यवहारोज्यं नादाधीनमतो जगत् ।।

या गोष्टीचेच रहस्य श्रीकृष्णाची मुरली, नारदाची व सरस्वतीची वीणा, महादेवाचा डमरू, ब्रह्मदेवाचा सामवेद यात आहे.

गायनाच्या इतिहासांचा आरंभ वेदांपासून केला पाहिजे. वेदातच नव्हे तर श्रुती, स्मृती, पुराणे इत्यादीकांतही ठिकठिकाणी श्रुती, स्वर, जाती, वीणा, वादन, ताल वगैरेंबद्दल विचार केलेला आढळतो.

परंतु हा विचार व्यवस्थितरीतीने केलेला दिसत नाही.

तसा पहिला प्रयत्न भरतमुनींनी केलेला आहे. त्यानंतर कश्यप, संबळ, नारद, तुंबरू, हनुमान, रावण, भोजराज, सोमेरा वगैरे अनेक संगीत शास्त्रोक्ते होऊन गेले, पण त्यांपैकी बहुतेकांचे ग्रंथ सध्या उपलब्ध नाहीत. शाङ्र्गदेव यांचा 'संगीत रत्नाकर' नावाचा ग्रंथ फारच मौलिक असून मोठा आहे.

त्यानंतर हिंदुस्थानात पुष्कळशी स्थित्यंतरे झाल्याने संगीताचा लोप झाला. मुसलमानांच्या अमदानीत मात्र त्याची थोडीशी सुधारणा तानसेन, नायक, गोपाळ,

बैजू वगैरे मंडळींनी करण्याचा प्रयत्न केला.

हल्ली गायनाला जे हिंदुस्थानी पद्धतीचे वळण लागले आहे, त्याचे बहुतेक श्रेय तानसेन यासच आहे.

अगदी अलीकडे उत्तर हिंदुस्थानात शौरिंद्रमोहन टागोर, कर्नाटकात गोविंद दीक्षित, वेंकटमस्वी सुबैय्या यांनी खटपट चालवली आहे. महाराष्ट्रात प्रो. भातखंडे यांचे शास्त्रीयदृष्टचा संशोधन व रा. विष्णू दिगंबरबुवा पलुस्कर, रहिमतखाँ, अब्दुलकरीम यांनी ठिकठिकाणी गायन विद्यालये स्थापून, त्यांचे पुनरुज्जीवन करण्याचे स्तुत्य काम केले.

परंतु संगीतशास्त्राच्या नियमांचे पालन गायक करतातच असे नाही. संगीत हे जसे शास्त्र आहे; तशीच कलाही आहे. कलेत विधात्याच्या इच्छेनुरूप फेरफार होणारच. नियमांना अगदी धरून बसून चालायचे नाही.

संगीताचा उपयोग मनोरंजन या दृष्टीने फार असल्याने गोडी व रस याकडे लक्ष देऊन शास्त्रीय नियमातही फरक केल्यास तो अनाठायी होत नाही. याच विचाराने या पुस्तकात शास्त्रीय विचारांच्या दृष्टीने न पाहता, मनोरंजन व लोक-प्रियता याकडे लक्ष दिले आहे.

आधुनिक शास्त्राच्या दृष्टीने पाहिले असता, गायन हा ध्वनिशास्त्राचा भाग आहे. ध्वनी म्हणजे एक प्रकारच्या लहरी अगर लाटा आहेत.पाण्यात दगड टाकला असता ज्या प्रकारच्या लाटा दिसतात, त्याच प्रकारच्या लाटा हवेत उत्पन्न झाल्याने ध्वनी प्रत्ययास येतो. या लाटा एकीमागून एक काही क्रमाने येऊ लागल्या, म्हणजे त्यापासून उत्पन्न होणाऱ्या आवाजात निश्चितपणा प्राप्त होतो.

या निश्चितपणातच शब्दांचे रहस्य आहे. जितक्या लाटा मोठ्या व उंच येतील त्या मानाने त्यांचा परिणाम जास्त होतो. त्या जितक्या लवकर येतील त्या-मानाने त्यांची तीव्रता वाढते. यावरून आवाजाचे खालीलप्रमाणे भेद करता येतील,

मंद्र– बारीक लाटा उत्पन्न करणारा– हलका आवाज.

मध्य– साधारण लाटा उत्पन्न करणारा– मध्यम आवाज.

तार– मोठ्या लाटा उत्पन्न करणारा– खडा आवाज.

त्याचप्रमाणे–

कोमल– थोड्या लाटांचा– मृदु.

शुद्ध– नियमित लाटांचा– साधा.

तीव्र– पुष्कळ लाटांचा– उंच.

आवाजाचे सात भेद कल्पून कमी-अधिक प्रमाणात तीव्रता दिसून येत असल्याने–

सा री ग म प ध नी
अशी सप्त स्वरात्मक नावे दिलेली आहेत. शास्त्रात यास सबंध नावे आहेत ती–

षडज्, ऋषभ, गांधार, मध्यम, पंचम, धैवत, निषाद. या सातही स्वरांचे मंद्र, मध्य, तार असे भेद होऊन तीन सप्तके होतात."

मोठी जांभई देऊन ताई म्हणाल्या–

"आता पुरे, उद्या वाचा. नाहीतर मीच तार सप्तक लावीन हं."

आणि प्रयत्न करूनही ताईंना जांभई आवरता आली नाही.

तशी बुवा हसून म्हणाले–

"आमच्या लेखावरचा अभिप्राय कळला बरं का. आता झोपा."

तेवढ्यात बिछान्यातून शांताने स्वर लावला. तशी बुवा म्हणाले–

"वाऽ! तीही आईला बोलावतेय. इथून चिमटा तर घेतला नाहीत ना तिला ? पळून जायला मिळावं म्हणून."

दाराआडून पुढे येऊन माई म्हणाली–

"आण्णा, आईला नाही, तरी मला आज तीन सप्तके छान कळली."

आणि तिने सा, रे, ग, म, प, ध, नि, सो,– सो, नि, ध, प, म, ग, रे, सा. गाऊनच दाखवले.

लेख उचलून ठेवून बुवा उठले. माईला शाबासकी देऊन म्हणाले,

"शाब्बास पोरी. आपण तुला गाणं जाणणाराच नवरा पाहणार. तुला आरोह-अवरोह कळला म्हणजे गाण्यातला चढ-उतारच कळला."

शांताला थोपटता थोपटता ताई मनात म्हणत होत्या–

"गाण्यातच नाही पोरी, तर जीवनातही चढउतार असतात. म्हणजेच आरोह-अवरोह असतात."

स्वयंवराच्या रूपात भास्करबुवांच्या जीवनाला आरोह सुरू झाला, एक नवे दालन त्यांच्या गायकीला खुले झाले. एक नवे प्रलोभन श्रोत्यांत निर्माण झाले.

मानापमानमधील पदांनागो विंदराव टेंबे या बुवांच्या मानलेल्या शिष्यांनी चाली दिल्या असल्या तरी धैर्यधरावर बुवांच्या चालीची छाया स्पष्ट दिसू लागली.

विशेषत: कर्नाटकात त्या काळी लोकप्रिय असलेले–

"हरणी, मनसुगटिक दिनश्री."

हे गाणे बुवा धारवाडच्या मैफलीत म्हणत असत. त्या चालीबरहुकूम–

"झाले युवती मना."

या पदाची निर्मिती झाली. आणि जाणकारांना चालीचे रहस्य सांगून गेली.

भास्करबुवांच्या चालींनी बालगंधर्व इतके भारावले की–

"सौभद्रतल्या चाली बदलून द्या."

असा लडिवाळ हट्ट बुवांजवळ घेऊन बसले.

भास्करबुवा आण्णा किर्लोस्करांना गुरू मानीत. अन्नदाताही मानीत. ते ताडकन् म्हणाले–

"नारायणा, भलता हट्ट धरू नकोस. अण्णांनी पात्रांच्या स्वभावाला– पिंडाला, प्रसंगाला साजेशा चाली दिल्या आहेत. तेव्हा अमृताच्या ताटी नरोटी ठेवण्याचे पाप मी करणार नाही."

नारायण पुन्हा म्हणाला–

"बुवासाहेब– माझा गळा आता जुन्या चालीत रमत नाही.बासुंदी प्यायल्याने दूध गोड लागत नाही. कमीत कमी एक तरी नवी चाल द्याच."

"ठीक आहे. फक्त शेवटची चाल बदलतो."

आणि भास्करबुवांनी

"बहुत छळियले नाथा–"

या सुभद्रेच्या शेवटच्या पदाला भैरवीची चाल दिली.

अभिजात संगीत आणि नाटयसंगीतातली दरी बुजवून टाकणाऱ्या या वाग्गेयकाराची थोरवी गाताना शब्द हरवून बसतात.

"नरवर कृष्णा समान"च्या चालीत सूर येतात–

"गायक भास्करा समान.
घेतसे जन्मा भाग्य उदेले.
सुचवी सुगाना.
बहुत कलापती आले गेले.
परी मनाला भास्कर झाला
मंत्र महान..."

स्वयंवर खूप गाजले. घराघरातून– माजघरातून सुद्धा ऐकू येऊ लागले. तशी बुवांच्या पुण्याच्या राहत्या घराचे मालक फरशीवाले साठे बुवांकडे येऊन म्हणाले–

"भास्करबुवा, आमचा पुढचा दिवाणखाना आणि बाजूची खोली आपल्या-सारख्या बड्या कलावंताने पावन केली आहे. पण– 'ढवळ्या शेजारी हा पवळा बांधूनही' वाण आणि गुण काहीच लागला नाही.

कमीत कमी चार सूर तरी या गळ्यावर चढले पाहिजेत, नाहीतर शंकर-बुवा अष्टीकरांसारखे ध्रुपदीये– शंकरभैय्यांसारखे तबलीये आणि भास्करबुवा बखल्यांसारखे ख्यालीये यांच्या त्रिवेणी संगमावर राहूनही हा मासा कोरडा राहिला– फरशीवाला असल्याने दगडच राहिला अशी अपकीर्ती होईल."

भास्करबुवा हसून म्हणाले, "आपल्या वाड्यात आम्ही तिघेजण राहत

असलो तरी तंबोरा घेऊन आपण गायचे कारण नाही.

गायक व्हायचे असेल तर एक अमीरी हवी किंवा फकीरी पत्करायची तयारी हवी.

सगळ्यांनीच तानसेन होऊन भागत नसते. काहींनी कानसेनही व्हावे लागते. त्यातून स्वतःला ज्यात गती त्यातच आपली सद्‌गती हे ओळखून असावे. तुम्हाला संगीतात गती नसली तरी उद्योगात गती आहे आणि त्यातच तुमच्या घराण्याची सद्‌गती आहे.

स्पष्ट बोलतो. माफ करा, पण संगीताला उच्चभ्रू समाजात अजून प्रतिष्ठा मिळाली नाही. त्यामुळे तुम्ही उद्योगपती न होता वीणाधारी झालात तर जग म्हणेल– नाटक्या भास्करबुवांच्या नादाने साठ्यांचा पोरटा दिवटा निघाला. वाया गेला !"

भास्करबुवांचा स्पष्टवक्तेपणा हा असा होता. स्वतःलाही प्रसंगी न्यायालयात उभा करणारा होता. पण त्याचबरोबर दुसऱ्यालाही न्याय देणारा होता. मात्र एखाद्या कलावंतात कलेची चमक दिसली– विद्येची चुणूक दिसली तर जातपात आणि धर्मबिर्म गुंडाळून ठेवून ही खऱ्या कलावंताची जात त्याला जवळ करी आणि कलेलाच धर्म मानणाऱ्यांना त्याची योग्यता पटवून देई.

स्वयंवर गाजल्यानंतर लगोलग बुवा जालंदरला गेले तेव्हाची गोष्ट–

पंजाबमध्ये एका मैफलीत अर्धा डझन तबलजी वाजवायला बसले होते. एक-दोन आवर्तने वाजवली की एकेकाने उठायचे आणि दुसऱ्याचा हात तबल्यावर आला की श्रोत्यांत जाऊन बसायचे.

या प्रथेमुळे संधी घेणारे अनेक नवनवे तबलजी जगासमोर येत असत हे खरे असले तरी साथीचा एकसंधपणा विस्कळीत होत असे हेही तितकेच खरे.

त्या दिवशी भास्करबुवा खूप जमले. साथीत क्रमाने वर्णी लागली म्हणून एक तरुण– तगडा– फाकडा गडी वाजवायला बसला. डोळ्यांतला सुरमा आणि कानातला अत्तराचा फाया यापेक्षा त्याच्या वाजवण्याने जी हवा निर्माण केली तिकडेच रसिकांचे लक्ष वेधले गेले. कारण ही त्याची साथ गाणे दुखवणारी नव्हती तर सुखवणारी होती.

स्वतःच्या विद्वत्तेचे प्रदर्शन करण्याची हाव त्या युवकाला नव्हती. त्याच्या पूरक आणि प्रेरक साथीला बुवा वाव देत होते. त्यावरच तो बेहद्द खूष होता.

पहिल्याच आवर्तनावर फिदा होऊन श्रोत्यांनी त्या छाव्याला डोक्यावर घेतले आणि–

'बहोत अच्छा 'ची खैरात केली. 'इनको बजाने दो ' म्हणून फर्माईश झाली. म्हणून त्याच जवानाने शेवटपर्यंत साथ केली.

मैफल संपल्यावर बुवांचे साथीदारांशी असलेले संबंध तुटत नसत. उलट त्या रेशीमधाग्यांत बुवा अधिकाधिक गुंतत असत.

त्या दिवशीही बैठक संपल्यावर बुवांनी खास शाबासकी देऊन– बक्षिसी देऊन– मायेने चौकशी केली,

" तुझा प्रपंच कसा चालतो बाळ ?"

जवान उद्गारला– " बस साथ बजाकर गुजारा करता हुं. आप जैसे विद्वान गुनीजनों की साथ तो कभी कभीही होती है. अल्ला मालिक है. "

बुवांनी दूरदर्शीपणे विचारले, " हमारे साथ बम्बई चलोगे ? तकल्लूफ करनेकी कोई जरुरत नहीं. बम्बईमें अच्छी आमदनी होगी और नाम भी रौशन करोगे. "

भास्करबुवांच्या खांद्यावर विश्वासाने मान टाकून तो तरुण तबलजी त्यांच्या-बरोबर मुंबईला आला. आल्या आल्या त्यांचे चाहते व शिष्य मणेरीकर मास्तर यांचेकडे तबलावादनाचा कार्यक्रम ठेवण्यात आला.

योगायोग चांगले असले की सर्व धागे आपोआप जुळून येतात. नेमकी त्याच वेळी गंधर्व नाटक मंडळी मुंबईस होती. तबलावादनाचा कार्यक्रम तत्कालीन नाटकाच्या सुटीच्या दिवशी मुद्दाम गुरुवारी आयोजण्यात आला

रात्री नऊ ते बारापर्यंत तब्बेतीत कार्यक्रम झाला. वजनदार सौंदर्यपूर्ण कायदे, रेळे यांची रेलचेल झाली. सर्व बाज त्या त्या पद्धतीने वाजवले गेले आणि वादन संपन्न झाले.

पण कधी कधी एका मैफलीची समाप्ती दुसऱ्या मैफलीचा प्रारंभही ठरतो, शास्त्रोक्तप्रमाणेच सुगम संगीतालाही आजचे वादन पूरक आहे असे सर्वांचे मत पडले. तो जनमानसाचा कौल पाहून भास्करबुवा बालगंधर्वांना म्हणाले,

" नारायण, या हिऱ्याला कंपनीच्या कोंदणात जडवून टाक. म्हणजे आज तू जे ऐकलेस ते हजारोंच्या कानावर साज चढवून जाईल. "

बालगंधर्वांनी गुरुजी आज्ञा प्रमाण मानली आणि दुसऱ्याच दिवशीपासून या तबलजीने गंधर्व कंपनीत राहण्याचा करारनामा भास्करबुवांच्या साक्षीने करण्यात आला.

पुढे सुप्रसिद्ध झालेला हाच तो तबलजी–

' उस्ताद अहमदजान थिरकवा ...'

हे रत्न बुवांगत रत्नपारख्यामुळेच जगासमोर आले !

बुवांनी गंधर्व कंपनीला उत्तम तबलजी मिळवून दिला. तसाच उत्तम नायकही दिला. मागच्या पिढीतले पं. जगन्नाथबुवा पंढरपूरकर. ते देवळाबिवळात गाऊन पोट भरत होते. त्यांचा बुलंद पहाडी आवाज ऐकून भास्करबुवांनी त्यांना हाताशी

धरले.

त्याच्यावर शास्त्रोक्तप्रणित नाटचसंगीताचे संस्कार घडवले आणि नाटच-सृष्टीला एक उत्तम गायक नायक दिला.

बालगंधर्वांच्या बरोबर स्त्रीभूमिका करणारे मास्तर कृष्णराव यांची स्वतंत्र स्वररचना करण्याची प्रज्ञा भास्करबुवांच्या लक्षात आली. पण शिष्याचा हा गुण दडपून न टाकता तो उमलून यावा– त्याला धुमारे फुटावेत असा बुद्धिपुरस्सर प्रयत्न बुवांनी केला आणि तो यशस्वी झाला.

द्रौपदी नाटकाचे संगीत दिग्दर्शन चालू असतानाच त्यांना जालंदरच्या वार्षिक उत्सवास जाणे भाग पडले. तेव्हा फक्त दोन पदांच्या चाली करणे शिल्लक होते. ते काम बुवांनी उदारपणे आपल्या लाडक्या शिष्यावर सोपवले.

विशेष म्हणजे बुवांच्या चालीशी संगत करतील– विसंगत न ठरतील अशाच चाली मा. कृष्णांनी दिल्या. त्या रसरशीत आणि ठसठशीत चाली गुरुचीच नव्हे, तर रसिकांचीही शाबासकी घेऊन गेल्या.

' पांडवा सम्राट पदाला ' आणि ' विराट जानी ' हीच ती दोन पदे आणि हाच कृष्णामास्तरचा संगीत दिग्दर्शक म्हणून रंगभूमीवरचा पहिला पदन्यास.

*

# अठ्ठावीस

श्री. माधवराव केळकर यांच्या वाडयालाही फरशीवाले साठयांच्या वाडया प्रमाणे गाण्याचे वरदान होते. त्यांच्या वाडयात श्री. गणपतबुवा पाध्ये हे विद्वान गायक राहात. ध्रुपद, टप्पा, इत्यादीत त्यांची खासीयत होती.

तसेच नाटचकलेचे मालक पटवर्धन यांचा पुतण्या वर केळकरांच्या घरीच राहत असे. कुंदगोळकरांचा एक तंबोरा तिसऱ्या मजल्यावर असे. तेथे गाण्याच्या खाजगी मैफली मनसोक्त झडत असत. निजामुद्दीन, रामकृष्णबुवा वझे आदी लोकांचा अड्डाच असे. तिसऱ्या मजल्यामुळे लोकांना गाण्याचा उपद्रव होत नसे.

वाडयातले पाध्येबुवा हे भास्करबुवांचे अनन्य भक्त होते. काही काळ ते फैजमहम्मदखाँकडे शिकलेही होते. त्यांचे गुरुबंधू असूनही बुवांना गुरुस्थानी मानत असत. बुवांबद्दल त्यांना विलक्षण अभिमान होता. ते म्हणत–

" भास्करबुवांच्या गाण्याचा वा नाटचसंगीताचा मोह पडला नाही असा

दर्जेदार श्रोता माझ्या पाहण्यात नाही. आधी कुणी का गाईना अगर नंतर गाणारा कुणी का असेना, बुवांना आधी-मग हा मानापानाचा प्रश्न सतावत नाही. चुरस करताच येत नाही.

ते प्रथम बसले तर नंतरचे गाणे परिणामकारक होणे कठीण. आणि ते नंतर गायले तर आधीचे गाणे श्रोत्यांच्या कानांत रहाणे कठीण !"

एकदा पं. विष्णू दिगंबर पलुस्करांचे आणि त्यांचे गाणे एका बैठकीत ठेवण्यात आले. पं. पलुस्करजी खूप जमून गायले. त्यांचा रंग श्रोत्यांच्या मनातून भंग न पावावा म्हणून नंतर गायचे ठरले असून भास्करबुवांनी जाहीर केले—

" माझे गाणे उद्या होईल."

खरोखर गाण्याच्या थोरपणाइतकाच बुवांच्या मनाचा थोरपणही किती विलोभनीय होता.

या सर्व गोष्टी पाध्येबुवांच्या तोंडून ऐकताना और रंग चढे. कारण पाध्येबुवा भास्करबुवांच्या आरतीत कायम निमग्न असत. ते त्यांचे जसे आराध्यदैवत होते. बुवांचे जमलेले गाणे ऐकले— आणि ते सहसा नेहमीच जमलेले असे— म्हणजे आठवडाभर पाध्येबुवा त्याच गुंगीत असत.

गाणे डोक्यात असले की खाणेपिणे दूर असे. त्या धुंदीत एकदा काचकिरडा भातही मिटक्या मारीत खाल्ला होता. तिखट आमटीही भुरके मारमारून ओरपली होती.

त्या दिवशी ते असेच तंद्रीत म्हणत होते—

" वा ऽ ऽ काय जागा गेली."

तेवढ्यात त्यांच्याकडे आलेले कुणी पाहुणे न्हाणीघरातून बाहेर आले आणि म्हणाले—

" जागा गेली ? इतकी चांगली भरवस्तीतली जागा गेली ? थांबा, त्या तुमच्या केळकर मास्तरला चांगला धडा शिकवा. त्याला म्हणावं— आम्ही आमच्या खोलीत नाचू नाहीतर गाऊ. पण आम्ही जागा खाली करणार नाही."

खोऽ खोऽ हसत पाध्ये म्हणाले—

" अहो, माझी राहती जागा गेलेली नाही. काल भास्करबुवांच्या गाण्यात फार चांगली जागा गेली. त्याबद्दल बोलत होतो मी."

असे हे पाध्येबुवा नेहमीचे ध्रुपद धमाराचे वळण सोडून—

"' मम आत्मा गमला हा— वाटे प्राणसखा आला, परतुनी गेला "

असे मुक्तकंठाने गाऊ लागले की शिष्यमंडळी अचूक ओळखीत असत की, आत्ता पाच मिनिटांपूर्वीच भास्करबुवांची पायधूळ क्लासवर झडली आहे.

फार दिवसांत ज्ञानदेव भेटले नाहीत की नामदेवांची जी अवस्था होत असेल

तीच फार दिवस भास्करबुवा भेटले नाहीत की पाध्येबुवांची होत असे.

"ऐसी कळवळ्याची नाती, जी लोभावीण करी प्रीती"–

अशी अवस्था होती. भास्करबुवांचे सुखदुःख तेच पाध्येबुवांचे सुखदुःख होय.

एकोणीसशे वीस साली तूर्त आग्रा येथे राहणारे भास्करबुवांचे दोन गुरुबंधू नथ्थनखाँसाहेबांचे चिरंजीव महम्मदखाँ आणि अबदुल्ला यांना मृत्यूने गाठले ! त्याचवेळी वृद्धगुरुजी फैजमहम्मदखाँ हेही पैगंबरवासी झाले.

या जखमा खोलवर झाल्या ! जीवघेण्या होण्याइतक्या दिवाण्या ठरल्या !

या औदासीन्याचे सावट सदाप्रसन्न असणाऱ्या भास्करबुवांच्या चेहऱ्यावर उमटल्याशिवाय राहिले नाही. आणि त्याचे पडसाद कनिष्ठ बंधूगत असणारे पाध्येबुवा आणि ज्येष्ठ बंधूगत असणारे शंकरबुवा यांच्यावर उमटल्याशिवाय राहिले नाहीत. प्रवाहातील वादळाचा परिणाम दोन्हो थडींवर दिसल्याशिवाय राहात नाही.

या बाहेरील आपत्तीत भर म्हणून की काय पुण्यास फरशीवाले साठे यांच्या वाड्यातच बिऱ्हाड असलेल्या तान्हुताईंना टांग्याचा अपघात झाला. टांग्याखाली चेंगरून पाय मोडला.

भास्करबुवांनी स्वतःच्या तब्बेतीसाठी आणि विश्रांतीसाठी सासूरवाडी सातारला जाण्याचा बेत केला होता. तो बाजूला ठेवून बुवा बहिणीची देखभाल करू लागले. पाण्यासारखा पैसा खर्च झाला. ताईंनी नणंदेची अमाप सेवा-शुश्रूषा केली, पण यश आले नाही. पायाचे दुखणे विकोपास जाऊन तान्हुताईंचा अंत झाला !

तिला पोहोचवून आल्यावर बुवा देवासमोर बसून ढसढसा रडले ! आणि म्हणाले–

"तान्हुताई बडोद्यात होती म्हणूनच मी उभा राहिलो...गायक झालो. स्वभावाने कशीही असली तरी मनाने निर्मळ होती. माझ्यावर आईची माया करीत होती...

देव तरी किती निष्ठुर ! फैजमहम्मदच्या रूपात माझे पिताजी भेटत. त्यांनाही काळाने ओढून नेले ! महम्मद आणि अबदुल्ला यांच्या रूपात पाठचे भाऊ होते तेही हिरावले गेले ! आणि आता मायेची ममता करणारी तान्हुताईही गेली...कायमची गेली...

मी कीर्तीने आणि संपत्तीने चढून जाऊ नये म्हणून तर आपत्तींनी माझ्यावर हा हल्ला चढवला नसेल ना ? नियतीने हा समतोल साधला नसेल ना ? हाय ! हाय ! आता या हट्टी भास्करचे हट्ट कोण पुरवणार ? सांगा ना. कोण कोण जिवाभावाचं उरलंय या भास्करला ?"

तेवढ्यात शंकरबुवा जवळ आले. त्यांच्या पाठीवरून मायेने हात फिरवून म्हणाले–

" वेडे का भास्करबुवा तुम्ही ? आयुष्यात मी मी म्हणत शेकडो संकटे आली तेव्हा त्यांच्याशी दोन हात करून बाजूला सारलीत. आणि आता नियतीने चार-दोन आघात केले तर मोडता– वाकता– बाईप्रमाणे मुळमुळ रडत बसता ?

लक्षात आहे ना ? पुढच्या पंधरवड्यात आपल्याला उत्तरेला जायचं आहे. तुम्हाला तिथं गायचं आहे."

आणि खरंच भास्करबुवांनी तंबोऱ्याच्या गवसणीत आपले परमदुःख गुंडाळून टाकले ! ताणलेली तार गोड बोलते. त्याप्रमाणे मनावरचा तणाव सहन करूनही कलावंताला गोड गायलाच लागते !

तरीपण मनाला असह्य झाले की ते तनावर ढकलले गेल्याविना राहात नाही हे बुवा विसरले.

कारण अलीकडे मैफलीचा कैफ उतरला की, त्यांना देहाची कुरकूर ऐकू येऊ लागली. तापलेला आवाज बंद झाला की, अधूनमधून तापणाऱ्या शरीराची जाणीव होऊ लागली. पण तेवढ्यातच शिकारपूर, जालंदरची निमंत्रणे आली आणि ती पथ्यावर पडली.

बुवांच्या दुःखीकष्टी मनाला हा विरंगुळा चांगला मानवला. तिकडली कोरडी हवा– कसदार खाणे-पिणे– गुणिजनांचा सहवास आणि फक्त गाण्याचाच ध्यास यामुळे दुःखांचा विसर पडला. प्रकृतीत सुधारणा झाली. बुवा पुण्याला आले. बंद केलेल्या शिकवण्या पुन्हा चालू झाल्या.

भास्करबुवा कलासौंदर्याचे पूजक होते. पण तोंडपुजेपणा त्यांना अगदी आवडत नसे. त्यामुळे स्तुतीच्या भरात इतर घराण्याच्या थोर गायकांचा पाणउतारा करण्याचा प्रयत्न कुणी केला तर त्याला शाब्दिक चपराक मिळाल्याविना राहत नसे.

एकदा नव्याने शिकवणीला येऊ लागलेल्या मुलाचे वडील मोरगावकर दीक्षित वर्गात आले आणि बुवांची स्तुती करण्याच्या भरात म्हणाले–

" बुवा, तुमच्या शिकवणीमुळे माझा मुलगा अब्दुलकरीमपेक्षाही चांगला गाऊ लागलाय."

हे ऐकताच बुवांची तळपायाची आग एकदम मस्तकाला गेली ! ते भडकून उठले !

" तुमचा लेकच नव्हे तर दहा जन्म घेतले तरी खाँसाहेबांची बरोबरी कुणालाच करता यायची नाही. त्यांची स्वतःची शैली आहे. तिचे स्वतःचे सौंदर्य आहे आणि माधुर्यही आहे. बाजारबुणग्यांनी हुर्यो करून मरणारी ती गायकी नाही."

लक्षात ठेवा, कोणत्याच गवयाची निंदा वा तुलना मला सहन व्हायची नाही.

कारण जो तो आपापल्यापरीने मोठाच असतो. प्रत्येक फुलाला स्वतःचा स्वतंत्र रंग असतो, स्वतंत्र गंध असतो. आकार असतो. तसाच प्रत्येक गायकाला स्वतःचा खुशबु असतो– व्यक्तिमत्त्व असते– रंगतही असते. उगीच ' उचलली जीभ लावली टाळघाला ' असे त्यांचे गाणे नसते.

मोरगावकर दीक्षित वरमले. खाली मान खालून निघून गेले.

पण गंमत अशी की, अब्दुल करीमखाँबद्दल भास्करबुवा जसा आदर बाळगून होते, तसाच भास्करबुवांबद्दलचा आदर अब्दुलकरीमचा एक कीर्तिमान चेला बाळगून होता.

सवाई गंधर्व तथा रामभाऊ कुंदगोळकर भास्करबुवांच्या गायकीने वेडावले होते. बुवांचे शिष्य गणपत पुरोहित आणि मणेरीकर यांचेकडे ते वरचेवर येत आणि कृष्णामास्तरांना शिकवलेल्या आडाणा-सोहोनी आदी रागांचा रियाज करीत बसत.

एक दिवस केळकरांच्या वाड्यात आले असताना ते म्हणाले–

" बाबुराव, आज मी तुमच्याकडे तासभर गायलो त्यात भास्करबुवांच्या कितीतरी जागा आहेत. मी त्या जागांनी झपाटलो आहे...

म्हणूनच माझ्या आयुष्यातली सर्वांत मोठी महत्त्वाकांक्षा ही आहे की, मी भास्करबुवांसमोर गावे आणि शाबासकीचे हात पाठीवरून फिरवून घ्यावेत. त्यांची शाबासकी मिळाली तर माझी विद्या सार्थकी लागेल. मी स्वतःला धन्य समजेन."

थोरांचा आशीर्वाद हा जीवनातला सुसंवाद साधण्यास नेहमीच उपयोगी पडतो. तीव्र इच्छेचे फळ रामभाऊ कुंदगोळकरांना लवकरच मिळाले.

डेक्कन जिमखान्यावर एकोणीसशे एकवीस साली परिषद झाली. त्यात सवाई गंधर्व तथा रामभाऊ कुंदगोळकर गायले. विशेष म्हणजे ते गाणे भास्करबुवांनी लक्षपूर्वक ऐकले आणि मग पाठ थोपटून मनापासून शाबासकी दिली– तेव्हा सवाई गंधर्वांच्या लोचनांत आनंदाचे झरे उभे राहिले.

पण एखाद्याला शाबासकी देण्यात बुवा मागे नसत. त्याचप्रमाणे एखाद्याला सावध करण्यातही मागे नसत.

म्हणूनच रामकृष्णबुवा वझे अभिमानाने सांगत–

" मी कधी कधी तडफेने गातो, ती तडफ माझी नव्हे. भास्करबुवांची. स्वरा-स्वरांना सजीव करण्याची कला आणि लयीत रंग भरण्याची कला मी त्यांच्या-पासूनच शिकलो. पण म्हटलं, आम्ही बुवांची बोलणीसुद्धा खातो बरं का ?"

केळकरांच्या वाड्यात आलेल्या वझेबुवांना पाध्येबुवांनी विचारले–

" बोलणी तुम्ही कशाला खाताय ?"

रामकृष्णबुवा वझे सांगू लागले–

" अहो, कुणा आशुकमाशुक गायकाकडून आम्ही थातूरमातूर चिजा घेतल्या

तर भास्करबुवांनी सुनावले–

" अहो, कुणा फडतूस माणसाकडून बेहिशेबी चिजा घेत असता बुवा ? त्यामुळे कुत्र्याचे पाय मांजराला आणि कोकिळेचा कंठ कावळ्याला अशी अवस्था होते. बुवा– तुमच्याजवळची विद्या दहा जन्मांना पुरेल इतकी आहे. तेव्हा उत्तम वळणाच्या माणसाकडून उत्तम चिज तेवढी घेत जा. "

स्वतःचे कान पकडून वझेबुवा पटकन् म्हणाले–

" आमचेही कान पकडायचा असा अधिकार भास्करबुवांना आहेच. "

अशा या अजातशत्रू संगीतमित्र भास्करबुवांचे ध्वनिमुद्रण ग्रामोफोन कंपनी-कडून व्हावे म्हणून काही रसिक खटपटी लटपटी करू लागले. अर्थात तासभर एकेक राग आळवणाऱ्या बुवांची गायकी तीन मिनिटांच्या तबकडीत पकडणे म्हणजे महासागराला ओंजळीत पकडण्यासारखे आहे हे सर्वांना समजत होते.

पण दुधाची तहान ताकावर भागवायला तेवढेच एक माध्यम बहुजन समाजाच्या हातात होते. पाकळीवरून फुलाची परीक्षा करायला भावी पिढीला त्यावरूनच सोपे जाणार होते. कुणाला तेवढेही मार्गदर्शक, पथप्रदर्शक राहणार होते.

उसाचा मळा घरात आणणे हा खुळा प्रयत्न खराच, पण साखरेची मूठ डबाबंद करायला काय हरकत आहे– अशा हिशेबाने धारवाडचे बाबू शामनाथ गुर्टु यांनी भास्करबुवांचे ध्वनिमुद्रण करायचे ठरवले.

बुवांची मनोभूमिका तयार करण्यासाठी त्यांनी जोहराबाई– मौजुद्दीनखाँ आदींच्या ध्वनिमुद्रिका बुवांना ऐकवल्या. जमीन थोडीशी भुसभुशीत झालीसे वाटले, तशी गुर्टुंनी दडपून ग्रामोफोन कंपनीच्या मॅनेजरशी पत्रव्यवहार केला.

थोडीफार घासाघीस होऊन कंपनीने एकदम बारा ध्वनिमुद्रिका घेण्याची तयारी दर्शवली. व्यवहार आणि खप या दोन्ही दृष्टींनी शास्त्रोक्त आणि सुगम संगीताच्या ध्वनिमुद्रिका घ्याव्यात असे कंपनीने सुचविले.

ध्वनिमुद्रणपूर्व चाचणीचा दिवस मुक्रर करण्यात आला. गुर्टुंमार्फत तो बुवांना कळवण्यात आला. पण कोणत्या कारणाने कोण जाणे– बुवा चाचणीलाच गेले नाहीत. मग ध्वनिमुद्रिका कसल्या निघतात !

बुवांच्या संगीताची सुधा भावी पिढ्यांना प्राशन करण्याची सुवर्णसंधी अशी निसटली... वाया गेली !

भारतीय संगीताचे हे केवढे कमनशीब ! ! !

ध्वनिमुद्रण करण्याच्या बाबतीत काहीसे हटवादीपणे बुवा वागले. त्याचप्रमाण संयुक्त मानापानाच्या वेळीही वागले.

स्वयंवरानंतर द्रौपदी नाटकाला चाली दिल्या गेल्या. त्याही चाली स्वयंवरा-सारख्या भारदस्त होत्या. भैरवीत तर बुवांनी नवीन प्रयोग केला. फैजमहंमदखाँ-

कडून त्यांना ' सोज ' म्हणून प्रकार मिळाला होता. तो जितका करुण तितकाच रंजकही असे.

बुवांनी वस्त्रहरणाच्या वेळी— ' मी जरी आज केशवा, माधवा, गमविली लाज—' हा धावा सिंधभैरवीतील सोज प्रकारात बांधला आणि तो रसिकांच्या मनाचा ठाव घेऊन गेला.

पण नंतर काही काळ बुवा गंधर्व कंपनीवर रुसले, काहीसे दुरावले, त्याच्या बुडाशी दुखणे होते संयुक्त मानापमानाचे. ललितकलादर्शचे केशवराव भोसले यांनी धैर्यधराची आणि बालगंधर्वांनी भामिनीची भूमिका करून ' संयुक्त मानापमाना 'चा प्रयोग करण्याचे ठरले. टिळक स्मारक फंडासाठी हा प्रयोग होता.

लोकमान्यांच्यावर बुवांचे मनापासून प्रेम होते. ते वारल्यावर बुवा सैरभैर झाले होते. विरोध फंडाला नव्हता. संयुक्त प्रयोगाला विरोध होता. कारण परिणामी केशवराव भोसल्यांच्या आक्रमक संगीतापुढे बालगंधर्वांचे नजाकतीचे नाजूक गाणं फिके पडेल आणि पुढेमागे त्यांना व्यावसायिक पराभव पत्करावा लागेल हे शल्य वाटून की काय बुवांनी नारायणरावांना संयुक्त मानापमानापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला.

पण तो फलद्रूप न होता बालगंधर्वांनी संयुक्त मानापमानाला होकार दिला.

तेव्हा आपण रक्ताचे पाणी करून तयार केलेल्या शिष्याचा पाडाव पाहणे हळव्या भास्करबुवांना कल्पनेतही असह्य झाले आणि ते ऐन प्रयोगाचे दिवशी अज्ञातस्थळी निघून गेले.

त्यांचे नूतन शिष्य धामणकर हे कशालासे सातारला गेले होते. त्यांना भास्करबुवा नेमके त्यांच्या सासुरवाडी भेटले. बुवांनी तावातावाने आपली भूमिका समजावून सांगितली. बुवांच्या त्या भक्ताला ती इतकी पटली की धामणकर गुरूला दुखवायला नको म्हणून तिकीट काढले असून पुण्याला नाटकाला गेले नाहीत.

पण गुरु-शिष्यांचा हा दुरावा फार टिकणे म्हणजे चंद्राने चांदण्यांपासून दूर राहाणे, सुराने तंबोऱ्यापासून अलग होणे...

अखेर नाट्याचार्य खाडीलकर या बुवांच्या शिष्याने व गंधर्वकंपनीच्या हित-चिंतकांनी एक गोड कट रचला. ते भास्करबुवांना भेटले. कंपनीच्या गणेशोत्सवातील ' श्रीं 'च्या प्राणप्रतिष्ठेचे निमंत्रण बुवांना आवर्जून केले, तेव्हा गणेशभक्तबुवांनी हा प्रश्न प्रतिष्ठेचा न करता— बालगंधर्वांच्या प्रेमाखातर ते पुन्हा कंपनीत गेले. सर्वांच्या आग्रहास्तव गायले. आणि—

आणि हा अबोला स्वरांच्या रेशमाने पुन्हा सांधला गेला ! कुठल्याही अ-सुर प्रवृत्तीवर मात करतो त्यालाच सूर म्हणतात ना— कुठलीही विसंगती संगती करते त्यालाच संगीत म्हणतात ना ?

त्या गणपतीत ताईंनी नारायणरावांना मुद्दाम जेवायला घरी बोलावले आणि उकडीचे मोदक केले. तो लुसलुशीत मऊसूद मोदक खाताना नारायणराव म्हणाले–

" उकड छान जमलीय हं वहिनी."

ताई बुवांकडे कटाक्ष टाकून म्हणाल्या–

" कालपर्यंत विरी गेलेले तांदूळ आज श्रीगणेशाच्या कृपेने वळणावर आले."

दोघेही गुरुशिष्य मनापासून हसले तशी ताटातले मोदकही गोडगोड हसले.

*

# एकोणतीस

भास्करबुवांना महाराष्ट्रात शिष्य मिळाले, तसेच उत्तरेलाही मिळाले होते. जालंदर–अमृतसर व शिकरापूर येथे अनेक गुणी, घराणेदार युवकांनी भास्कर-बुवांजवळ शिकण्याची इच्छा व्यक्त केली. त्यामध्ये दिलीपचंद्र वेदी, तबक्कल हुसेन, मुरादअली, हरिश्चंद्र बाली, हंसराजभाई, समुद्रसिंध व भाईलाल नबाबी ही नावे विशेष उल्लेखनीय मानावी लागतील.

पैकी दिलीपचंद्र बुवांचे गंडाबंध शागीर्द झाले. आणि एकोणीसशे अठरानंतर काही वर्षे का होईना– बुवांच्या प्रत्यक्ष सहवासात राहिले. बाकीच्यांना मात्र अधून मधूनच ही संधी मिळाली. आणि वाऱ्यावर वाहात आलेल्या सुरांवरच समाधान मानावे लागले.

या सर्वांनी बुवांच्या वर्णनपर वीस एक ख्याल रचले. एवढे ते बुवांच्या गाण्यावर आषक झाले होते. हे सर्व शिष्य बुवांच्या उत्तरेला येण्याची चातकाप्रमाणे वाट पाहात असत. त्यांच्या लेखी हा वर्षातून काही काळ बरसणारा घनश्याम–मुरलीमनोहर होता. नटराज होता. सारे काही होता.

प्रेम पेरले की प्रेम उगवते. भास्करबुवाही या गुरुभक्तीची तितक्याच ऋजुतेने फेड करीत. त्यांना उमाप देत. उदंड देत.

संगीताच्या सरसरून सरी येत. शिष्यांना शीतल करीत. चिंब करीत. तृप्त करीत. पण हा मेघ दुसऱ्यावर वळता वळता स्वतः एकीकडे वाळत होता हे कुणाच्या लक्षातच येत नव्हते.

या खेपेला भास्करबुवा जालंदरला जायला निघाले तेव्हा त्यांची पावले जड झाली होती. कारण ताई चौथ्या खेपेला गरोदर होत्या. दिवस भरत आले होते.

तसे येऊन राहाण्याजोगे कोणी नव्हते. त्यामुळेही काळजी होती.

त्यांचे सामान बांधून टांग्यात ठेवून त्यांना नेहमीप्रमाणे दारापर्यंत पोहोचवायला आलेले शंकरबुवा अष्टीकर म्हणाले–

" भास्करबुवा– इथली काळजी करू नका. गाणे बिघडवू देऊ नका. इथलं सारं महाविष्णू बघून घेईल."

" महाविष्णूच नव्हे, तर शंकरसुद्धा !"

तोच शंकरबुवा पुढे म्हणाले–

" प्रसूती झाली की तार करतो."

" मुलगा झाला तरच तार करा. मुलगी झाली तर नको."

" या खेपेला ठुमरी नाही. ख्याल– टप्पा नाही तर तराणाच अवतरणार."

" कुणीही येवो. येणारे आपल्या नशिबानेच येत असते."

" नशिबाने येते पण तुमच्यागत कर्तृत्वाने वाढते. बरं, सांगायचं विसरतच होतो. हर्डीकरांकडे माईचे टिपण नेऊन देणाराय् !"

" टिप्पण जमलं तर मुलगी दाखवणे– बोलणी करणे– सारं तुम्हीच करून टाका."

" वा ऽ असं कसं ?"

" तसंच. लग्न करायला वडिलांपेक्षा अनुभवी वडील माणसांची जरुरी असते."

" ठीक आहे. ते जुळले तर तेही कळवतो."

भास्करबुवा सद्गदित होऊन टांग्यात चढता चढता म्हणाले,

" माईच्या कुंडलीत कोणतेही ग्रह असोत. माझ्या कुंडलीत तुमच्यासारखा शुभग्रह आहे म्हणून बाक्याप्रसंगी निभावून जातो."

आणि भास्करबुवा जालंदरला गेले.

जालंदरची मैफल रंगात आली होती. आणि त्याच वेळी तार आली. भास्करबुवांची तार आली म्हणताच मणेरीकर ओरडले–

" नक्कीच आम्हाला गुरुबंधू झाला."

आणि तार वाचण्यापूर्वीच भास्करबुवांनी साऱ्या मंडळींना थाळीभर मिठाई खिलावली ! नंतर सावकाशीने खोलीत आल्यावर स्वस्थपणे तार उघडली तर आत मुलगी झाल्याची बातमी ! बुवा हसत ओरडले–

" मणेरीकर, ख्याल नव्हे, ठुमरीच आली हो."

मास्टर कृष्णराव तार वाचत म्हणाले–,

" असू दे मुलगी. आम्हा भावंडांना भाऊबीज घालायला काही कमी नाही."

मुलीचं नाव प्रमिला ठेवण्यात आलं. हे शेंडेफळ बुवांचे खूप लाडके होते.

मुलगी म्हणून डावलले गेले नव्हते. मुलगी नाकी-डोळी बुवांवर पडली होती. लहान होती तरी तासन् तास बुवांच्या शिकवण्या ऐकत बसत होती.

बुवांच्या ताटात जेवायची. बुवांच्या कुशीत झोपायची. होती जेमतेम वर्ष-भराची. ताई थट्टेने म्हणायच्या देखील—

" हे प्रकरण आपण फारच लाडावून ठेवलं आहे बरं का "

" अहो, आमची विश्रांती आहे ती."

आणि ते लेकीच्या कौतुकात गुंग व्हायचे. आजवर अशा विश्रांतीची गरज नव्हती असं नाही. पण ती आजवर भासली नव्हती हेही खरे.

अलीकडे मात्र मायेची माणसं दुरावल्यापासून बुवाच मनाने खचल्यागत झाले होते. गाताना लौकर थकत होते. जेवताना लवकर उठत होते. त्यांची भूकच नव्हे, तर झोपही कमी झाली होती. ताई मधून मधून म्हणत—

" एखाद्या चांगल्या डॉक्टरला तब्बेत दाखवावी मी म्हणते."

" दाखवली की ते विश्रांतीचा सल्ला देतील."

" मग चार दिवस सासुरवाडी साताऱ्याला जावे आणि स्वस्थ बसावे."

" छान. म्हणजे आम्ही आणखीच अस्वस्थ होऊ ! संगीत होच आमची विश्रांती आहे. तुमच्या लक्षात नाही वाटतं ?"

त्याच गणपतीत धामणकरांच्या शीवच्या गाण्यात भास्करबुवा गायले. एवढेच नव्हे तर धामणकरांकडे राहिले सुद्धा. तेव्हा देव भक्ताघरी आल्यावर भक्ताला व्हावा तसा आनंद धामणकरांना झाला. त्यांनी त्यांची गाण्यानंतरच्या खाण्या-पिण्याची सोय केली. इतकेच नव्हे तर उकडत होते म्हणून गॅलरीत बिछानाही घालून दिला. आणि रात्रभर गुरूवर पहारा केला.

एकदा धामणकर ब्राह्मणसभेच्या गणपतीच्या गाण्याला आले. गाणे चालू झाले. बढत सुरू झाली. रंगत येऊ लागली. पण संगत असणारे दिवे देहभान विसरले. आणि आपल्या तेजाची शरम वाटून की काय एकदम विझले.

अंधार झाल्याने क्षणभर गाणे थांबले. व्यवस्थापक दुसरा दिवा आणायला धावले. तशी न डगमगता बुवा विनोदले—

" पूर्वीचे गवई दीप राग गाऊन दिवे लावत. आमच्या गाण्याचा प्रभाव असा की आम्ही गात असता दिवे विझतात."

कुठलेही विघ्न हसून साजरे करण्याची बुवांची तऱ्हा पाहून श्रोते चकित झाले.

तंबोरे चालूच होते. बुवांनी पुन्हा चालू रागातील जोमदार आलाप घेऊन सम गाठली. सारे वातावरण दीपाविनाही पुन्हा प्रकाशित झाले.

त्यानंतर जालंदरच्याच एका मैफलीत शंकरबुवांची, माईची सोयरिक

हर्डीकरांकडे पक्की झाल्याची तार आली. त्या दिवशी दुपारच्या मैफलीत उल्हसित झालेल्या भास्करबुवांनी शुद्ध सारंगातील ही चीज काढली–

‘ अे बना बना आया
आया रे मोरे द्वारे –।।धृ।।
बनरेकी सीर मोर बिराजित
बनरेकी मांग भराया–’ ।।१।।

त्यावर्षी उत्तरेचे एकही गाणे भास्करबुवांनी सोडले नाही. लाडक्या माईचा विवाह थाटामाटात व्हावा म्हणून त्यांनी मुठी भरभरून बिदागी गोळा केली. स्वतःच्या खर्चिक स्वभावाला लगाम बसावा म्हणून एका व्यवहारी मित्राकडे ठेवून दिली.

लग्न पुण्याला मोठ्या दणक्यात, ऐश्वर्यात झाले. राजेरजवाड्यांनी लाजावे असे झाले. नाहीतरी संगीतकलेच्या महाराजाकडचेच लग्न होते ना ते ? सरदार बिवलकरांचा बिलोरी काचमहाल असलेला वाडा घेतला गेला.

लग्नाला सारे रसिक पुणे लोटले. आप्तस्वकीय आले. गायक आले. वादक आले. नर्तक आले. नट आले. नाटककार आले. या लग्नाच्या निमित्ताने साऱ्या कलावंतांचे जसे सम्मेलनच जमले.

बुवांच्या गोमंतकीय शिष्या माहेरवाशीणींच्या नात्याने आल्या. चार दिवस आल्या. राहिल्या. गायल्या. प्रेमाने नाचल्यासुद्धा.

सीमांतपूजन, विवाहसमारंभ, आणि मांडवपरतणी असा तीनचार दिवस लगीनसोहळा झाला. रोज निरनिराळ्या पक्वानांच्या पंक्ती तर झडल्याच, पण रोज निरनिराळ्या गायकांच्या मैफलीसुद्धा झाल्या.

लग्नाची सारी जय्यत तयारी शंकरबुवा अष्टीकरांनी बुवा येण्यापूर्वीच करून ठेवली होती. अगदी सालंकृत कन्यादानाचीसुद्धा. बुवांच्या मनात आले–

“ स्वार्थाची भेसळ नसलेली शुद्ध मैत्रीच असे शुद्ध साज घडवू शकते. ”

दक्षिणेपासून उत्तरेपर्यंतच्या गायकांचा मेळावा भरवून गेलेले ते लग्न नंतरही पुणेकरांच्या फार दिवस लक्षात राहिले.

पण कठोर नियतीला हे सौख्य पाहवले नाही. सुखाच्या नाण्याच्या मागच्या बाजूला दुःखाचा काटा असतो याचा प्रत्यय भास्करबुवांनाही आला. कारण लग्न होऊन सहासात महिने होतात तोच माईला बारीक ताप येऊ लागला. डॉक्टरांनी कोरड्या हवेवर घेऊन जाण्याचा सल्ला दिला.

लाडक्या लेकीला क्षय झालेला ऐकून बुवांच्या कंठातले अक्षय संगीतही क्षणभर सैरभैर झाले ! बुवांनी सर्व कार्यक्रम बाजूला ठेवले. रद्द केले.

आणि गाण्यातली लय माईच्या कारणी लावली.

मुलगी सासरी गेली म्हणजे तिची जिम्मेदारी संपली, असे मानणारे भास्कर-बुवा नव्हते. म्हणून ते जामात हर्डीकरांच्या मदतीला धावले. मुंबईचे विख्यात डॉक्टर आणि हरहुन्नरी शिष्य घेऊन बुवा जातीने मिरजेस माईजवळ जाऊन राहिले.

पाण्यासारखा अलोट पैसा खर्च झाला. बेभान होऊन बुवांनी शुश्रूषा केली. शिष्यांनी धावपळ केली. शंकरबुवांनी देवावर अभिषेकाची संततधार धरली. ताईंनी नवस केले. डॉक्टरांनी प्रयत्नांची शिकस्त केली.

पण दैव !

मोठा दुर्दैवी शब्द !!

काळाने दुष्टावा साधला. दैवाशी संगनमत करून माईचा प्राण घेऊन गेला !!!

एका हळव्या कलावंत पित्याची पर्वा न करता......

एका वत्सल मातेची कदर न करता......

एका नवविवाहित पतीच्या भावनांची किंमत न करता......

मृत्यू अभय देत नाही म्हणूनच त्याचे भय वाटते ! काळ कधी कधी काळ नसतो तर भरलेले पीक कापून नेणारा नांगराचा फाळ असतो !

म्हणूनच पिकली पाने गोळा करता करता आप्तेष्टांचा डोळा चुकवून ही कोवळी कळी उचलली गेली......

पण जीवित नश्वर असले तरी संगीत अमर आहे, अशी भास्करबुवांची श्रद्धा होती. म्हणूनच मुलीच्या मृत्यूनंतरही ते दुबळे झाले नाहीत, मनावर जय मिळवू शकले.

माईच्या मृत्यूनंतर दहा दिवसांतली गोष्ट—

पोर ऐन तारुण्यात दुखण्याचा बळी झाली असल्याने घरादाराला स्मशान-कळा आलेली होती. लोक येत-जात होते. उठत होते. बसत होते. पण कुणीच कुणाशी बोलत नव्हते. प्रत्येकाच्या हालचालीत एक विचित्र उदासीनता शिक्का मारून बसली होती ! प्रत्येकाच्या डोळ्यांत एक जीवघेणी खिन्नता हातपाय पसरून बसली होती !

जणू या भयाण शान्तीला आदी नव्हता आणि अन्तही नव्हता. या दुःखाचा मूक बकासूर भूक अनावर होऊन घरादाराला वेढून बसला होता. कवटाळून बसला होता.

माईच्या अकालमृत्यूचे हे भयंकर भूत जसे घरादाराचे मानगूट धरून बसले होते. ते हे झाड सोडायलाच तयार नव्हते! माणसांनाच नव्हे तर—भितींना—हवेला आणि तंबोऱ्याच्या तारांनाही जसे सूतक आले होते !!!

ताईंच्या डोळ्यांच्या न खळणाऱ्या पाण्यात घराचे स्वास्थ्य जसे वाहून गेले होते. हा पूर कोण रोखणार होते ? कसे रोखणार होते? हे सावट कोण दूर करणार होते ?

सारी प्रश्नचिन्हेच होती! एक मृत्यूचे प्रश्नचिन्ह सोडवता आले नाही की साध्या रोजच्या गोष्टीही गुंतागुंतीच्या होऊन बसतात ! ! प्रश्नचिन्ह होऊन बसतात.

बखल्यांच्या घरात नेमके तसेच झाले होते......

अखेर दुसऱ्या दिवशी या असह्य शांतीचा भास्करबुवांनीच भंग केला. ते जमलेल्या सगळ्या सोयऱ्यांना म्हणाले–

"तुम्ही सारे असे घुम्यासारखे का ? मला गायला का सांगत नाही ?"

तरी कुणी बोलेना, दुःखाच्या भाराने शब्द मोडलेले...वाकलेले ..मग बोलणार कोण ? उत्तरणार कोण?

अखेर बुवाच उठले. त्यांनी तंबोरा काढला. सूर लावला. आणि गायला सुरवात केली.

माईच्या दुखण्यावर धन्वंतरींनाही औषधी गवसली नसली तरी तिच्या मृत्यूच्या दुःखावर भास्करबुवांना मात्र संगीताची दिव्यौषधी गवसली !

कारण त्यांच्या लेखी गायन म्हणजे जीवन. गायन संपणे म्हणजे जीवन संपणे. गायनाचा संबंध विनाशी देहाशी नव्हे, अविनाशी आत्म्याशी.

हे तत्त्वज्ञान हाडीमासी खिळलेले–रक्तात भिनलेले भास्करबुवा दर्दभरी आवाजात सामंत सारंगातली मध्य लयीतली आध्यात्मिक चीज गाऊ लागले.

'साची कहत वाके कौऊन जाने ।
झूठे जगपथ याद सबनकी – ।।धृ।।
अवल खुशामत काजा रोजी
निरंकारको कौऊन जाने–
परकत पथरा बताये नगनकी– ।। १ ।।

तंबोरा ठेवताना भास्करबुवा म्हणाले–

"माहीत आहे ? हा भास्करबुवा पंजाबातल्या 'दुर्ग्याणा' येथे गायलेला आहे. दुर्ग्याणा हे दुर्गेचे स्थान नसून तिच्या पतीचे– शंकराचे स्थान आहे. कारण ते अमृतसरचे स्मशान आहे.

तिथे कुणाला पोचवायला गेलो आणि श्रद्धांजलीदाखल गायलो असे नव्हे.

एकदा काही गैरसमज होऊन काही मत्सरी लोकांनी माझी चाललेली मैफल दंडेली करून बंद पाडली, पण मूर्ख हुल्लडबाजांसाठी सूर थांबण्याचा बाण माझ्या चाहत्यांच्या जिव्हारी लागला. त्यांनी माझे तंबोरे उचलले. मला उचलले आणि जिथे संगीताला विरोध होणार नाही अशा नटराजाच्या मुक्तद्वारी स्मशानात

' दर्ग्याणा ' येथे मला नेले. आणि हजारोंच्या उपस्थितीत मी गायलो. रंगून गायलो. खोटं नाही. आता त्या दरडीचा सभामंडप झाला आहे. रंगमंडप सजला आहे. रागसभा झाली आहे. गानसरस्वती प्रकटली म्हणून माता लक्ष्मी तिथे आली आहे.

अरे, स्मशानातही गाणे फुलते, मग स्मशानशांततेत का नाही फुलणार ? बोला ना, का नाही फुलणार ?"

आणि बुवांनी भजन सुरू केले—

" मन लागो मेरो यार फकीरीमे
जो सुख पावो रामभजनमे,
वो सुख नाही अमीरीमे ॥ धृ ॥
भला बुरा सबका सुनलीजे
कर गुजरान गरीबीमे ॥ १ ॥
आखिर राह तन खाक मिलेगा
कहा फिरत मगरुरीमे ॥ २ ॥
कहे कबीर सुनो भाई साधो ।
साहिल मिले सबुरीमे ॥

अशा तऱ्हेने भास्करबुवा यांनी आपले दुःख सप्तसुरात बुडवून टाकले.

माई मिरजेला वारली. त्यामुळे कृष्णा फुलंब्रीकरला तिच्या निधनाची वार्ता उशिरा कळली. पण माई आणि कृष्णा बरोबरीचे होते. त्यांचे बहीण-भावंडांचे नाते जडले होते. त्यामुळे माईच्या मृत्यूचा बाण हृदयात घुसल्यावर रक्तबंबाळ कृष्णा मिरजेच्या दिशेने तिरीमिरीतच धावत सुटला. मनाच्या आवेगापुढे आगगाडीचा वेगही त्याला ठाय लयीतला वाटला. मनाच्या वेगाबरोबर विश्वातले कुठलेतरी वाहन कधीतरी टिकाव धरू शकते काय ?

कृष्णा माईच्या तिसऱ्या दिवशी मिरजेला पोहोचला. भास्करबुवांच्या गळ्यात पडून म्हणाला—

" कुठाय माझी माई ? मला ठकवून कुठे गेली ? भावाला बहीण कशी विसरली ? अंतऱ्याला सोडून अस्ताई कुठे गेली ? आता माझे विसरलेले चिजेचे बोल कोण ठाकठीक करणार ? आता माझा भुकेला चेहरा पाहून कोण घासातला घास देणार ? लग्नात कानपिळ्याचा मान मला देण्याचा कोण हट्ट धरणार ?

कुणी जाऊ दिली तिला ? का जाऊ दिली तिला ? एवढ्या लवकर संपायला ती काय द्रुतगतीतली चीज होती ? ती तर हाडामांसाची मुलगी होती..."

तो आक्रोश पाहून पाहणाऱ्यांचे हृदयही हेलावले, डोळ्यांत पुन्हा महापूर दाटले. भास्करबुवांनीच मग कृष्णाला सावरले आणि ते म्हणाले—

" चल. तुला माईचे दर्शन घडवतो. वेळेवर आलास, तिकडेच निघालो होतो."

तिसरा दिवस म्हणून माईच्या अस्थी सावडायला बुवा स्मशानात निघाले होते. कृष्णाला घेऊन ते स्मशानात गेले आणि माईचा देह जिथे अग्नीच्या स्वाधीन केला होता त्या भस्मराशीकडे बोट करून म्हणाले–

" ती बघ आपली माई."

कृष्णा आवेगाने त्या चितेच्या राखेकडे धावला आणि भस्म म्हणून, अंगारा म्हणून ती पवित्र रक्षा त्याने कपाळाला लावली.

बरोबरीची मंडळी चिता सावडत होती. अस्थी गोळा करीत होती. आणि बुवा दगडावर बसून 'दर्ग्याणा'तल्या स्मशानाप्रमाणे मुलतानी गूणगुणत होते–

" गोकुल गावको छोरा रे "

त्या चिजेतून बखल्यांच्या घराचे गोकूळ सोडून गेलेली कान्हाई नव्हे, तर राधामाई बुवासाहेब शोधत आहेत असा त्या आर्त स्वरातून कृष्णाला भास झाला. तरी जामात हर्डीकरांना कशातही आपले दुःख बुडवता आले नाही. फुलाला दंव बिलगावे तसे त्यांच्या हृदयाला ते बिलगून राहिले !

सद्‌गुणी, सुशील, तरुण पत्नीबरोबर संसाराचा भोग घेण्याच्या पहिल्या वहिल्या वयातच त्या नवेलीचा कायमचा वियोग भाळी आल्यावर त्यांना हृदयोग आल्यास काय नवल ? लग्नाचा वर्षसण– बारावा महिना उलटायच्या आतच पत्नीचा बारावा करायची वेळ आल्यावर दुसरे काय होणार ?

श्वशुरांनी लग्नात दिलेले दागिने गुंडाळून त्यांनी भास्करबुवांसमोर आणून दिले. आणि ते उद्वेगाने म्हणाले –

" हे आपल्या लेकीचे साज संभाळा. तुमची लेक गेली. आता ते मी घेऊन काय करू ? हे डाग पाहिले की अंगावर कुणीतरी डाग दिल्यागत वाटतं. बस. मी संन्यास घेणार–काशीस जाणार."

भास्करबुवांनी हे जामाताचे स्मशान वैराग्य जाणले. स्वतःचे दारुण दुःख बाजूला ठेवून अनेक गोष्टी सांगून, त्या तरुण माणसाला पुन्हा समेवर आणले. इतकेच नव्हे तर चांगलीशी मुलगी पाहून पुन्हा संसारास लावले.

जामातांनी परत केलेले आपल्या लेकीचे साज ठेव समजून त्या नववधूस लेक मानून तिच्या अंगावर चढवले. आणि नंतर माईगत तिला सासर-माहेरही केले.

हा आपपरभाव विसरणे एखाद्यालाच जमते.

माईचा चिवट दुवा निखळला असूनही, सासरे-जावई आणखी जवळ आले. भास्करबुवांच्या घरी संगीतच माहेरपणाला आलेले नाही, तर सौजन्यही माहेर-पणाला आलेले आहे, हे हर्डीकरांना कळून चुकले. ताईंनीही पतीला या बाबतीत

उत्तम साथ दिली.

भास्करबुवांच्या घरातले माणूस काळाला हिरावून नेता आले, तरी त्या घरातली माणुसकी नेता आली नाही...

*

# तीस

एकोणीसशे बावीसच्या सुरवातीची कोल्हापूरची देवलक्लबमधली बुवांची मैफल बुजुर्गांची शाबासकी घेऊन गेली, तशीच डेक्कन जिमखान्यावरली मैफलही गाजली.

या महोत्सवाचे नेतृत्व एस. आर. भागवत, अनंतराव सरदेसाई, कंत्राटदार दत्तोपंत परांजपे वगैरे मंडळींकडे होते. सरदार आबासाहेब मुजुमदारही सल्लागार समितीवर होते.

अनेक नामवंत गायक-वादकांना निमंत्रणे गेली. बाळकृष्णबुवा इचलकरंजीकर, त्यांचे चिरंजीव आण्णबुवा, विलायत हुसेन, भास्करबुवा, सवाईगंधर्व, मास्तर कृष्णराव, अहम्मदजान तिरखवाँ इत्यादींनी हजेरी लावली.

भास्करबुवा बखल्यांचा सत्कार करण्याचे आणि त्यांना सर्वांत जास्त बिदागी म्हणून शंभर रुपये देण्याचे उत्सव-समितीने ठरविले. पण स्वतः बुवांनीच हा बेत हाणून पाडला. स्वतः पाऊणशे रुपये घ्यायचे ठरवले.

बुवांच्यातला विनय आणि वडील माणसांबद्दलचा आदर साकारून ते सकाळी गायला बसले. आणि रात्री इचलकरंजीकरांचे गायन त्यांनी करायला लावले.

भास्करबुवा सकाळी गायले. हा गानभास्कर सकाळी अधिकच तेजस्वी भासला. ओजस्वी गायला. या भास्कराच्या रथाला वरच्या भास्कराच्या रथाप्रमाणेच सप्त स्वरांचे अश्व होते. आणि ही रथारूढ मूर्ती अधिकच दैदिप्यमान दिसत होती. पाहणाऱ्यावर संमोहनास्त्र टाकत होती.

त्यातच पाठीमागे तंबोऱ्याला एकीकडे मास्तर कृष्णराव आणि दुसरीकडे केतकरांचे बापूराव. तबल्याच्या साथीला तिरखवाँ, पेटीला गोविंदराव टेंबे आणि मध्ये हा सूर्यनारायण. मग 'जीवनपुरी'चे जीवन तेजाने पुंजाळले तर नवल कसले !

एकावर एक सारेच राग चढत्या बढतीचे झाले. कानांच्या भुकेपुढे लोक पोटाची भूक विसरले. आत्म्याची परमात्म्याशी गाठ घालून देणारे ते गायन केवळ

अपूर्व झाले. त्या स्वरांच्या शिपणामुळे दिवाणखान्याच्या बाहेरील उद्यानातील कळ्यांची फुले झाली. संगीतातला मकरंद हृदयात साठवू लागली.

कंत्राटदार दत्तोपंत परांजपे मोठे विनोदी. एखादी गोष्ट अवर्णनीय झाली की, 'पी. डी. डी. सी; एच. वाय. सी. सी.' अशी काही इंग्रजी मुळाक्षरे वेगाने उच्चारीत. त्या दिवशीही ते अद्भुत गाणे ऐकून ती अद्भुत वर्णमाला ते पुन्हा पुन्हा उच्चारीत होते. गिरकी घेऊन नाचत होते.

पण बुवा मात्र स्वतःवर खूष असण्यापेक्षा त्याच रात्रीच्या बाळकृष्णबुवा इचलकरंजीकरांच्या गाण्यावर निहायत खूष होते. दुसऱ्या दिवशी शिकवणीच्यावेळी कृष्णा फुलंब्रीकरला म्हणत होते–

"कृष्णा, आता ऐंशीच्या वयात बाळकृष्णबुवा इतके कसून गायले. मग उमेदीच्या वयात कसे गात असतील ? कल्पनाच करवत नाही. आणि होऽऽ तुझ्याच शिणेचा असून रामभाऊ कुंदगोळकरानेही छान रंग जमवला. म्हणूनच व्यास-पीठावर जाऊन मी त्याला शाबासकी दिली आणि उज्ज्वल भवितव्याची ग्वाही दिली."

पण जिमखान्याच्या मैफलीचे सूर विरले नाहीत तोच बुवांचा नूर पालटला. त्यांना बारीक ताप येऊ लागला.

माणूस पंचविशीत जे धक्के सोसू शकतो ते पन्नाशीत सोसू शकत नाही. यौवनात– 'आलं अंगावर तर घेतलं शिंगावर.' अशी आक्रमक वृत्ती असते. प्रौढ-त्वात संकटाशी दोन हात करण्यापेक्षा संकटापासून दोन हात दूर राहण्याकडे वृत्ती असते.

तारुण्यात रक्त ताजे असते. सळसळते असते. त्यामुळे जखमा झाल्या तरी लवकर भरून येतात. उलट प्रौढत्वात रक्त स्थिरावलेले असते. त्यामुळे जखमा चिघळत जातात. वाहत जातात. क्वचित हाडचाव्रणही होतात. एखाद्या व्यक्तीच्या क्षणिक दुबळेपणातून मग कायमचे दुखणे जडते. हळूहळू ऱ्हास होत जाऊन ग्रास करू पाहते.

गुरुपुत्र महम्मद अब्दुल्ला यांचे पाठबळ गेले– ताऱ्हुताईचे आईचे छत्र कोसळले आणि जिच्या जन्मापासून भरभराट होत गेली ती लाडकी लेक माई वृक्षापासून फांदी तुटावी तशी भास्करबुवांपासून तुटून गेली !

आवडत्या माणसाची राख झाली म्हणून तीच राख डोक्यात थोडीच घालून घेता येते ? जिवाभावाचे सोयरे सरणावर चढले, म्हणून उघड्या डोळ्यांनी मरणाला थोडेच सामोरे जाता येते ?

भास्करबुवा दुर्दैवी घटनांचा अवरोह सुरू झाल्यापासून देहाने आणि मनानेही खचू लागले. पण भास्करबुवा काळीजातलं गाणं सर्वांसमोर मांडत असले तरी,

कलीजातले दुःख सर्वांसमोर मांडणाऱ्यांपैकी नव्हते.

अलीकडे दुखण्याने देहाला आणि मनाला दुर्बलता आल्यामुळेही असेल ते जिवातली सल कुणाकुणाजवळ बोलून दाखवू लागले.

पाध्येबुवांना बुवांचा असाच स्नेह लाभला होता. ते आपल्या या परमदैवता-बद्दल म्हणत–

"बुवांची ओळख करून घ्यायला कुणाचे वशीले नकोत. पण बुवांची थोरवी ओळखायला मात्र सात जन्मांची पुण्याई हवी. आम्ही नुसते हमाल, बारान् बारा वर्षे गाणं शिकलो पण आमच्या डोक्यात प्रकाश पडला नाही ! भास्करबुवांच्या प्रत्येक स्वरात भास्कराचं तेज प्रकट होतं. आम्ही पामरांनी नुसता चमत्कार पहायचा नि दिपून जायचं !"

ऐकणारा म्हणे–

"पाध्येबुवा, हा तुमचा विनय आहे भास्करबुवा एकेका रागाबद्दल तुमच्याशी चार चार तास चिकित्सा करून तुम्हाला केवढा मान देतात."

पाध्येबुवा पुन्हा म्हणत–

"ते या गुरुमाऊलीचं सौजन्य आहे. त्यांना एकेक श्रुतीचं स्थान नक्की करे-पर्यंत झोप येत नाही. आम्ही केवळ शुष्क चर्चा करू शकतो. पण बुवांना या शास्त्र-वचनांची जागृत प्रचीती लाभली आहे. आम्ही त्यांचं स्वरवैभव ऐकलं नव्हतं तोपर्यंत आम्ही किती अजाण आहोत याची जाणीव होत नव्हती."

असे हे पाध्येबुवा एक दिवस खूपच बेचैन झाले. कारण भास्करबुवांनी स्वतःची बेचैनी त्यांच्याजवळ बोलून दाखवली. एकाचा थंड हात लागून दुसऱ्याच्या अंगावर काटा यावा तसे झाले. जितक्या करुण तितक्याच दारुण शब्दांत असा आर्त जोगीया बुवांच्या कंठातून यापूर्वी कधीच बाहेर आला नव्हता. बुवा म्हणाले होते–

"पाध्येबुवा– माणसाच्या आयुष्याचा कसलाच नेम नाही ! आज मी आहे, उद्या नसेनही ! मला अजून खूप जगायचं आहे. खूप गाणं शिकायचं आहे."

पण कधी कधी वाटतं की आपला चार घटकांचाही भरवसा नाही. परवा अंगात ताप होता. तसाच मी समाजातून घरी जात होतो. जाता जाता वाटलं की, आपली वाटचाल इथंच संपली !

ही कदाचित लौकरच घडणाऱ्या गोष्टींची चाहूलही असेल !"

आणि खरोखरच भास्करबुवांना रक्तक्षयाची भावना झाली. त्यांची प्रकृती खालावत चालली. डॉक्टरांच्या सल्ल्यावरून ते यवतला कोरड्या हवेवर गेले. पण तिथल्या एकांतवासाने बेचैन होऊन परत आले. कोरड्या हवेपेक्षा माणसांच्या ओलाव्याचीच त्यांना जरूर होती.

त्यावेळी डेक्कन जिमखान्यावर विरळ वस्ती होती. दाट झाडी होती. हवा निकोप होती. परिसर निसर्गसुंदर होता. बुवा राहत तो साठेवाडा मंडईच्या जवळ असल्यामुळे धूळ आणि गलका यांनी हवा कोंदटलेली होती. म्हणून मग त्यांचे भक्त आणि मित्र कंत्राटदार दत्तोपंत परांजपे यांनी स्वतःच्या नव्याने बांधलेल्या जिमखान्यावरच्या अंबराईतल्या बंगल्यात बुवांना रहायला आणले.

पण हवा पालटली तरी दुखणे पालटले नाही...तेथे तात्पुरते बिऱ्हाड नेले पण आजाराने बिऱ्हाड हलवले नाही. त्याचे ठाणे पक्के झाले. हातपाय रोवून बसले. एवढ्या ठणठणीत माणसाचे पाहता पाहता भुस्कट होऊ लागले...

हे कळल्यावर अनेक शिष्यांची ये-जा सुरू झाली. शुश्रूषा सुरू झाली. त्यातच धारवाडचे पित्रे वकील त्यांना भेटावयास पुण्यास आले.

भास्करबुवांच्या प्रकृतीत एवढा जमीन-अस्मानाचा फरक झाला होता की, बड्या ख्यालाचा छोटा ख्याल होऊन गेला होता. साध्या उठण्याबसण्यानेही बुवांना दम लागला. तशी पित्र्यांचे डोळे भरून आले. डोळ्यांत केर गेल्याचे मीष करून त्यांनी ते लपवले.

मग उभयतांच्या खूप गप्पागोष्टी झाल्या. गाणे किंवा गाण्याबद्दल बोलणे हा बुवांचा जिवाभावाचा छंद होता. पित्रे त्यांना आवरत होते तरी बुवा त्यांना म्हणत होते–

"बोलू दे. मनसोक्त बोलू दे– जिवाच्या दोस्ताबरोबर पुन्हा बोलायला मिळेल न मिळेल– देव जाणे !"

आणि मग एकदम गहिवरून म्हणाले–

"मला पुष्कळवेळा माझी स्नेहीमंडळी म्हणत–

"बुवा, तुम्ही चार साडेचार पट्टी लावून तासचे तास जोरजोराने गाणे म्हणता, त्यामुळे तुम्हाला पुढे त्रास होईल. तरी खालची पट्टी धरत जा."

मला त्यावेळी त्यांचं बोलणं पटत नसे. मी म्हणत असे–

"हजारोंच्या कानामनापर्यंत उच्च संगीत पोहोचवायला हवं असेल तर उंच पट्टीच हवी. मैफलीत– चढाओढीत जर उंच पट्टीत गायचं नाही तर केव्हा ? ते काही नाही. लहानपणापासूनची बसलेली पट्टी कशी बदलता येणार ?"

आणि एकदम समेवर येऊन म्हणाले–

"आमच्या घरची मंडळीही माझ्याविषयी दुःखी कष्टी होऊन काळजी करतात. त्यांना काय म्हणावं ? मी आत्ताच कुठेसा थोडासा गाऊ लागलो आहे.

माझी तर खात्री आहे की, मी या दुखण्यातून लवकरच बरा होईन. आणखी दहा-बारा वर्षे तरी जगेन. गुरूच्या कृपेने असा गाईन, की सर्वांना अनेक वर्षे आठवण राहील. गाण्याची हौस पुरी होईल."

आणि ते हलकेच बिछान्यावर लवंडले. पित्रे जड पावलाने निघून गेले.

नंतर लवकरच पाडवा आला. बुवा तापलेले असताना गोडधोड करायला ताईचा हात कसा धजावणार ? त्यांनी तूप-साखर वाढायचे ठरवून दिवस साजरा करायचे ठरवले. तशी बुवा तशाही अवस्थेत ओरडले–

" अग, सण माझ्याकरता थोडाच करायचाय ? या पोरींसाठी करायचाय. ते काही नाही. दूध आणवा. बासुंदी करा."

" काही नको. स्वारी उष्टावणार नसेल तर आम्हाला तरी बासुंदी कशी गोड लागणार ? येसू-शांताला मी समजावून सांगेन."

" पण आमची पमा ? त्या पिलाला तर अजून पंख फुटायचेत. तिच्यासाठी बासुंदी झालीच पाहिजे."

भास्करबुवांचा हट्टी स्वभाव ताई ओळखून होत्या. त्यांनी शंकरबुवा अष्टी-करांना गावात धाडून दूध आणवले. आणि मग बासुंदीचा कार्यक्रम पार पडला.

भास्करबुवा खूष झाले. तेव्हा त्यांची ती खुषी तशीच रहावी म्हणून ताईंनी त्यांना आणखी एक खूषखबर दिली–

" कळलं का ? निकाल लागून शांता पहिलीत पहिली आली."

बुवांनी झटकन् सोन्याच्या घड्याळाचा छडा काढला आणि साखळीसारखा शांताच्या गळ्यात अडकवून ते कौतुकले–

" हे आमच्या पंडिता शांताला बक्षीस बरं का. ही पोरगी खूप हुशार निघणार. मुलग्यासारखं नाव काढणार. हुशार जावई पटकावणार."

मग मायेने बुवांनी दोन्ही मुलींना जवळ बसवून आणि पमाला मांडीवर घेऊन गाणे शिकवले. तेव्हा ताईंना वाटले–

" गळ्यातल्या सोन्यापेक्षा या सोनचीजेने शांताला आज खरे बक्षीस मिळाले."

वडील बहिणींबरोबर पमाही " आऽऽ ' करून गाऊ लागली तशी तिलाही गालगुच्च्याचे बक्षीस मिळाले.

पण हा बक्षीससमारंभ काळाला बघवला नाही. दृष्टावला...बालगंधर्व भेटून गेले, मास्तर कृष्णराव येऊन गेले. सेवाही करून गेले. बुवांनी त्यांना चीज दिली नाही, पण उपदेश दिला–

" एकजुटीने रहा. यशस्वी व्हा."

आणि मग शेवटच्या चार दिवसांत बुवा एकदम निर्वाणीचे...निरवानिरवीचे बोलू लागले. गोपाळगायन समाजाचे प्राचार्य श्री. गोविंदराव देसाई भेटायला आले, तशी बुवा त्यांना म्हणाले–

" असंख्य लोक ज्या मार्गाने जातात त्याच मार्गाने मी जाणार हे मला

समजले आहे. पण संगीत विद्येची व्हावी तशी सेवा माझ्या हातून झाली नाही. एवढाच हेतू राहिला आहे.

परमेश्वर कृपेने तो हेतू पूर्ण झाला असता तर संतोषाने गेलो असतो. पण... पण...तसं झालं नाही."

गोविंदराव गदगदून बुवांचा हात हाती घेऊन म्हणाले—

"आपले गाणे ऐकून घमेंड— दुष्टपणा, हेवा, ईर्षा, निंदा इत्यादी क्षुद्र दोष नाहीसे होतात, तरी संगीताची मनाजोगी सेवा झाली नाही म्हणता ? अहाहा ! केवढी ही आपली योग्यता— नम्रता. बुवा, मागे थिएटरमधला आपला कार्यक्रम ऐकून— चिजेचे स्वच्छ शब्द— स्वरांच्या जागा— विस्तारपद्धती— लय— सूर इत्यादी गोष्टी ऐकून शास्त्रीय संगीताबद्दल असलेला काही श्रोत्यांचा गैरसमज साफ दूर झाला.

प्रत्येक गायक जर या गोष्टी ध्यानात ठेवून गाईल तर संगीत कलेचा दर्जा वाढत जाईल."

बुवा विनयाने म्हणाले—

"आपण जी स्तुती करता ती गुरुजींकडून मला जी विद्या मिळाली त्या विद्येची स्तुती आहे. कार्यक्रमात जे जमतं ते गुरुजींचं, जे चुकतं ते माझं.

अजून साथ-संगत जमवून खूप जमून गावंसं वाटतंय. पण तब्बेत साथ देत नाही."

"देईल देईल. दुखणं हत्तीच्या पायांनी येतं नि मुंगीच्या पायांनी जातं."

दुसऱ्या दिवशी भास्करबुवा सकाळपासून स्वस्थ निजलेले पाहून ताईंनाच अस्वस्थ वाटू लागले. त्यांना बुवांना असे निपचित पडलेले पहायची सवय नव्हती. एखादा हसरा टवटवीत गुलाब अकाली पावसाने कोमेजून जावा, तसा बुवांचा सदा टवटवीत चेहरा दुखण्याने म्लान झाला होता.

स्वतःच्या पदराने त्यांच्या कपाळावरील घाम पुसून— त्यांना वाळयाच्या पंख्याने अलगद वारा घालीत ताईंनी विचारले—

"डॉक्टरांनी काही दिवस गाणे बंद ठेवायला सांगितले असले तरी बोलणे बंद ठेवायला नव्हे काही."

भास्करबुवा क्षीणपणे हसून उसने अवसान आणून लाडक्या पत्नीला बरे वाटावे म्हणून म्हणाले—

"मनातल्या मनात मागची आठवण काढीत होतो."

"आम्हाला नाही सांगणार ?"

"सांगणार तर. तुम्ही तर आमचा हक्काचा श्रोता, आमच्या अमृतसरच्या गाण्यात मागच्या दसऱ्याला मजाच झाली, मिया मेहेरबान—"

" ते तर आपले परम भक्त, "

" त्यांच्या घरी आमची मैफल झाली, जमली. "

" जमणारच, स्वारीच्या कंठात सरस्वतीनं हुकमाची पानंच घातलीत ना?"

बुवा हसले. म्हणाले–

" अग तरीही एका मत्सरी माणसाने म्हटले–

" पतीयाळाचे फत्तेह अल्लीखाँपुढे भास्करराव म्हणजे सूर्यापुढे काजवा."

तशी मियामेहेरबानांनी ताडकन सुनावले–

" जर माझे उस्ताद फत्तेहअलीखाँ आज जिवन्त असते तर त्यांनीही भास्कर-बुवांचे गाणे ऐकून मनःपूर्वक त्यांचीच प्रशंसा केली असती. "

एवढ्या बोलण्यानेही बुवांना धाप लागली, तशी त्यांना औषधाचा डोस देत ताई म्हणाल्या–

" आता येत्या डिसेंबरमध्ये स्वारीचं कौतुक बघायला मी स्वतः जालंदर अमृतसरला येणार."

" कशाला ? आमच्यावर पहारा करायला ?"

" अहं, उगीच शिरा ताणताणून गाऊ नका– सांगायला. "

" अगं, बैठक काबूत ठेवण्यासाठी चढी पट्टी ठेवावी लागते. चढाओढीच्या गाण्यात उत्तरांग राग गावे लागतात. "

" कलेला वय नसलं तरी कलावंताला वय असतं. मी म्हणते आता पट्टी बदलावी, खाली आणावी."

" जशी देवींची आज्ञा."

" काहीतरीच काय ? मी आज्ञा करीत नव्हते. विनंती करीत होते. म्हटलं, बायका नवऱ्यावर पोलिस पहारा करीत नसतात. पापण्यांचा पहारा करतात."

" ठीक आहे. हा पहारा कुशलतेने केल्याबद्दल या खेपेला आम्ही तुम्हाला अमृतसरचं सुवर्णमंदिर दाखवणार. "

" नक्की ना ?"

" नक्की म्हणजे ? यंदा डिसेंबरमध्ये येताना नेण्या-आणण्याचा त्रास नको म्हणून आमचा तंबोराही आम्ही तिकडेच ठेवून आलो आहोत. तो आमची वाट पाहत असणार, हजारो रसिक वाट पाहत असणार. दिलीपचंद– बाली हे शिष्यही वाटेकडे डोळे लावून असणार. "

" खरं सांगू ? अमृतसरचं सुवर्णमंदिर पाहण्याआधी स्वारीचं सुवर्णपदक बघायचंय. "

बुवा भरघोस हसून म्हणाले–

" निक्का सोनाराला सांगतो, यंदा आम्हाला सुवर्णपदक घडवण्याऐवजी

सोन्याचा चपलाहार बनवा."

"तो कशासाठी बाई ? पराक्रम कुणाचा नि बक्षीस कुणाला ?"

"आमचं तब्बेतीचं गाणं व्हावं म्हणून तुम्हीच तर आमची तब्बेत संभाळता, तेव्हा चपलाहार तुम्हालाच. आणि होऽऽ आम्ही तो आमच्या हातानी एका माणसाच्या गळ्यात घालणार."

"इश्श !" म्हणून ताईंनी मान वेळावली. तोच कृष्णा फुलंब्रीकर आला. बुवांचे पाय चेपू लागला. तशी ताई उठून घरकामाला लागल्या. पाय चेपता चेपता कृष्णा म्हणाला–

"उद्या नाटक आहे, जाऊ का नको ?"

"जरूर जा."

"पण सेवेत अंतर पडणार."

"अरे, संगीताची सेवा करणं म्हणजे संगीतगुरूची सेवा करणंच आहे."

कृष्णा विनोदी लकबीत म्हणाला–

"म्हणजे आपल्या या पदांची सेवा करण्याऐवजी आपण चाल दिलेल्या पदांची सेवा करणंच."

बुवा हसून म्हणाले–

"अगदी बरोबर. माझा चरण चुरण्याऐवजी चिजेचा चरण चुरायचा."

जाताना तो म्हणाला–

"परवा येतोच सेवा करायला."

"ये. मी तुझ्यासाठी सोन्याचं शेत लावून दिलंय. तुला काही कमी पडायचं नाही."

"मी आमरण गात रहावे हाच आशीर्वाद असावा."

बुवांनी शिष्याच्या मस्तकावर हात ठेवला. त्या स्पर्शाची उब बरोबर घेऊनच कृष्णा फुलंब्रीकर गेला.

त्यानंतरही कुणीकुणी आले. धीर देऊन गेले. पण अधीर झालेल्या काळाला कोणी थोपवू शकले नाही !

दुसऱ्याच दिवशी–आठ एप्रिल एकोणीसशे बावीस रोजी दुपारी चार वाजता काळाने हा दरोडा घातला !!

आभाळातला भास्करही त्या दिवशी काळोख्या ढगात तोंड लपवून बसला. त्याचा मुखडा पहायचा ऐनाच फुटल ना...

संध्याकाळी आलेली वळवाची सर म्हणजे एका महान कलाकारासाठी आभाळाने टाकलेले अश्रूच !!!

ताईंनी जमिनीवर लोळण घेतली तेव्हा त्यांच्या कुंकवाला केव्हातरी फराटा गेला. लोळता लोळता जिवाच्या आकांताने ताई ओरडल्या–

" कशाला माझं सासरचं नाव सावित्री ठेवलं ? ते आज खोटं ठरलं... दिवसा ढवळ्या माझ्या सत्यवानांना यम घेऊन गेला...तडा गेलेली निर्जीव वेणू मागे राहिली...कशाला ? बेसूर जिणं जगायला !...भेसूर आयुष्याला तोंड द्यायला ? त्यापेक्षा मलाही त्यांच्याबरोबर न्या..."

त्यांना कसेबसे आवरीत साठेवहिनी म्हणाल्या,

" पदरी तीन पोरी आहेत ना ?–त्यांची दोन्ही छत्रं हरपल्यावर त्यांनी कुणाच्या तोंडाकडे पहायचं बरं ?"

" पत्नीची भूमिका संपली तरी आईची भूमिका संपली नाही अजून." परांजपे काकूंनी समजूत घालायचा प्रयत्न केला, पण तो वाया गेला.

माणसाच्या हृदयालाच नव्हे तर तंबोऱ्यालाही तडा जावा असा आक्रोश त्या करीतच राहिल्या.

बुवांवर पाठच्या भावंडागत प्रेम– मायापाखर करणाऱ्या शंकरबुवांना तर भास्करबुवांनी अखेरचा श्वास घेतलेला पाहून ब्रह्मांड आठवले ! निवृत्तिनाथांना ज्ञानेश्वरांची समाधीस्थानी शिरण्याची वेळ झाली तेव्हा–

जेष्ठा आधि कैचे कनिष्ठाचे जाणे
वळचणीचे पाणी आढ्या गेले...
बांधल्या मोळीचा सुटलासे आळा
तृण रानो धावतसे...

अशी केविलवाणी अवस्था झाली ! तशीच शंकरबुवांची झाली. त्यांनी परांजप्यांच्या घरात जाऊन ढसढसून रडून घेतले. तोच दारावर इवली थाप मारून चिमणे स्वर आले–

" आजोबा, आई–आक्का–शान्ताताई– सारी रडताहेत. तुम्ही त्यांना गप्प बसवा ना– नाहीतर आण्णा जागे होतील ना– त्यांना किती छान झोप लागलीय ना..."

शंकरबुवांनी आपले अश्रू पापण्यांच्या अडसराआड लोटले. दार उघडले. पमाला कडेवर घेतले. आणि तिन्ही मुलींना जवळ घेत ते म्हणाले,

" बघतो हां तुम्हा सर्वांकडे. तो आमच्या खांद्यावर ओझे टाकून गेला आहे. ते आता थडीपार नेलेच पाहिजे. तुमच्या पोरींच्या नौका वादळात भिरकावून कशा चालतील ? मलाच त्यांच्याकडे पाहिले पाहिजे...मलाच !..."

नियतीच्या मनात आले–

' आता कोकिळेने पंचम कुठे शिकायचा ? मयुरांनी लय कशी सुधारायची ? गळी उदंड गाणे असलेला हा माणूस भाळी उदंड जिणे घेऊन का जन्माला आला नाही ?"

भास्करबुवा अल्पायुषी झाल्यामुळे शास्त्रोक्त संगीत अल्पायुषी झाले त्याचे काय ? पण निष्ठुर काळा, लक्षात ठेव– भास्करबुवा बखले नामक महान गायक तुला संपवता आला तरी त्याने ठसा उमटवलेले नाट्यसंगीत तुला छिनावून घेता येणार नाही !

*

# एकतीस

भास्करबुवांच्या मृत्यूची ती भयंकर बातमी वाऱ्यावर वाहत उत्तरेलाच नव्हे, तर थेट हिमालयावर पोहोचली. आणि मग गौरीशंकरावर नृत्य करणाऱ्या नटराजाची समही चुकली.

भास्करबुवांच्या स्वागतासाठी स्वर्गाची दारे अकाली उघडलेली पाहून साक्षात सरस्वतीही सैरभैर झाली.

त्रैलोक्यात हिंडणाऱ्या नारदमुनींना त्रिखंड हिंडून गवसलेला हा पुरुषोत्तम हरपलेला ऐकून त्यांची मुद्रा उतरली आणि वीणाही...

एक तंबोरा अवेळी मूक झालेला ऐकून तुंबरांच्या काळजातही कळ उठली. मग भास्करबुवांच्या वीणेची कायमची नीज पाहून जिवाभावाच्या रसिकांच्या मनी गजबज उठली असल्यास काय नवल !

शंकरभैय्या बेलबागेत बुवांच्याबरोबर असत. बुवांना पोहोचवून आल्यावर ते स्फुंदत म्हणाले,

" अहो, दर्ग्याणा स्मशानात गाणाऱ्या बुवांचे गाणे स्मशानवासी शिवाला आवडले म्हणूनच त्याने बुवांना कायमचे आपल्या जवळ कैलासावर नेले.

अहो, असा दिलाचा सच्चा आणि तालाचा सच्चा माणूस आता होणे नाही. मी कसलेला तबलजी, पण अस्ताईतच ताल, लय अशी बांधून ठेवीत की साथ करणे मुश्कील होई. तरी आम्हाला संभाळून घेत होते. त्यातल्या त्यात कठीण ताल, आज चौताल– सवारी– झुंबरा वगैरे बोल परणासकट वाजवले की त्यांना स्फुरण येई.

आता आम्ही कुणाबरोबर वाजवावं आणि आमच्या विद्येचं सार्थक करावं ?

आम्हाला साथीदार म्हणून त्यांनी कधीच कमी लेखलं नाही. बरोबर नेणार, पंक्तीला मांडीला मांडी लावून जेवूखाऊ घालणार. आज पंगत मोडली !

इतका लयबाज आणि ढंगदार गवई आता होणे नाही. गाणे मोठे, स्वभावही मोठा. प्रेमळ स्वभावाने ते दुनियेला आपलेसे करीत. माझ्यागत साथीदाराला एक प्रेमाचे— अधिकाराचे ठिकाण होते ते नाहीसे झाले. ''

मास्तर कृष्णासुद्धा अंत्ययात्रेला नव्हते. खरे म्हणजे बुवांची परवानगी घेऊनच नाटकाला गेले होते. तरीही अंत्यदर्शनाला आंचवल्याचा बाण जिव्हारी लागला होता.

दुसऱ्या दिवशी ते आले. सुन्न होऊन कुणालासे घेऊन स्मशानात गेले. बुवांच्या विझलेल्या चितेचे दर्शन घेऊन— त्या महान विभूतीची विभूती कपाळाला लावून, जिभेवर ठेवून ते ओक्साबोक्शी रडत म्हणाले,

'' काकासाहेब खाडीलकर म्हणाले त्याप्रमाणे आपण संगीताचे भीष्माचार्यच होतात. हा आपला लाडका शिष्य आपण दिलेली विद्या आमरण संभाळील. ''

दहाव्या दिवशी ॐकारेश्वरावर आप्तस्वकीय, सगेसोयरे, भक्तगण, शिष्य-संप्रदाय सारे जमले. जामात हर्डीकरांनी हरप्रयत्न करूनही कावळा पिंडाला शिवेना.

कुणी काही बोलले, कुणी काही संकल्प केले. सारे वाया गेले ! शेवटी उत्तरेला बुवांचे ' बडे भाई ' म्हणून ओळखले जाणारे शंकरबुवा अष्टीकर थरथरत्या पायांनी पुढे झाले आणि स्थिर आवाजात म्हणाले,

'' बुवा, काळजी करू नका. तुमच्या पत्नीकडे आणि मुलींकडे मी पाहीन. त्या तिघींची लग्ने झाल्याशिवाय मी देह ठेवणार नाही.

कोल्हापूरकरांच्या मनात आपणास वास्तू द्यावयाची होती, पण कलेचे बंदे असल्यामुळे आपण कोणाचेही मिंधे झाला नाहीत. तरी पण आपल्या मनातली वास्तू राहूनच गेली.

समाजाच्या रूपात आम्ही ती बांधू. आणि त्यातले पाच हजार तुमच्या या बडे भैय्याचे असतील.

मिटल्या ना सर्व काळज्या ? झाले ना समाधान ?

आणि हो. आपला पक्षसुद्धा मी करीन ! आपणास उपाशी ठवणार नाही. ''

आणि दुसऱ्याच क्षणी पिंडाला काकस्पर्श झाला.

गायन महर्षी अलादियाँखाँ हे भास्करबुवांहून वयोवृद्ध. पण आपला लाडका लाल गेला हे कळल्यावर अल्लादियाँखाँनी हुंदका देऊन भिजल्या आवाजात विचारले,

'' आता या उतारवयात गाणं कुणाला ऐकवायचं ? भास्कर नाही. मेरा जी नही लगता.

ग्वाल्हेरला तरुणवयात बाळकृष्णबुवांसारखे बुजुर्ग गाऊन गेल्यावर गायला

तरी मैफल मारून गेला. पण अंगी विनय किती ! त्याचं गाणं संपल्यावर बाळकृष्ण-बुवांनी त्यांना मिठीच मारली. तर मागाहून विनयाने म्हणाला–

"ही मिठी मला नव्हती. संगीत विद्येला होती."

अरेरे ! असा हा विनय कुठे शोधू ?

पं. विष्णू दिगंबरांनी एका मैफलीत 'संगीत भास्कर' म्हणून गौरवलेला माझा हा भास्कर पुन्हा न उगवण्यासाठीच मावळून गेला काय ? हाय हाय !"

म्हैसूर मिलचे मॅनेजर– बुवांचे गायक शिष्य कळवळले, "अरे, या अजात-शत्रू माणसाशी शत्रुत्व करून यमाने काय साधले ? ते तर नेहमी म्हणत–

'मला काय येतंय ? या अफाट गानसमुद्रातून एक-दोन थेंब काय ते मला मिळाले आहेत."

रामुभैय्या दात्यांचे इंदोरहून पत्र आले–

"भास्करबुवा बखले हे काहीतरी अद्‌भुत होते ! ज्यांचे नाव घेताच अल्लादिया फैयाजखाँ यांचे डोळे पाणावतात, त्यांचे नाव घेताना माझ्या डोळ्यांत आषाढझड आली तर काय नवल ?"

अनंतशंकर करंदीकरांची श्रद्धांजली आली–

"मी आजपर्यंत अनेक बडे बडे गायक पाहिले. पण विद्यादान करण्याच्या बाबतीत बुवांच्याइतके भरमाप कुणीच करत नसे. संगीतकलेचे दान ते दोन्ही हातांनी भरभरून करीत. आपल्या जवळच्या कलेचे त्यांनी अन्नछत्रच उघडले होते.

भर रस्त्यातून जाता-येताही हे अखंडदान चालूच राही. बुवा उदार होते. पण काळाला असे उदार होता आले नाही.

एकदा अहमदाबादला सकाळी आठाला लागलेली गाण्याची तंद्री रात्री आठाला संपली. श्रोत्यांनाही स्नान-भोजन कशाचेही भान नव्हते. भिंतीतून– गवसणीतून– साऱ्या वस्तूतून आणि वास्तूतूनही सूर भरून राहिला होता. गोड वेडाने संमोहित करणारा हा जादूगार आज हरपला !"

भास्करबुवा गात नव्हते म्हणूनच काळाला संमोहनास्त्र पडले नव्हते. त्याचे काम सुकर झाले होते ! !

भास्करबुवांच्या मृत्यूनंतर रामभाऊ कुंदगोळकर तथा सवाई गंधर्व भारत-गायन समाजात बुवांच्या प्रतिमेला वंदन करायला आले. त्यांनी सद्‌गदित होऊन बुवांच्या बैठकीच्या जागेला साष्टांग नमस्कार घातला आणि हॉलच्या दुसऱ्या टोकाला जाऊन बसले. म्हणाले,

"समोर रामाचं स्थान. मला हनुमानाची जागा मिळाली तरी केवढं भाग्य !"

उत्तरेचे भाईलाल रबाबी यांच्या हृदयात बुवांच्या मृत्यूच्या वार्तेचा खंजीरच खुपसला गेला. ते घायाळ झाले. त्यांचे आर्त आसू मालकंसातून ठिबकले–

"सुस्वर स्वर की तान मोहे भा गयी
कां से कहू मोहे बावरा बना गयी ।। धृ. ।।
भास्करराव छुपा, गायन का हिंदसे ललको
दुःख जैसे आयु विहा गयी ।। १ ।।"

दिलीपचंद्र बेदी तर बुवांचे गंडाबंध शिष्य. उत्तरेला सावलीगत बुवांच्या आगेमागे असायचे. पण मूर्तीच हरपल्यावर सावलीचे अस्तित्वच कसे राहणार ? त्यांचा शोक अवतरला ललीतरागाचे बोट धरून–

"कहा छिपे जा स्वरके भास्कर
कंठ माही जिन राख्यो शास्त्र ।। धृ. ।।
बहुल प्रकाश करे बेदी कहे
लग रही अखीयाँ तुमरी आंसपर ।। १ ।।"

आणि पाठोपाठ तोडीने टाहो फोडला–

"धाक परी तुमरी हिंदमे सिंधू पंजाब दक्षिण गुजरात
गुरुवर्य भास्करराव महाराज ।। धृ. ।।
कंठ मधूर सो गांधर्व गायन
सुनत मग्न बेदी
भये लोगवा सरस्वती आप सवारे करत ।। १ ।।"

शिष्यांची नावे गोवून 'शंकरा'ने आलापात विलाप केला–

'प्रकट भयो जब सरको भास्कर
अतिप्रकाश भयो नादमंडल मे ।।धृ।।
गोविंद, कृष्ण, गणपती, गांधर्व, दत्तात्रय
नरहरी, बेदी, सबशिष्यवर्ग सोहे
तारामंडलमे ।।१।।

पुढे संगीत-दिग्दर्शक झालेल्या बुवांचे गाणे दीड तप ऐकलेल्या हरिश्चंद्र वालींचे पत्र आले–

"स. न. वि. वि.

लेख पाठवीत आहे. तीनदा लिहून फाडून टाकला. लेख लिहिणे कठीण झाले. कारण भावनांनी वाहून जाऊन रडू कोसळले !

माझा बुवासाहेबांशी प्रत्यक्ष संबंध एकोणीससे चौदा साली आला. त्यांना जालंदरच्या संगीत सभेतील सर्वश्रेष्ठ गायकाच्या सुवर्णपदकाचा मान वर्षानुवर्षे लाभला. आता बुवा गेले... ते पदकही गेले... हिरमुसले !

ते पदक अभिमानाने बुवांसाठी सारी कलाकुसर खर्च करून तयार करणारा निक्का सोनारही दुःखी-कष्टी झाला ! त्याच्या लेखी भास्करबुवा गेल्यावर सोने आणि माती सारखीच झाली !
त्याच्या घरी आणि दारी झडलेल्या त्यांच्या मैफली त्याला आठवल्या. त्यांच्यासाठी घडवलेल्या पदकांची रांगही आठवली आणि निक्का सोनारांचे संसारातले लक्षच उडाले. ते साधू बनून– संन्याशी होऊन पंजाबातल्याच कुठल्याशा एका मंदिरात निघून गेले...
खरंच, निक्का सोनार करू शकला ते आम्हालाही करता येते तर ?
मी बुवांचा पुरोहित नाही, शिष्य आहे. हीच माझी श्रद्धांजली !

आपला सदैव
हरिश्चंद्र वाली."

बुवांच्या मृत्यूनंतर तत्कालीन बडोदा संस्थानचे दरबारगायक फैयाजखाँ आग्रेवाले भारत गायन समाजात आले. बुवांच्या पत्नीला– ताईंना भेटले. तेव्हा त्यांना रडे अनावर झाले. नंतर समाजातील बुवांच्या तसबीरीला वंदन करून त्यांनी आंसूभरल्या लोचनांनी मानवंदना दिली–

"आमच्यातला सिंह गेला !"

शिष्य कऱ्हाडकरबुवा हरदासी शैलीत उद्गारले–

"कीर्तनात उभे राहणारे पोर पाहता पाहता थोर गायक झाले. त्यांचा तो मालकंस सुरू झाला की, एखाद्या देवालयाची प्रक्षालपूजा व्हावी तसे वाटू लागे. सभा रूसावी आणि बुवा येऊन गायला बसावे की, ती मिनिटात खुलावी. नानवडकरांची पहिलीच थाप– इशारा समजून बुवा पहिल्या आवर्तनातच जमायचे.

तृप्ती तर व्हावी आणि अतृप्ती तर शिल्लक राहावी– तेच श्रेष्ठ दर्जाचे संगीत. भास्करबुवांना मैफलीचा राजा म्हणणेच यथार्थ. आज ते सिंहासन खाली झाले..."

शिष्य कम सुहृद गोविंदराव टेंबे यांचे अश्रू शब्दरूप घेऊन लेखणीतून साकारले–

"गुरुवर्य भास्करबुवा गंधर्वलोकी गेले आणि त्यांची स्वरगंगाही त्यांच्याबरोबर स्वर्गवासी झाली. त्यांचे गायन म्हणजे एक काव्य होते... जिवंत काव्य होते... जिवंतपणाच्या पोटी प्रकाश आणि प्रकाशाच्या पोटी सौंदर्य !

गुरुवर्य भास्करराव हे केवळ एखाद्या घराण्याची अंध परंपरा राखणारे गवई नव्हते. ते डोळस व चौकस गवई होते. त्यांनी स्वतःचे एक नवीन सर्वांगसुंदर व तेजस्वी घराणे निर्माण केले.

राजकन्येच्या स्वयंवर मंडपात बसलेल्या विजयी वीराप्रमाणे मुद्रा खुललेली

असे. श्रोत्यांवर उल्हासाचा शिडकावा होत असे आणि रंगदेवतेचा प्रसाद मैफलीत उधळत असे. आता त्या प्रसादाला आम्ही आचवलो !

सबंध शतकात असा एखादाच पुरुष जन्माला येतो..."

कादंबरीकार ना. सी. फडकेंची भावांजली आली—

"भास्करबुवांनी कितीतरी मुष्किल राग मामुली सदरात आणून सोडले. ही त्यांची खास कामगिरी म्हणावी लागेल.

स्वयंवर नाटकाच्या संगीताने महाराष्ट्रीय श्रोत्यांची उंची प्रगल्भ करण्याची जी क्रांती मराठी रंगभूमीने केली तिचे श्रेय भास्करबुवांनाच द्यावे लागेल.

दुसऱ्या कलावंताचे गुण मानण्यात ते अत्यंत उदार. अब्दुल्लाला जालंदरच्या जलशात नेले त्यांनीच. तिकडच्या लोकांकडून वझेबुवांचा मानसन्मान केला त्यांनीच. दुसरा चढला तर आपण पडू असे भय त्यांना कधीच वाटले नाही. कारण स्वतःच्या कलागुणांवर जबर आत्मविश्वास होता."

पं. विनायकबुवा पटवर्धन म्हणाले—

"माझा संगीताचा अभ्यास चालू असतानाच भास्करबुवांची गाणी ऐकत होतो. मैफलीत उपयोग करून घेत होतो. ते आता संपले...

समक्ष जमले नाही तरी मी भास्करबुवांना मनाने गुरू मानले होते."

चित्रकार नी. म. केळकर शोकाकूल होऊन उद्‌गारले—

"भास्करबुवांनी स्वतःच्या गायनाने एक अतीसुंदर, भव्य, वेड लावणारा एक आदर्श लोकांपुढे ठेवला.

त्यांची गायकी एक अवघड रसायन असे. वृत्ती सौंदर्यपूजक होती. अंगी हवे ते पराक्रम करण्याची कष्टशीलता होती. त्यांच्या गायकीत अनेक घराण्यातील उत्तमोत्तम गुणांचे संमेलन झाले होते. त्यांच्या रचनेला दीर्घ खोल अभ्यासाची व चौकस अनुभवाची चौकट होती.

बुवा प्रत्येक स्वरोच्चारात आपले सर्व कौशल्य, जीवनशक्ती आणि प्रतिभा ओतीत. क्षणापूर्वी भेटलेल्या स्वरांना पाठीमागच्या स्वरांची आस भेटून एक अखंड स्रोत असे. रसिक श्रोता त्या भरगच्च स्वरधारात बांधला जाई.

या भव्य भूमिकेवर कोणीच शिष्य पोहोचला नाही ! स्वरानंदाने ओथंबलेले हे वैभव आता काळाच्या पडद्याआड गेले आहे. कायमचे !"

बुवांचा एक शिष्य नारायण रामचंद्र टापरे बुवांच्या तसबीरीपुढे लोळण घेत म्हणाला—

"हाय ! हाय ! आता ती करारी— ममताळू— स्वच्छ राहणीची व विचारसरणीची— दुसऱ्याबद्दलच्या कौतुकाची— निःस्पृह— विद्वान गुरुमूर्ती कुठे पाहू ?

बुवा गाताना नोटेशन करीत नसत. पण आम्हाला शिकवताना करीत असत.

बुवा गेले तरी आशीर्वाद मागे राहिले.

आमच्यापैकी त्यांचा असा एकही शिष्य सापडणार नाही, की बुवांचे शिक्षण मिळाल्यानंतर ज्याला स्वतःच्या पायावर उभे राहून प्रपंच भागवता आला नाही. त्यांचे शिक्षणच इतके उच्च दर्जाचे असे की आमच्यागत मठ्ठातला मठ्ठ विद्यार्थी असला तरी त्याला स्वतःचे पोट भरण्यापुरते गाता यायचे.

आम्हाला मार्गाला लावून आमचा हा ध्रुवतारा कुठे लोपला ?"

र. रा. चाफळकर म्हणाले–

" माणिकनगरच्या महापुरुष खंडेराव महाराजांनी ज्यांना 'गायन सम्राट' म्हणून गौरवले त्यांना आम्ही कुठल्या शब्दांत गौरवावे ?"

राजाभैय्या पूंछवाले उद्गारले–

" बुवासाहेबांसारखे प्रभावशाली कलाकार या काळात उत्पन्न होणे असंभवनीय आहे."

केशवराव भोळे प्रदीर्घ उसासा टाकून म्हणाले–

" भास्करबुवांच्या तोडीचे अष्टपैलू व श्रोत्यांना आपल्या गाण्याने बांधून ठेवणारे गवई महाराष्ट्रातच काय भारतवर्षातही फार थोडे होऊन गेले.

उमद्या गायनाबरोबर अंतःकरणाचा ठेवा बुवांजवळ असल्याने ऐकणाराला व शिकणाराला बुवांनी कधीच विन्मुख पाठवले नाही."

बाळकृष्णबुवांचे शिष्य अनंत मनोहर आवर्जून भेटायला आले. म्हणाले–

" बुवा मोठे झाले तरी आमरण विद्यार्थीच राहिले. मी विद्यार्थीदशेत असताना– माझ्याकडून एक अप्रसिद्ध रागाची चीज ऐकताच ती चीज दहावेळा म्हणून घेऊन– शिकून बसवून घेऊन स्वतः गायले. तेव्हा त्यांचे समाधान झाले.

कुणाचा उपमर्द न करणारा– मर्मभेद न करणारा– अजातशत्रू– विद्याभिलाषी आम्ही कुठे धुंडावा ?"

वझेबुवांच्या हृदयाला बुवांच्या विरहाचे दुःख असह्य होऊन ते शिष्य गुरुराव देशपांड्यांना म्हणाले–

" समान गुणिजनांसंबंधी इतकी सहानुभूती–गुणज्ञता–औदार्य–प्रेमळपणा–क्वचितच दृष्टीस पडतो. या बाबतीत भास्करबुवांचा कित्ता सर्व संगीत व्यावसायिकांनी गिरवण्यासारखा आहे. हा तेजस्वी हिरा निखळल्यावर आमच्यासारख्यांनी तरी कशाला राहावे ?"

दक्षिणेला हा दुःखाचा सागर उसळला त्याच वेळी उत्तरेला जसा डोंगर कोसळला...

एकोणीसशे बावीस सालची जालंदरची संगीतसभा गात नव्हती तर अश्रुहार गुंफीत होती–

विद्या बखाने गुणी, नमन गुणको करे
मान अपमान को भेद न माने
नमन करे हरिदास, बजु, तानसेनको
सदारंग भास्करको नित नाम ध्याने ॥

आणि हे सांगता सांगताच आजोबा गाऊ लागले–

‘ कानांच्या घरकुलांत अजुन उभी स्वरमाला
फिरफिरूनी जोजविते शिणलेल्या हृदयाला
नीज कशी दिव्य अशी मावळले राग शोक,
आणि उरी उरलेला मधुभरला मात्र चषक...’

समोरून गजरेवाला आला. मी चार गजरे जोडून माळ केली. पंडित भास्कर-बुवांच्या पुतळ्याला घातली. आणि म्हणालो–

“ आपण संगीत गायलात. संगीत जगलात. मीसुद्धा असाच कशासाठी तरी जगेन. अभिमान नाव सार्थ करीन.”

*